# A GRAMMAR

OF THE

# MARÁTHÍ LANGUAGE

FOR

# THE USE OF STUDENTS.

BY

DADOBA PANDURANG, ESQ., J. P.

LATE SUPERINTENDENT OF THE GOVERNMENT VERNACULAR SCHOOLS IN THE DECKAN, &c. &c.

---

Fourth Edition, Revised and Corrected.

---

Bombay:

PRINTED AT THE EDUCATION SOCIETY'S PRESS, BYCULLA.

1866.

# महाराष्ट्र भाषेचें व्याकरण.

विद्यार्थ्यांच्या उपयोगा करितां केलें.

ग्रंथकार

दादोबा पांडुरंग तर्खडकर,

दक्षिणेंतील सरकारी शाळांचे माजी सुपरिंटेंडेंट्, इ०.

चौथी आवृत्ति.

तिसरी आवृत्ति तपासून शुद्ध केली.

मुंबईंत

एज्युकेशन सोसाइटीच्या छापखान्यांत छापिलें.

शालिवाहन शके १७८७.

इसवी सन १८६६.

# अनुक्रमणिका.

# प्रस्तावना.

या व्याकरणाची पहिली आवृत्ति शके १७५८ नांत छापून प्रसिद्ध झाली, त्या नंतर सुमारें आठ नऊ वर्षांत ती संपून दुसऱ्या आवृत्तीचें अगत्य पडल्या वर बोर्ड आव् एड्युकेशन या नामानें जी एतद्देशीय लोकांत विद्याप्रसरण करण्याचें काम पाहण्या करितां सरकारानें सभा स्थापित केली आहे, तिणें मला शके १७६७ अथवा इश्वी सन १८४५ साच्या डिसेम्बर महिन्यांत असें सांगितलें कीं, तुमचें व्याकरण पुनः छापण्याचें अगत्य आहे, त्यास तुमच्या मनांत त्यांत कांहीं फेरफार करायाचा असल्यास तो करून तुम्हीं दुसरी आवृत्ति तयार करावी. ही त्या सभेची आज्ञा माझ्या हातीं आल्या वर मला फार संतोष झाला; कारण, ज्या काळीं मीं आपलें व्याकरण प्रथमतः रचिलें, त्या काळीं माझें वय विसाच्या आंत होतें; आणि त्या काळीं मराठी ग्रंथांचा व मराठि लिहिण्याचा तादृश प्रचारहि नव्हता; पुढें उत्तरोत्तर ग्रंथहि वाढत गेले, व दर्पण, प्रभाकर, इत्यादि वर्त्तमानपत्रें निघाल्यापासून मराठींत लिहिण्याचाहि प्रघात फार वृद्धिंगत होऊं लागला, या मुळें व्याकरणनियमांची आवश्यकताहि त्याच मानानें अधिकाधिक वाढूं लागली. पूर्वी जें व्याकरण म्यां केलें होतें, त्याचे गुणदोष, तदुपपन्न भिन्नाभिन्न विषयांचा न्यूनाधिकभाव, व त्या ग्रंथाच्या पूर्णतेस आणखी नवे नवे असे जे अनेक विषय, त्यांचे प्रतिपादक जे नियम, त्यांचा शोध आणि उपपत्ति यांचें सापेक्षत्व, या सर्व गोष्टींचें मीं फार दिवस मनन करून, स्वशक्त्यनुसार हा ग्रंथ जितका पूर्णतेस नेववेल तितका नेऊन, विद्वज्जनांच्या आदरास पात्रीभूत करण्याचा उपाय शोधित होतों; इतक्यांत त्या सभेची पूर्वोक्त आज्ञा सादर झाली; मग अर्थात् ती मोठ्या उत्साहानें मान्य करून या ग्रंथाची दुसरी आवृत्ति सिद्ध करण्याच्या व्यवस्थेस लागलों. पुढें जसजसा

हा ग्रंथ शोधित गेलों, तसतसा हा विस्तृत होऊन पुनः या ग्रंथाची केवळ नवी रचना करावी लागली. या ग्रंथाची पहिली आवृत्ति, आणि ही आवृत्ति, या परस्पर ताडून पाहिल्या असतां, या गोष्टीची सत्यता ध्यानांत यावयास विलंब लागणार नाहीं.

मागल्या दहा पंधरा वर्षां पासून महाराष्ट्र भाषेत गद्यात्मक ग्रंथ लिहिण्याचा प्रचार वाढूं लागला; तेव्हांपासून, मोठमोठालीं वाक्यें तर काय, परंतु त्यांतील प्रत्येक शब्द, व त्या शब्दांतील प्रत्येक वर्णरूप अवयवहि शुद्ध व नियमास अनुसरून असावा, आणि तेणेंकरून सर्वांची लिहिण्याची पद्धति एकसारखी पडून सांप्रत जी लिहिण्यांत अव्यवस्था आढळत्ये, ती दूर व्हावी, अशी इच्छा माझ्या मनांत उद्भवली होती; कारण, जसी भाषा, तशी तिची लेखनपद्धतिहि, तदंतर्गत गूढस्थित जे नियम त्यांचें उद्घाटन करून त्यांज वर बशिवणें, हाच व्याकरणशास्त्राचा मुख्य उद्देश होय. आणि याच उद्देशानें गालवशौनककात्यायनशाकटायनादि जे प्रातिशाख्यादिवेदव्याकरणभाष्यकार, व त्यां नंतर पुढें यास्कपाणिन्यादि जे वैयाकरण झाले, व तदनंतर अर्वाचीन काळीं भट्टोजीदीक्षित, महीधरभट्ट, बोपदेव, आदिकरून जे व्याकरणग्रंथाकार प्रसिद्ध झाले, त्या सर्वांनीं परिश्रम केले; म्हणोनच संस्कृत भाषा इतक्या प्रगल्भ दशेस येऊन, विद्वज्जनचित्तचकोरास चंद्रीभूत होऊन, वाल्मीकिव्यासशंकरश्रीहर्षकालिदासभवभूत्यादि जे प्राचीन आणि अर्वाचीन कवि त्यांच्या वाग्देवतेस इतकी रम्यस्थानार्ह झाली; नाहीं तर, संस्कृत वाणी प्रमाणें जिचें काठिन्य, विस्तार, आणि जिच्या ठायीं, सहस्रशः सूक्ष्मनियमरूप तंतूचें गुंतलेलें जाल, अशा भाषेस मार्दवदशेस आणून, तिचें हें दुर्निवार जाल उकलून, त्या सूत्रांनीं विणून सिद्ध केलेला जो पट तो कविजनचित्रकारांच्या अनेक सुरसरंगभरितकल्पनांस लेखनार्ह झाला नसता. म्हणोन या यशाचे जे अंशभाक् त्यांची परिगणना केली असतां, पतंजलिकात्यायनपाणिन्यादि जे शब्दशास्त्रनियंते त्यांसच आद्यस्थानापन्न केलें पाहिजे.

महाराष्ट्रदेशभाषेची उत्पत्ति, व तिच्या उत्तरोत्तर ऊर्जित-दशेचा इतिहास, व तिची सांप्रतची स्थिती, यां विषयांचें यथास्थित विवरण करणें, हा एक स्वतंत्र ग्रंथाचा विषय होय; अशा लहानशा ग्रंथाच्या उपोद्घातांत यांचा अंतर्भाव करणें अवकाशाच्या अल्पत्वा मुळें केवळ अशक्य होय; तथापि या उपोद्घातांत त्यांतील मुख्य मुख्य विषयांचा आकार तरीं दाखिवणें इष्ट जाणून कांहींसें विवरण करितों. जो देश निरंतर देशांतरवासी लोकांच्या राजसत्ते खालीं असतो, त्या देशाची जी भाषा, तिचा इतर तद्देशोत्पन्न वस्त्रादि प्रपंचोपयोगी पदार्थां प्रमाणें ऊर्जित दशेस येण्याचा संभव नसतो; तोहि त्यांच प्रमाणें केवळ निर्वाहा पुरती मात्र असती. शिवाजीच्या पूर्वीं हा देश मुसलमानांच्या स्वाधीन होता; त्याच्या पूर्वीं केव्हां तरीं हा देश दीर्घकालमर्याद महाराष्ट्र लोकांच्या स्वाधीन होता असें दिसत नाहीं. त्या काळाच्या प्राचीन इतिहासा वरून असें अनुमान होतें कीं, मुसलमानांच्या पूर्वीं तगर, पैठण, देवगड, पन्हाळा, इत्यादि कित्येक या देशांतल्या मोठ्या विख्यात अशा राजवंशांच्या राजधान्या होत गेल्या, परंतु त्याच्या राज्यांची देशमर्यादा कोणती होती, व हे वंश राज्य करित असतां, या देशांतील लोकांची देशभाषा हीच किंवा दुसरी कोणती होती, या विषयीं लेखादिप्रमाणाभावा मुळें कांहीं दृढ अनुमान करितां येत नाहीं. त्यांत तगर आणि पैठण या राजधान्यांची भरभर असतां या महाराष्ट्र देशांत कोणती भाषा चालत होती, अथवा यद्यपि महाराष्ट्र भाषा असली, तथापि ती कोणत्या रूपानें प्रकट होती, या विषयीं कांहींच चांगली अटकळ होत नाहीं; परंतु आतां शुद्ध मराठी शब्द म्हणोन जे प्रसिद्ध आहेत, त्यांच्या व्युत्पत्ती विषयीं सूक्ष्म विवेचन केलें असतां असें एक अनुमान होतें कीं, ही मराठी भाषा नाटकादि ग्रंथांत मागधी पैशाची म्हणोन संस्कृत भाषे वरून साधलेली जी बालभाषा या नावेंकरून प्रसिद्ध आहे, तिचाच अपभ्रंश अथवा कांहींएक प्रकार असावा. तेव्हां तगर आणि पैठण या राजधान्याची समृद्धि असतां ही मराठी भाषा, विवेकसिंधु

आणि ज्ञानेश्वरी या ग्रंथांत ज्या प्रकारची भाषा उपलब्ध होत्ये ती, आणि बालभाषा, या दोहोंतील जो संभावनीय मध्यप्रकार, त्या रूपानें प्रसिद्ध असावी, असें एक अनुमान होतें. पुढें बाराशें शकाच्या समाप्तीस, ज्या काळीं देवगड, ज्यास आतां दौलताबाद म्हणतात, तेथें जाधव म्हणजे प्राचीन काळचे यादव या वंशाचे राजे राज्य करित होते, त्या काळीं पूर्वोक्त दोन ग्रंथांत ज्या प्रकारची भाषा उपलब्ध आहे, त्या प्रकारचा प्रचार होता असें दिसतें; कारण, विवेकसिंधु आणि ज्ञानेश्वरी या ग्रंथांची त्या काळीं रचना झाली असें समजतें; त्यांत विवेकसिंधु हा ग्रंथ ज्ञानेश्वरीच्या अगोदरचा असावा असें सर्वांचें मत आहे; परंतु त्याचे कर्त्ते मुकुंदराज हे केव्हां व कोठे झाले या विषयीं यथास्थित अनुमान होत नाहीं; परंतु जसे संस्कृतांत आद्यकवि वाल्मीकि, आणि अनुष्टुभ्, छंदांत रचलेला आद्यग्रंथ रामायण, म्हणोन विख्यात आहे, तसे मराठी भाषेंत आद्यकवि मुकुंदराज, आणि ओंवीछंदांत रचलेला आद्यग्रंथ विवेकसिंधु, म्हणोन प्राकृतभाषाभिज्ञ यांचें मत आहे. तेव्हां ज्ञानेश्वराच्या कांहीं वर्षे पूर्वी मुकुंदराज झाले असावे असें अनुमान होतें. ज्ञानेश्वरी ग्रंथ शके बाराशें बारांत समाप्तीस गेला त्या विषयीं ज्ञानेश्वरीचेंच प्रमाण.

> शके बाराशतेंबारोत्तरें ॥ तैं टीका केली ज्ञानेश्वरें॥ सच्चिदानंद बाबाआदरें॥लेखक जाहला॥ अ० १८, ओ० १८१२.

या काळाच्या इतिहासा वर दृष्टि पोंहचविली असतां असें दिसून येतें कीं ज्या काळीं ज्ञानेश्वरी समाप्तीस गेली, त्या काळीं देवगडास रामराव जाधव राजा होता; कांकीं त्याच्च सुमारास अल्लाउद्दीन खिलजी याची आणि रामरावाची लढाई होऊन, मुसलमानांचा महाराष्ट्र देशांत संचार होऊन, त्यांचें या देशांत प्राबल्य होण्यास आरंभ झाला. विवेकसिंधु आणि ज्ञानेश्वरी या ग्रंथांत जो महाराष्ट्र भाषेचा प्रकार आढळतो, त्याचा, आणि सांप्रत जो प्रकार आढळतो, त्याचा, तारतम्यभाव पाहिला असतां असें दिसून येतें कीं, त्या काळीं जे कित्येक नामवाचक व क्रियावाचक शब्द व्यवहारांत होते, ते आतां अव्यवहारित

होऊन त्यांच्या स्थानीं कित्येक स्थळीं त्यांचेंच रूपांतर होऊन जे नवे शब्द झाले आहेत त्यांचा, आणि कित्येक स्थळीं फारशी आणि अरबी शब्दांचा प्रचार पडला आहे; इतकेंच नाहीं, परंतु, दुसरें एक असें अनुमान होतें कीं नामवाचक आणि क्रियावाचक जे मूलशब्द, त्यांस आतां प्रत्यय लागून तन्निमित्तक जो त्या मूलशब्दांस कार्यविशेष होतो, तत्कार्यविशेषसहित जे जे प्रत्यय, ते ते मूळचे निराळे शब्दच होते, आणि कित्येक स्थळीं या प्रत्ययांतहि भेद होता, अथवा तो कार्यविशेषहि शब्द ह्मटल्यास चिंता नाहीं. अथवा, उलट घेऊन जरीं असें ह्मटलें, कीं अणादिकांचा, ह्मणजे सारे स्वर आणि अंतस्थ संज्ञक जे– य, र, ल, व, आणि ह, एतत्समुदायात्मक वर्ण त्यांचा, पूर्वीं परस्परांत संधि नकरितां हे वर्ण निराळे लिहित असत.

हें आतां उदाहरणांनीं स्पष्ट करून दाखवितों. जुने मराठी शब्द जे सांप्रत व्यवहारांत प्रसिद्ध नाहींत ते–**अलोट** ह्म० खरें, **अवसांत** ह्म० अकस्मात्, **कीर** ह्म० खरें, **कडसणी** ह्म० विचार, **धिंवसा** ह्म० इच्छा, **कुसरी** ह्म० कला–शोभा, **भाणें** ह्म० जेवण, **उळिगी** ह्म० बिगार, **ओरकल** ह्म० परीस, **कांड** ह्म० बाण, **कामठ** ह्म० दुकान, **खेंव** ह्म० आलिंगन, **खालारां** ह्म० खालीं, **गाथागोवी** ह्म० गडबड, **टकळी** ह्म० आशा, **डुडुळ** ह्म० घुबड, **दळवाडें** ह्म० विस्तार, **दुस** ह्म० वस्त्र, **नव्हाळा** ह्म० नवेपणा, **निरुतें** ह्म० खचित–चांगलें, **पाढाऊ** ह्म० संग्रह, **बेंझें** ह्म० युक्ति, **मांदुस** ह्म० पेटी, **येरु** ह्म० तो, **रहाटी** ह्म० तऱ्हा, **लाणी** ह्म० स्थळ, **विंदाणी** ह्म० कारागिरी, **सुणें** ह्म० कुत्रें, **सिनें** ह्म० निराळें, **हातनुकें** ह्म० पाहिजे तितकें–घेववेल तितकें; **आरोगणें** ह्म० भक्षणें, **ओसंडणें** ह्म० टाकणें, **घापनणें** ह्म० घालणें, **चेवविणें** ह्म० जागें करणें, **सुणें** ह्म० घालणें. या शिवाय कित्येक धातुसाधितांचीं आणि क्रियापदांचींहि रूपें या काळीं भिन्न भिन्न रूपानें वर्तत होतीं; जसें–**करुनियां** ह्म० करून, **बोलोनियां** ह्म० बोलून, **भक्षिन्नलें** ह्म० भक्षिलें, **करी** ह्म० करितो,

**बोलत** ह्म० बोलतात, **करितोसी** ह्म० करितोस, **मागताती** ह्म० मागतात, **कीजे** ह्म० करावें-केलें जावें, **नेइजे** ह्म० न्यावें, **सांगिजे** ह्म० सांगावें, **करिजेतें** ह्म० केलें जातें, **बोलिजेल** ह्म० बोललें जाईल, **सांगिजेतील** ह्म० सांगितले जातील, इ०.

आतां दुसरा प्रकार दाखवितोंः नामा+ याचा= नामयाचा-नाम्याचा, आत्मा+ याची= आत्मयाची-आत्म्याची, तो-तें+ यानें= तयानें-त्यानें-त्याणें, जी+ इनें= जयेनें-जिनें-जिणें स्त्री+इनें=स्त्रियेनें-स्त्रीनें, तो+ लागीं-लागुनी-लागुनीयां= तयालागीं इ०-त्यालागीं-त्याला, माझिया-माझ्या+लागीं, इ० =माझियालागीं -माझ्यालागीं-मजलागीं-मजला-मला, करावें+ यास= करावयास-करायास, जावें + यासाठीं=जावयासाठीं -जायासाठीं, लिहावें+ याचा= लिहावयाचा-लिहायाचा, करी + ते + समयीं= करिते समयीं-करते समयीं.

आतां तिसरा प्रकार दाखवितों. व्हावें~ होआवें, त्याला~ तयाला, माझ्या~ माझिया, तिची~ तयेची, इ०.

हा तिसरा प्रकार पाहून जर कदाचित् कोणी असें अनुमान करील कीं सांप्रत ज्या प्रकारची मराठी भाषा उपलब्ध आहे त्याच प्रकारची पूर्वी होती, परंतु ग्रंथांत व पद्यरचनेंतमात्र कविजन छंदा करितां व प्रासा करितां संधि नकरितां वर सांगितले अणादि वर्ण पृथक् पृथक् उच्चारित होते; तर हेंहि अनुमान संभावनीय होय; परंतु मराठी शब्दसिद्धी वर जर सूक्ष्म विचार केला, तर माझी अशी अटकळ होत्ये कीं, अणादि वर्णांचा-संधि करून शब्दांस आंखूड करण्याचा प्रकार मागाहून निघाला असावा.

या प्रमाणें मुकुंदराज, ज्ञानेश्वर, मुक्ताबाई, आणि निवृत्तिनाथ, यांच्या काळीं, शेवटीं ग्रंथांत तरी, ज्या रूपानें मराठी भाषा वर्तत होती त्याचें दिग्दर्शन केलें. पुढें ग्रंथांत व पद्यरचनेंत याच भाषेची प्रवृत्ति पडून एकनाथ, नामदेव, उद्धवचिद्घन, अमृतराय, मध्वमुनीश्वर, शिवदिनकेशरी, केशवस्वामी, अनंततनय,

मुक्तेश्वर, रामदास, श्रीधर, वामन, तुकाराम, आदिकरून जे या महाराष्ट्र भाषेंत परम विख्यात, व ज्यांची वाणी परम रसाळ, असे जे कवि झाले, त्यांणींहि याच भाषेचें अवलंबन करून आपल्या रुचिवैचित्र्यानें ईत भक्ति, ज्ञान, वैराग्य, उपदेश, इतिहास, एतद्विषयपर अनेक ग्रंथ व काव्यें रचून इच्या ठायीं पंडित व रसज्ञ जनांच्या लक्षास पात्रीभूत होण्याची योग्यता आणिली; परंतु ज्या काळीं हे कवि विख्यात झाले, त्या काळीं मुसलमानांचें प्राबल्य होऊन त्यांची राजसत्ता या देशांत चोहों कडेस प्रसृत होऊन गेली होती; म्हणोन यांच्या ग्रंथांत पुढें उत्तरोत्तर प्राचीन मराठी शब्दांच्या ठिकाणीं अरबी व फारशी शब्दांची मिसळ बरीच होत गेली. शेवटीं, अलीकडेस पेशवाईत बारामतीकर पांडुरंगराव यांच्या पदरीं मोरोपंत या नावाचे कारकून होते, पुढें त्यांची काव्यव्युत्पत्ति सर्वोत्कृष्ट पाहून त्यांस पांडुरंगरावांनीं आपल्या घरचे पुराणिक केलें; त्यांणीं तर आपल्या रसभरित काव्यानें या भाषेस केवळ संस्कृत भाषेचीच प्रौढी आणिली. वामन आणि मोरोपंत यांस अनुक्रमें महाराष्ट्र भाषेचे व्यास व श्रीहर्ष म्हटल्यासहि साजेल. प्राकृत भाषेविषयीं नाक मुरडणारे जे शास्त्री व पंडित त्यांस यांनींच लाजविलें. आज पावेतों जें कांहीं भांडार संस्कृतभाषारूप पेटींत कुलूप घालून ठेविलें होतें, आणि तिची किल्ली ब्राह्मणांच्याच स्वाधीन होती, तें ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, वामन, श्रीधर, मोरोपंत, आदिकरून जे ब्राम्हण कवि झाले, त्यांणीं उघडून काढून, त्यांचें प्राकृत लेणें करून, सर्व लोकांस अर्पण केलें; म्हणोन नुसतें यांचें कौशल्य व चातुर्य वर्णावें इतकेंच नाहीं, परंतु यांची औदार्यपूर्वक जी औपकारिक बुद्धि तिचीहि या प्रसंगीं प्रशंसा केली पाहिजे. मोरोपंतांच्या उत्तरावस्थेच्या समयीं बहुधा त्यांचाच कित्ता घेऊन सोलापुरांत रामजोशी प्रसिद्ध झाले; हे प्राकृत कविमालेंतील शेवटले मणि; यांचें शृंगाररसवर्णनपर आणि लोकाज्ञानध्वंसनपर अत्यंत रसाळ आणि उद्दाम बुद्धिस्फुरण पाहून रसिक पुरुषांस माना डोलविल्या शिवाय राहवत नाहीं. शेवटीं रावबाजीच्या कारकीर्दींत मजल.

शीच्या आखेरीस अनंतफंदी, बाळकारंजकर, धोंडीबापु, आणि सगनभाऊ, या शाइरांनीं आपल्या तुणतुण्याची तार चांगली सुस्वर चढवून त्या काळचा मराठमोळा शेवटल्या भैरवींत बराच गाइला.

पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, कोणतीहि भाषा प्रौढ व विस्तीर्ण दशेस आणावयास जितक्या काळाची अपेक्षा असते, जो प्रयत्न आणि जें चातुर्य खर्चावें लागतें, व विद्येच्या प्रसारास ज्या प्रकारचें उत्तेजन आवश्यक असतें, त्या प्रकारें या सर्व गोष्टी घडवून आणायास समर्थ अशी महाराष्ट्र राजाची सत्ता कधींतरी मुसलमानांच्या पूर्वीं या महाराष्ट्र देशांत एकसारखी चालली होती अशी अटकळ होत नाहीं. पुढें हिंदूंचीं मांडलिक राज्यें मोडून मुसलमानांचें या भरतखंडांत सार्वभौम्य झाल्या वर सुमारें चारशें वर्षें पर्यंत हा देश त्या लोकांच्या सत्तेंत अविच्छन्न राहिला. त्यांची भाषा व धर्म निराळा म्हणून त्यांज कडूनहि या भाषेच्या वृद्धीस कांहीं साह्य नघडतां उलटें त्यांच्या योगानें सहस्रशः यवनी शब्द ईंत मिसळून इची निर्मलता मात्र दूषित झाली. आतां मुसलमानांच्या राज्यांत हिंदूंस मोठमोठे राज्याधिकार मिळत होते, या मुळें त्यांच्या राज्यांत सहस्रावधि हिंदू मोठमोठे मानकरी व सरदार होत असत, या योगानें एथील गुणिजनांस आश्रय मिळून त्यांच्या गुणांची बूज होत असे. या कारणा वरून महाराष्ट्र भाषेच्या अभिवृद्धीस कांहीं साहित्य घडलें असावें असें अनुमान करायास अवकाश आहे. वरकड, वास्तविक दृष्टीनें पाहिलें, तर या काळीं जे एकनाथ, नामदेव, अमृतराय, वामन, तुकाराम, एतत्प्रभृति कवि झाले, ते बहुधा सर्व साधु होते म्हणोन त्यांची जी लोकोपकारिक बुद्धि, हाच या भाषेच्या अभिवृद्धीस मुख्य हेतु असें म्हणणें हेंच खरें. पुढें शिवाजी पासून बाजीराव रघुनाथ पर्यंत सुमारें सव्वाशें वर्षें मराठी लोकांचें प्राबल्य चालून हा देश त्यांच्याच सत्तेंत होता; तेव्हां तरी महाराष्ट्र भाषेच्या अभिवृद्धीस कांहीं अलौकिक उत्तेजन व्हावें तर तसेंहि झालें नाहीं; शास्त्र-

विद्या आणि वेदपारायणविद्या यांस मात्र पेशवाईत विशेष प्रकारचें उत्तेजन मिळालें म्हणोन त्या विद्या ब्राह्मण जातींत बऱ्याच वाढल्या. तथापि स्वराज्य होतें ह्मणोन हरिदास, पौराणिक, शाईर, तमासगीर, नकल्ये, इत्यादि गुणिजनांस उदार हस्तानें बिदाग्या, भरगच्ची दुपेटे, व मंदिलें मिळत, तीं या भाषेच्या अभिवृद्धीस कांहीं अल्पकारणभूत झालीं असें नाहीं; यां पासून हें कार्य बरेंच झालें असें मला वाटतें.

इशवी सन १८१८ यांत हा महाराष्ट्र देश शहाण्या इंग्लिश सरकाराच्या हातीं आल्या वर पुढें सात आठ वर्षांनीं त्यांणीं आपलें लक्ष इतर सहस्रावधि राजकीय विषयांत निमग्न असतां, आज पावेतों कोणत्याही सरकारानें ज्या कडेस विशेषेंकरून लक्ष दिलें नाहीं त्या देषभाषे कडेस, व एतद्देशीय लोकांत सद्विद्येचा प्रसार व्हावा या विचारा कडेस लाविलें; हें या सरकाराचें उदार कृत्य परम स्तुत्यर्ह होय. या उद्देशानें सन १८२३सांत "मुंबईची हैंद शाळा शाळापुस्तकमंडळी" या नावानें एक सभा स्थापित झाली. पुढें या सभेच्या कर्तृत्वाची बरीच घडामोड होऊन तिचें "मुंबईची शिक्षा मंडळी" या नावानें रूपांतर झालें, पुढें ही मंडळी मोडून, इचें काम सांप्रत, तत्स्थानापन्न सरकारानें स्थापित केलेली जी "बोर्ड आव् एड्युकेशन" या नावाची सभा, ती चालवित आहे. पहिली सभा स्थापून आज अठ्ठावीस वर्षे झालीं, इतक्या कालाच्या अवधींत व्हावे तितके जरी ग्रंथ झाले नाहींत, तरी या महाराष्ट्र भाषेंत कांहीं कांहीं उपयोगी विषयां वर बरेच ग्रंथ झाले आहेत. या देशांत पूर्वीपासून पद्यात्मक ग्रंथ लिहिण्याची चाल होती; सरकारी कामकाजा शिवाय गद्यात्मक लेख लिहिण्याची चाल अगदीं नव्हती. मराठ्यांच्या अमलांत मात्र कोणीं कोणीं बखरा लिहून ही चाल नुकतीच पाडिली होती; परंतु तिचा प्रचार फारच थोडा तेव्हां ती होती नव्हती सारिखीच ह्मटल्यास चिंता नाहीं. महाराष्ट्र भाषेंत शुद्धरीतीनें वाक्ययोजना करून रसभरित असे पहिले ग्रंथ सदाशिव काशिनाथ छत्रे यांणीं रचिले; ह्मणोन यांस गद्यात्मक

ग्रंथांचे जनक ह्मटल्यासहि साजेल. याच काळीं कित्येक पंडितांनीं मिळून एक महाराष्ट्र कोश केला हें एक मोठें उपयोगी काम झालें. या नंतर हरिकेशवजी आणि बाळगंगाधर शास्त्री यांणींहि सरकारी शाळां करितां चार पांच ग्रंथ चांगले तयार केले; व या शिवायाहि लहान लहान असे पुष्कळ ग्रंथ तयार झाले आहेत व होताहेत. सन १८३६ सांत प्रथम मीं आपलें महाराष्ट्र व्याकरण प्रसिद्ध केलें, त्याचा उद्देश, व तें कोणत्या स्थितींत असतां रचिलें, या विषयीं कांहींशी सूचना त्याच व्याकरणाच्या प्रस्तावनेंत केली आहे, त्याची पुनरुक्ति एथें नको. अलीकडेस, दर्पण व तदनंतर प्रभाकर हीं वर्तमानपत्रें निघाल्या पासून मोठा लाभ हा झाला कीं, त्यांच्या द्वारें लोकांस ज्ञान होऊन, एथील लोकांत मराठींत गद्यरूपानें लिहिण्याचा प्रचार चांगला वाढत चालला आहे. तेव्हां, अशा समयीं व्याकरणद्वारानें भाषेचें नियमन करणें किती आवश्यक आहे हें सुज्ञ पुरुष जाणतच असतील. हाच हेतु मनांत धरून मीं ही दुसरी आवृत्ति सिद्ध केली. इचा मुख्य उद्देश हाच कीं, जितकें साधेल तितकें करून, आज पावेतों जिला नियमांत आणण्या विषयीं कोणीं प्रयत्न केलाच नाहीं ह्मणोन अत्यंत विस्खलित झालेली, व व्याकरणरूप फणीनें जिला कोणीं विंचरलेंच नाहीं ह्मणोन जींत अनेक ग्रंथि जमून फारच गुंतलेली, अशी जी ही मराठी भाषा, तिला कांहीं तरीं नियमांत आणावी, आणि दीर्घकाळग्रंथित जी तिची गूत ती हातीं घेऊन तिचे पदर सोडवून कांहीं तरीं उकलण्याच्या धोरणांत आणून बसवावी. आतां हें कार्य मीं कसें व कोठपर्यंत सिद्धीस नेलें याचा विचार करणें सुज्ञां कडेस आहे.

ही महाराष्ट्र भाषा आज पावेतों नियमांत नव्हती, ह्मणोन इचे प्रकारहि फार आढळतात. दहाबारा कोशां वर भाषा बदलत्ये, ह्मणून जी लोकांची ह्मण आहे ती अक्षरशः खरी आहे इतकेंच नाहीं, परंतु जे भाषाभिज्ञ आहेत त्यांच्या ऐकण्यांत शब्दवैचित्र्या वरून, स्वरभेदा वरून, व जातिपरत्वेंहि निरनिराळे

प्रकार येतात. कोंकणांतच या भाषेचे चार पांच प्रकार आढळतात; दमण पासून मुंबई पर्यंत एक प्रकार, यांत कांहीं कांहीं गुजराथी शब्दांची मिसळ आहे; यांत वर्तमान काळीं एकवचनीं तृतीय पुरुषाचीं रूपें पुल्लिंगीं स्त्रीलिंगा प्रमाणें, आणि प्रथम पुरुषाचीं स्त्रीलिंगीं पुल्लिंगा प्रमाणें होतात. मुंबईच्या दक्षिणेस अष्टागर प्रांताच्या भाषेचा प्रकार निराळा; महाडाच्या खाडी पासून जयगडच्या खाडी पर्यंत जो प्रांत त्यांतील भाषेचा प्रकार निराळा; पुढें रत्नागिरी प्रांताची शुद्ध कोंकणी भाषा या पेक्षां विशेष निराळी; राजापुरप्रांताच्या भाषेचा प्रकार निराळा; तेथून मालवणी भाषा निराळी, ईत गोमंतकी शब्द, व क्रियापदांचीं कांहीं कांहीं रूपेंहि निराळ्या प्रकारचीं आढळतात; पुढें शुद्ध गोमंतकी भाषा, ही मराठी भाषेहून निराळी भाषा ह्मटल्यासहि चिंता नाहीं. देशस्थ भाषेंतहि याचप्रमाणें प्रकार आढळतात; ज्या ज्या देशाच्या सीमे वर महाराष्ट्र देशाची सीमा मिळाली आहे, त्या त्या प्रांतीं त्या त्या भाषेचे शब्द यांत मिसळून स्वरभेदहि निराळा होतो. कर्णाटक देशाच्या सीमे जवळच्या प्रांतीं, ह्मणजे करवीरा पासून सोलापूर पर्यंत जो प्रदेश त्यांत वेगळ्या प्रकारची भाषा आढळत्ये; वऱ्हाड प्रांताच्या थेट देशस्थी भाषेचा प्रकार निराळा; बऱ्हाणपुरा पासून नंदुरबार पर्यंत खानदेशाच्या समीपभागाच्या भाषेचा प्रकार निराळा; पुढें खानदेशाची भाषा गोमंतकी भाषे प्रमाणें मराठी भाषेहून निराळी ह्मटल्यास चिंता नाहीं,–'साहेबा तूं खै वेता' हें जितकें शुद्ध महाराष्ट्र भाषे पासून निराळें, तितकेंच–'मनाभाऊ तूं कठ जास' हेंहि निराळें होय. आतां हे सर्व प्रकार वजा घालून महाराष्ट्र भाषेचे मुख्य दोन प्रकार मानिले आहेत–देशस्थ भाषा, आणि कोंकणस्थ भाषा; त्यांत या व्याकरणांत, महाराष्ट्र देशाचा मध्यभाग जो पुणेंप्रांत, त्यांत जी भाषा राजकीय आणि विद्वान् लोक बोलतात तिचें अनुसरण केलें आहे. त्यांत माझा व माझ्या वडिलांचा जन्म कोंकणांतला, ह्मणून यांत कदाचित् कोंकणी प्रका-

राचें यत्किंचित् आधिक्य असलें तरीं मला क्षमा मागायास कांहीं अवकाश आहे.

पहिल्या आवृत्तीचा आणि या आवृत्तीचा तारतम्यभाव पाहिला असतां या दोहोंतील महदंतर त्यांच्या लक्षांत आल्या वांचून राहणार नाहीं, असा मला तर भरंवसा आहे. पहिल्या आवृत्तींत जितकीं प्रकरणें आहेत त्यां पेक्षां ईत अधिक असून तीं प्रत्येक एथें विशद केलीं आहेत. यांत लिंगनिर्बंध, विभक्तिप्रकरण, उपान्त्य वर्णास विभक्तीनें जीं कार्यें होतात तीं, क्रियापदप्रकरण, यांत विशेषेंकरून रूप, भेद, अर्थ, यांहींकरून क्रियापदाच्या बहुधा सर्व रूपांचें कालनियमन, धातुसाधित नामें, आणि शब्दसाधित नामें, इत्यादि प्रकरणांत जो मोठा घोंटाळा आहे, तो दूरकरून त्याची यथाशक्ति योग्य व्यवस्था करण्यांत माझ्यानें जितका प्रयत्न करवला तितका करण्यांत म्यां आळस केला नाहीं. पहिल्या आवृत्ती पेक्षां ईत वाक्यरचने संबंधी नियम विशद करून सात नियम नवे घातले आहेत. तशींच कारक, लेखनपद्धति, वाचनपद्धति, हीं प्रकरणें यांत नवीं घातलीं आहेत. या विषयींचें विवेचन या उपोद्घातांत केलें असतें, परंतु ग्रंथविस्तारभया स्तव आतां करित नाहीं; आणि तें या दोन आवृत्ति परस्पर मिळवून पाहिल्या असतां सहज ध्यानांत यावया जोगें आहे. इतकें जरीं झालें तथापि यांत ग्रंथाच्या पूर्णतेचा आव घालितां येत नाहीं. या प्रकारचा हा पहिलाच प्रयत्न आहे, ह्मणोन कदाचित् यांतील लेखांत व छापांत कोठे कोठे पूर्वापरविरोधरूप दोष आढळतील, तर या विषयीं ग्रंथकर्त्यास क्षमा असावी. हा भाषारूप समुद्र फार विस्तीर्ण होय, यांत व्याकरणरूप नौकेंत आरोहण करून शोध करूं लागलें असतां जों जों अंतःप्रवेश होत जातो, तों तों याची लांबी, रुंदी, आणि खोली, अधिकाधिक दृष्टीस पडती; या विषयीं कोणी प्राचीन वैय्याकरणानें ह्मटलें आहे;—

इंद्रादयोऽपि यस्यांतं न ययुः शब्दवारिधेः ॥
प्रक्रियां तस्य कृत्स्नस्य क्षमो वक्तुं नरः कथम् ॥

ह्मणोन आपणास जितका शोध लागेल तितका करून पुढील नाविकांस मार्ग सुगम करून ठेवावा इतकेंच आपलें काम. आतां हें काम ग्यां या पुढील ग्रंथरचनेनें कसें व कोठपर्यंत सिद्धीस नेलें यां विषयीं यथायोग्य विचार करणें सुज्ञां कडेस आहे ; मीं यांत बहुत श्रमानें जे जे नियम शोधून काढिले आहेत, त्यां वर त्याणीं लक्ष दिलें, आणि त्यां विषयीं यथायोग्य विचार करून, त्यांत जे जे सयुक्तिक त्यांस वाटतील, त्यांचें ग्रहण करून, सांप्रत जी महाराष्ट्र भाषा लिहिण्यांत अव्यवस्था आढळती, ती मोडून, ते ग्रहण केलेले जे नियम त्यांस अनुसरून, ही भाषा नीट सारखी व्यवस्थे वर आणण्या विषयीं ते उद्युक्त होत गेले, ह्मणजे माझ्या इतक्या श्रमाचें साफल्य झालें असें मीं मानीन.

---

## चौथ्या आवृत्ती विषयीं सूचना.

ही आवृत्ति तिसऱ्या आवृत्तीचीच प्रत आहे. परंतु ही छापत असतां पूर्वावृत्तींत जीं अशुद्धें पडलीं होतीं, तीं शुद्ध करून ग्रंथकर्त्यानें कोठे कोठे नवे नवे शोधहि घातले आहेत.

मुक्काम मुंबई, दा. पां.

१ अक्टोबर सन १८६५ इसवी.

# महाराष्ट्र भाषेचें व्याकरण.

## खंड १.

### व्याकरणशास्त्राची व्याख्या आणि त्याचा उपयोग यां विषयीं.

१. व्याकरण ह्मणून एक शास्त्र आहे, जेणेंकरून भाषेचें मर्मज्ञान होतें, ह्मणजे तिचे आंतील नियम कळतात, तेणेंकरून शुद्ध कोणतें आणि अशुद्ध कोणतें, हें यथायोग्य समजतें.

या वरून जर कोणी पुसेल कीं, 'काय व्याकरण जाणल्या वांचून शुद्ध बोलतां येत नाहीं?' तर याचें उत्तर असें आहे कीं आपली भाषा शुद्ध बोलण्यास जरीं व्याकरणाचें विशेष अगत्य नाहीं, तरीं जो त्याज विषयीं अज्ञान, तो यद्यपि बहुवक्ता आहे आणि जरीं स्वतां अशुद्ध बोलत नाहीं, तथापि इतरांचें भाषण शुद्ध आहे किंवा अशुद्ध आहे, हें त्यास नीट दाखवितां येत नाहीं; त्या वेळेस तो गोंधळांत पडतो. तुह्मींच पाहा कीं ज्या कोणास व्याकरणाचें ज्ञान नाहीं, त्यास जर त्याच्या भाषेंत एकादें अशुद्ध वाक्य म्हणून दाखविलें आणि विचारिलें कीं, हें शुद्ध आहे किंवा, अशुद्ध आहे, तर तो अशुद्ध म्हणून सांगेल; परंतु 'कां अशुद्ध?' म्हणून त्यास कोणीं प्रश्न केला असतां त्याच्यानें त्या पुसणाराचें समाधान करवणार नाहीं. घटकाभर पाहा, ज्याची स्वभाषा मराठी आहे, परंतु ज्यास व्याकरण म्हणून काय वस्तु आहे हें ठाऊक नाहीं, अशा एका मनुष्यास पुसलें, कीं 'तीं मुलें तेथें खेळतो, हें शुद्ध किंवा अशुद्ध?' तर तो ह्मणेल कीं अशुद्ध, परंतु कां अशुद्ध असें विचारिलें असतां त्याच्यानें यथायोग्य

उत्तर देववणार नाहीं, कदाचित् ह्मटलें तर असें म्हणेल कीं, 'कां म्हणजे तें कानांसच वाईट लागतें, असें कोणी बोलत नाहीं'; परंतु अशा उत्तरानें विद्वान् लोकांचें समाधान व्हावयाचें नाहीं. अहो, व्याकरण म्हणजे शास्त्र होय, आणि भाषा बोलणें ही केवळ व्यावहारिक आणि स्वाभाविक गोष्ट होय, म्हणोन या उभय गोष्टीं मध्यें फार अंतर आहे. या शिवाय स्वभाषेंत व्याकरणाचा एक मोठा उपयोग असा आहे कीं, त्याच्या योगानें सर्वांची भाषा, व लिहिण्याची पद्धति एक पडून एतद्विषयक कित्येक संशय दूर होतात. तसेंच, एकाद्या कठीण वाक्याचा अर्थ कोणा एकाच्या ध्यानांत यथास्थित आला किंवा नाहीं, हें जाणायाचें असल्यास, त्याज कडून त्या वाक्याचा व्याकरणरूपानें पदच्छेद करवावा, ह्मणजे जर त्यास यथास्थित अर्थ समजला असला, तर तो अर्थास अनुकूल असा पदच्छेद करील, नाहीं तर चुकेल; सारांश व्याकरण हें अर्थाचेंही मोठें सूचक होय आणखी स्वभाषे खेरीज इतर भाषा शुद्ध रीतीनें व त्वरित शिकायास या व्याकरणशास्त्राचा तर फारच आवश्यक उपयोग आहे.

२ व्याकरणाचे मुख्य भाग तीन आहेत; **वर्णविचार**, **शब्दविचार**, आणि **वाक्यरचना**.

---

## खंड २.

### वर्णविचार.

३ वर्णविचारांत वर्ण संबंधी विचार सांगितला आहे, ह्मणजे वर्णांचें **लक्षण**, त्यांचा **संयोग**, त्यांचीं **स्थानें**, आणि त्यांचे **संधि**, यांचें विवेचन या भागांत केलें आहे.

४ वर्ण ह्मणजे **अ** पासून **ज्ञ** पर्यंत जीं मूळाक्षरें तीं प्रत्येक.

५ वर्णांमध्यें दोन भेद आहेत—**स्वर** आणि **व्यंजनें**.

६ **स्वर** ह्मणजे ज्यांच्या आश्रया वांचून अक्षर सिद्ध

होत नाहीं, व ज्यांचा उच्चार व्यंजनां वांचून करितां येतो, असे जे वर्ण ते ; हे स्वर सोळा आहेत.

## स्वर.

*अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ॡ, ए, ऐ, ओ, औ, अं, अः.

यांत ऋ, ॠ, ऌ, ॡ, हे स्वर केवळ संस्कृत भाषेंतच येतात. अं, अः यांस स्वरांत लेखणें कित्येक पंडितांस प्रशस्त दिसत नाहीं, कारण ते असें ह्मणतात कीं, अं, अः यांस जर निराळे स्वर मानावें तर मग इं, इः, उं, उः, इ० यांस निराळे स्वर कां मानूं नये? हा त्यांचा पूर्वपक्ष खरा आहे ; परंतु एथें यांस स्वरांत गणिलें आहे, या वरून त्यांहीं इतकेंच समजावें कीं, अनुस्वार आणि विसर्ग ह्मणून जे स्वरांच्या उच्चारणांत भेद आहेत, यांचे सूचक हे वर्ण होत.

७ कोणताही वर्ण उच्चारायास जो काळ लागतो त्यास **मात्रा** असें ह्मणतात.

८ या मात्राभेदेंकरून मराठींत स्वरांचे दोन भेद आहेत— **र्‍हस्व** आणि **दीर्घ**.

९ र्‍हस्व स्वर उच्चारायास एक मात्रा लागती, आणि दीर्घ स्वर उच्चारायास दोन मात्रा लागतात ; अर्थात् जितका काळ र्‍हस्वस्वर उच्चारायास लागतो, त्याच्या दुप्पट काळ दीर्घ स्वर उच्चारायास लागतो.

१० अ, इ, उ, ऋ, ऌ, हे **र्‍हस्वस्वर**.

११ आ, ई, ऊ, ॠ, ॡ, ए, ऐ, ओ, औ, हे **दीर्घस्वर**.

१२ ऌ या वर्णास दीर्घत्व नाहीं असा संस्कृत व्याकरणांत नियम आहे.

---

* अ याची आकृति आणखी अ अशीही आढळती.

१३ ए, ऐ, ओ, औ, यांस कोणी **संयुक्तस्वर** ही ह्मणतात

१४ अ पासून ॡ पर्यंत जे दहा स्वर, त्यांस **मुख्य स्वर** ह्मणतात.

१५ **अं, अः** यांची वास्तविक पाहतां स्वर ह्मणून निराळी गणना नसावी, व मूळ संस्कृतांतही ती नाहीं, परंतु बाळबोध लिपि शिकविणारे पंतोजी मुलांस **अनुस्वार** आणि **विसर्ग** यांचें ज्ञान व्हावें ह्मणोन यांसही स्वरांत लेखितात. यांत अक्षरां वर जो बिंदु देतात त्यास **अनुस्वार**, आणि पुढें जे दोन बिंदु देतात त्यांस **विसर्ग**, असें ह्मणतात.

१६ अनुस्वार ह्मणजे नाकांतून जो उच्चार होतो तो; हा उच्चार जाणावया करितां वर्णांच्या माथ्या वर ˙ असा एक बिंदु देतात, आणि ज्या वर्णांच्या माथ्या वर हा अनुस्वार असतो, त्यास **अनुनासिक** अथवा **सानुस्वार** ह्मणावें. मराठींत अनुनासिक वर्णांचा उच्चार कर्तव्य असतां कोठें तो वर्ण केवळ नाकांतून मात्र उच्चारावा लागतो; जसें—कां, आंत, कांटा, तीं, इत्यादि. आणि कित्येक ठिकाणीं संस्कृता प्रमाणें या अनुस्वारा पुढें जो वर्ण असेल त्याशीं सवर्ण असे जे—ङ, ञ, ण, न, म, यांचा उच्चार कर्तव्य असतां ही अनुस्वाराची योजना करितात; जसें—

| | | | |
|---|---|---|---|
| **रंक, अंग** | यांचा उच्चार | **रङ्क, अङ्ग** | होय. |
| **यांचा, भंजन** | यांचा उच्चार | **याञ्चा, भञ्जन** | होय. |
| **पंडु, तंटा, धिंड** | यांचा उच्चार | **पण्डु, तण्टा, धिण्ड** | होय. |
| **संतान, पंतोजी** / **मंथन, धंदा** | यांचा उच्चार | **सन्तान, पन्तोजी** / **मन्थन, धन्दा** | होय. |
| **आंबा, रंभा, अंमा** | यांचा उच्चार | **आम्बा, रम्भा, अम्मा** | होय. |

(अ) आतां मराठी भाषेंत बहुधा असा नियम आहे कीं कित्येक

मराठी शब्दांत आद्य अक्षरा वर आणि बहुधा सर्वत्र अंत्य अक्षरा वर अनुस्वार असतां, आणि अनुनासिक जे आ, ओ, यां पुढें च ज झ हे वर्ण असतां, त्याचें उच्चारण केवळ नाकांतून करावें लागतें; व हा भेद जाणवायाचा असतां क्वचित् त्या अनुस्वारा खालीं ँ असी अर्धचंद्राकार कुंडली करितात; जसें-काँ, कीँ, तूँ, आँत, तेँ, काँच, साँज, खोँच, इ०.

(इ) परंतु मराठींत वर सांगितला नियम आहे, ह्मणोन शब्दाच्या शेवटीं ँ हें असें चिन्ह करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. तसेंच सर्व सप्तम्यंत शब्दांचा उपांत्य याच प्रमाणें अनुनासिक जाणावा; जसें—घरांत, भिंतींत, वायूंत, इ०.

सानुनासिक वर्णा पुढें च ज झ हे वर्ण आले, तर अनुस्वाराचा कोंकण आणि देश यां परत्वें विकल्पें अनुनासिक उच्चार होतो; जसें-चिंच, झांज, इ०.

(उ) परंतु जेथें उच्चारणांत विकल्प होत असेल, तेथें हा भेद अवश्य दाखविला पाहिजे; जसें—**सर्वांत** एथें सर्व शब्दाच्या सप्तमीचें रूप, आणि **सर्व** आणि **अंत** यांचा संधि होऊन जो **सर्वांत** शब्द होतो त्याचें रूप, हीं सारिखीं असतां स्पष्ट रीतीनें लिहिणें झाल्यास पूर्व शब्द **सर्वांत** असा लिहावा, आणि दुसरा शब्द **सर्वान्त** असा लिहावा.

पुढें अकारान्त, इकारान्त, इ० शब्द याच प्रकारें लिहिले आहेत.

(ऊ) आणखी अनुस्वारा पुढें **य, र, ल, व, श, ष, स, ह**, हे वर्ण असतां, अनुस्वाराच्या उच्चारणांत कांहीं भेद पडतो; पूर्व वर्णा वर अनुस्वार असून, तो वर्ण जर अनुनासिक असला, आणि पुढें जर **य** आणि **ल** हे वर्ण असले,

तर यांस द्वित्व होतें; जसें—संयोग- संय्योग; संलग्न-संल्ल इ०. आणखी र, व, श, ष, स, ह, हे वर्ण पुढें अस प्रथम वर्ण अनुनासिक उच्चार्यमाण असून त्यास किंचि दंतौष्ठ्य ह्मटलें पाहिजे; जसें—संरक्षक, संवाद, संशय, दंष्ट्र संसार, कंस, संहार, सिंह, इ०.

१७ ज्या अक्षरा पुढें विसर्ग असतो, त्या अक्षराचा अंत्य स्वर उच्चारून तो मुखांत वायू वर किंचित् आदळाव लागतो; जसें— छिः, अंः, दुःख, अंतःकरण, इ०.

१८ यांत ऋ, ॠ, ऌ, ॡ, अः इतके स्वर संस्कृत शब्दां वांचून इतर प्राकृत शब्दांत येत नाहींत; परंतु हे स्व ज्यांत असतात असे जे संस्कृत शब्द, ते मराठी भाषेंत कोठेंकोठें येतात ह्मणोन यांस एथें स्वरांत अवश्य गणिले पाहिजे.

१९ व्यंजन ह्मणजे स्वरा वांचून ज्याचा स्पष्ट उच्चार होत नाहीं असा जो वर्ण तें. हीं व्यंजनें चौतीस आहेत.

व्यंजनें.

क्, ख्, ग्, घ्, ङ्,
च्, छ्, ज्, झ्, ञ्,
ट्, ठ्, ड्, ढ्, ण्,*
त्, थ्, द्, ध्, न्,
प्, फ्, ब्, भ्,* म्,
य्, र्,* ल्, व्, श्,
ष्, स्, ह्, ळ्.

यांतून प्रत्येक व्यंजनाची अर्ध मात्रा जाणावी.

२० दुसरें यांत च्, ज्, झ्, यां व्यंजनांचा उच्चार

*ण, भ, र यांची आकृति कधीं ए, न, न अशाची आढळतो.

मराठी भाषेंत दोन प्रकारचा आहे, एक तर मूळ संस्कृता प्रमाणें शुद्ध तालव्य; जसें—चंद्र, चार, चित्त, चौर्य, जन, जाया, जीर्ण, झल्लरी, झंझा, इ०; आणखी दुसरा दातांशीं जीभ आणून जो दंततालव्य उच्चार होतो तो; याचीं उदाहरणें—चणे, चार, जासूद, जो, झांज, झुकणें, इ०. या वर्णांचा दंततालव्य उच्चार असतां त्यांच्या वरल्या रेषेच्या डावे कडेस एक बिंदु द्यावा.

या वर्णांच्या तालव्य आणि दंततालव्य उच्चारां विषयीं मराठींत बहुधा असा नियम आहे कीं—

(अ) शुद्ध संस्कृत, अरबी, अथवा फारसी शब्द, अथवा यां वरून साधलेले जे शब्द, त्यांत **च**, **ज**, **झ**, यां वर्णांचा उच्चार तालव्य जाणावा.

(आ) जे शुद्ध मराठी शब्द, अथवा परभाषेंतून येऊन जे केवळ मराठी होऊन गेलेले शब्द, यांतील **च**, **ज**, **झ**, यां वर्णांच्या अंतीं जर **अ**, **आ**, **उ**, **ऊ**, **ऐ**, **ओ**, **औ**, ह्मणजे **इ**, आणि **ए**, हे स्वर वर्ज करून अवशिष्ट राहिलेले स्वर असले, तर बहुधा त्यांचा दंततालव्य उच्चार होतो.

(इ) यांत **ए** असतां कोंकण आणि देश यां परत्वें विकल्पें दंततालव्य उच्चार होतो; जसें—त्याचें अ० त्याचें, माझें अ० माझें, खाजें अ० खाजें, इ०

यांत बहुधा आरंभीं असल्या पेक्षां शेवटीं एकार असतां दंततालव्य उच्चार विशेष आढळतो.

ही बिंदु देण्याची रीति अलिकडेस निघाली आहे. आणखी यद्यपि, महाराष्ट्र लोकांस या चिन्हाची मोठी आवश्यकता आहे असें मला वाटत नाहीं तथापि सामान्यतः सर्वांस या वर्णाचें उच्चारण, आणि कोठें अर्थग्रहणही निःसंशय व्हावें, ह्मणोन हें चिन्ह लिहिणें मला कांहींसें आवश्यक वाटतें. परंतु

हें जोडिते वेळेस सर्वांहीं अनुस्वारा प्रमाणें याज विषयीं फ सावध असावें; या चिन्हाची आवश्यकता पुढें विभक्तिप्रकरण यथास्थित प्रतिपादिली आहे.

ङ, ञ, आणि ष, हीं अक्षरें संस्कृत शब्दांत मात्र येतात

२१ ड, या वर्णाचा उच्चार मराठींत दोन प्रकारचा आहे; त्याचा नियम असा आहे कीं, हा वर्ण शब्दाच्या आरंभीं असतां याचा उच्चार शुद्ध ड सारिखा होतो; परंतु शब्दाच्या मध्यें, अथवा शेवटीं, असला तर, शुद्ध ड उच्चारिते वेळेस जितकी जीभ टाळ्यावर दाबावी लागती तितकी न दाबितां मध्येंच किंचित् पसरावी लागती; **डाग** आणि **बडबड**, या दोहों शब्दांत डचा उच्चार सारिखा नाहीं.

(अ) शेवटीं द्वित्त ड असला, अथवा उपांत्य वर्ण जर अनुनासिक असला, तर डच्या शुद्ध उच्चारांत कांहीं फेर पडत नाहीं. जसें—**अड्डा**, **सांड**, इ०

या उच्चारणा विषयीं कित्येकांस संशय आहे; ते ह्मणतात डचे दोन उच्चार कोठेंही नाहींत; मुंबईप्रांतांत मुसलमान, पारशी आदिकरून लोकां मध्यें मात्र असा हा डच्या उच्चारणांत फेर पडतो. परंतु मला वाटतें हीं त्यांची चूक आहे. मुसलमान आदिकरून लोक तर केवळ डचा र सारिखाच उच्चार करितात, तो तर केवळ अप्रशस्त; परंतु मराठी शब्दांत शेवटल्या व मधल्या डच्या उच्चारांत आणि पहिल्या डच्या उच्चारांत किंचित् फेर असतो, यांत संशय नाहीं. **गडबड**, **भडभड्या**, यांत आणि **डाग**, **डुकर**, यांत, डच्या उच्चारणांत फेर आहे या विषयीं मला तर संशय वाटत नाहीं.

२२ **क्ष**, आणि **ज्ञ**, हीं अक्षरें बहुधा सर्व व्यंजनांत लेखितात, परंतु हें ठीक नव्हे; तीं संयुक्त व्यंजनें होत; तीं कशीं हें पुढें लौकरच समजण्यांत येईल.

आतां सर्वत्र परिपाठ पडला आहे म्हणोन, **क्ष**, आणि **ज्ञ** यांस

र्णानुक्रमांत धरिलें ह्मणोन चिंता नाहीं, परंतु व्याकरणा मध्यें मात्र त्यांचा या प्रमाणें भेद दाखविला पाहिजे.

२३ आतां स्वर व्यंजनांशीं मिळाल्यानें विशेष काय होतो तो सांगतों; व्यंजनास जेव्हां **अ** मिळतो तेव्हां त्याचें, ् असें जें अपूर्णपणाचें चिन्ह असतें तें मात्र जातें, परंतु **आ** मिळाला असतां तें जाऊन पुढें **ा** अशी खूण लिहितात, तिस **काना** ह्मणतात. स्वर, यांच्या खुणा, आणि त्या खुणांच्या संज्ञा खालीं लिहून दाखविल्या आहेत.

| स्वर. | खुणा. | संज्ञा. |
|---|---|---|
| आ | ा | काना |
| इ | ि | र्‍हस्व वेलांटी |
| ई | ी | दीर्घ वेलांटी |
| उ | ु अ० ु | र्‍हस्वउकारचिन्ह |
| ऊ | ू | दीर्घउकारचिन्ह |
| ऋ | ृ | र्‍हस्वऋकारचिन्ह |
| ॠ | ॄ | दीर्घऋकारचिन्ह |
| ऌ | ॢ | र्‍हस्वऌकारचिन्ह |
| ॡ | ॣ | दीर्घऌकारचिन्ह |
| ए | े | मात्रा |
| ऐ | ै | दुमात्रा |
| ओ | ो | कानामात्रा |
| औ | ौ | द्विमात्रकाना |
| अं | ं | अनुस्वार |
| अः | | विसर्ग |

व्यंजनास स्वर मिळविल्यानें अक्षरें कशीं होतात, व ते

मिळाले असतां व्यंजनास विशेष काय होतो, हें स्वर अनुक्रमानें खालीं लिहून दाखविलें आहे.

क् या व्यंजनास अ स्वर मिळतो, तेव्हां क, असें अक्षर सिद्ध होतें.

क्........आ...............का .......
क्........इ...............कि .......
क्........ई...............की .......
क्........उ...............कु .......
क्........ऊ...............कू .......
क्........ऋ...............कृ .......
क्........ॠ...............कॄ .......
क्........ऌ...............कॢ .......
क्........ॡ...............कॣ .......
क्........ए...............के .......
क्........ऐ...............कै .......
क्........ओ...............को .......
क्........औ...............कौ .......
क्........अं...............कं .......
क्........अः...............कः .......

२४ या प्रमाणें कोणत्याही व्यंजनास अनुक्रमें स्वर मिळविले म्हणजे त्या पंक्तीस **बाराखडी** म्हणतात.

(अ) यांत बहुधा ऋ, ॠ, ऌ, ॡ, हे स्वर व्यंजनांशीं मिळवून पंतोजी सांगत नाहींत.

(आ) उच्या खुणा दोन सांगितल्या, त्यांत ु ही शेवटली खूण, ज्या वर्णास स्वाभाविक काना असतो त्यास मात्र विकल्पें लिहितात. र यास निरंतर उची ही शेवटलीच

ढून लिहितात; जसें—रु; व दीर्घ रू या प्रमाणें काढितात.

---

## भाग १.

### जोडाक्षरविचार.

२५ **जोडाक्षर** ह्मणजे जोडलेलें अक्षर, हा अर्थ तर उघडाच आहे, परंतु अर्थविस्तार केला असतां असा आहे कीं, दोन किंवा अधिक व्यंजनांस पुढें एकादें अक्षर जोडिल्यानें, अथवा दोन किंवा दोहों पेक्षां अधिक व्यंजनें एकत्र जोडून मग त्यांस स्वराचा योग केल्यानें, जोडाक्षरें होतात; जसें—क् यास **अ** मिळविल्यानें **क**, **आ** मिळविल्यानें **का**, **इ** मिळविल्यानें **कि**; इ०.

२६ हीं जोडाक्षरें काढायाची रीति अशी आहे कीं, जें जोडाक्षर लिहायाचें असेल त्याचा पहिला वर्ण अर्धा काढून पुढें दुसरें अक्षर लिहावें. **ग्म** लिहायाचा आहे असें मनांत आणा; आतां पाहा—पूर्व **ग** हा **ग्** असा अर्धा काढून त्यास **म** जोडिला ह्मणजे या प्रमाणें **ग्म** हें अक्षर सिद्ध होतें; याच प्रमाणें **ग्म्य**, **क्त्य**, त्स्यू, इत्यादि तीन वर्णांचीं जोडाक्षरें जाणावीं. ज्या वर्णास स्वाभाविक काना असतो, त्याचा तो काढून टाकिला ह्मणजे त्या वर्णाचा आकार अर्धा होतो.

२७ कोणत्याही व्यंजनास **र** जोडणें तर ् हें चिन्ह जोडितात; परंतु ज्या व्यंजनास स्वाभाविक काना असतो त्यास **र** जोडणें तर त्याच्या कान्यास डावे कडे ् ही अशी रेघ ओढितात; जसें—**क्र**, **प्र**, **म्र**, **स्र**, इ०. परंतु ज्यास तो स्वभाविक काना नसतो, त्यास खालीं ् असें चिन्ह लिहिल्यानें **र** जोडिला जातो; जसें—छ्र, ट्र, ठ्र, ड्र, ढ्र, इ०.

तात्पर्य हेंच कीं, ृ या वर्णाची दुसऱ्या प्रकारची आकृति ॒ अशी आहे, तिचा हा अंश जोडितात.

२८ ज्यास स्वाभाविक काना नसतो, त्यास जर कोणतेंही अक्षर जोडणें तर, जें जोडायाचें तें अक्षर त्याच्या खालीं लिहावें, ही उत्तम रीति; परंतु कधीं त्याच्या शेजारीं ही लिहितात. परंतु अक्षरां वरील जी स्वाभाविक रेघ ती त्यांस एकच असली पाहिजे; जसें—ट्म टम, ट्क टक, ड्न डन, क्ल कल, इ०.

२९ जोडाक्षरां मध्यें र अंमळ विलक्षण आहे; पाहा, त्यास कोणतेंही अक्षर किंवा अक्षरें जोडणें तर, त्याच अक्षरा वर ॅ अशी खूण करावी लागती; या चिन्हास **रेफ** अशी संज्ञा आहे; उदाहरण—**र्क, र्म, र्गा, र्चि, र्ध्य,** इ०.

३० कित्येक जोडाक्षरें दोन रीतींनीं लिहितात, त्यांत जीं विपरीत असतात, तीं लिहिण्यांत फार, दुसरीं क्वचित. तीं शिकणारांनीं ध्यानांत धरावीं. **त्र** हें **त्र** होय; **क्र** हें **क्र**; **क्त** हें **क्त**; **त्त** हें **त्त**; **स्त्र** हें **स्त्र**; **स्थ** हें **स्थ**; **ह्य** हें **हय**; **ह्म** हें **हम** अ० **म्ह**; **द्य** हें **दय** होय.

३१ **श** या अक्षरास र, ल, व, न, आणि च, हीं अक्षरें जोडायाचीं असलीं तर, त्याचें बहुत करून **श्** असें रूपांतर होतें; जसें—**श्री, श्ला, श्वा, श्न, श्च.**

---

## भाग २.

### स्थानविचार.

३२ ज्या वर्णाचें उच्चारण मुखाच्या ज्या स्थाना पासून घडतें, तें त्या वर्णाचें **स्थान** होय.

अ, आ, क, ख, ग, घ, ङ, ह, यांचें **कंठस्थान**. हे वर्ण **कंठ्य** जाणावे.

इ, ई, च, छ, ज, झ, ञ, य, श, यांचें **तालुस्थान**. हे वर्ण **तालव्य** जाणावे.

ऋ, ॠ, ट, ठ, ड, ढ, ण, र, ष, ळ, यांचें **मूर्द्धस्थान**. हे वर्ण **मूर्द्धन्य**.

ऌ, ॡ, त, थ, द, ध, न, ल, स, यांचें **दंतस्थान**. हे वर्ण **दंत्य**.

उ, ऊ, प, फ, ब, भ, म, यांचें **ओष्ठस्थान**. हे वर्ण **ओष्ठ्य**.

ए, ऐ, ............... यांचें **कंठतालुस्थान**. हे वर्ण **कंठतालव्य**.

ओ, औ, यांचें **कंठोष्ठस्थान**. हे वर्ण **कंठोष्ठ्य**.

व, ...... यांचें **दंतोष्ठस्थान**. हा वर्ण **दंतोष्ठ्य**.

च, छ, ज, झ यांचें **दंततालुस्थान**. हे वर्ण **दंततालव्य**.

अनुस्वाराचें **नासिकास्थान** जाणावें.

विसर्गाचें **कंठस्थान** जाणावें.

ङ्, ञ्, ण्, न्, म्, यां वर्णांचीं पूर्वोक्त तीं तीं स्थानें असून, आणखी यांचें **नासिकास्थानहि** होय. हे वर्ण **अनुनासिक** जाणावे.

---

## भाग ३.

### संधिविचार.

३२ दोन वर्ण जेथें एक रूपानें मिळतात त्या स्थळीं यांचा **संधि** ह्मणतात.

३४ दोन **स्वर** जेथें एक रूपानें मिळतात त्या संधीस **अच्संधि**,* अथवा **स्वरसंधि** ह्मणतात.

३५ दोन व्यंजनें जेथें एक रूपानें मिळतात त्या संधीस **हल्संधि** अथवा **व्यंजनसंधि** ह्मणतात.

वास्तविक पाहिलें असतां, हें संधिप्रकरण संकृत व्याकरणाचा भाग होय; शुद्ध मराठी शब्दांचा संधि होत नाहीं. तथापि या भाषेंत संधि जाणण्यास अथवा करण्यास विरळा प्रसंग येतो असें नाहीं; कांकि या भाषेंत संस्कृत शब्दांचा भरणा फार आहे म्हणोन संस्कृताच्या नियमा प्रमाणें **संधि** करण्याचा वारंवार प्रसंग पडतो, या करितां या प्रकरणीं उपयुक्त नियम सांगणें आवश्यक आहे.

संस्कृत व्याकरणांत हा संधि साधण्या करितां वर्णांची कृत्रिम रचना केली आहे, त्या सारिखी कांहींशी रचना करून एथें हल्संधिप्रकरणीं दाखविली आहे.

---

## विभाग १.

### अच्संधि अ० स्वरसंधि.

३६ मुख्यस्वरांतून एकजातीय दोन स्वर असले तर त्या दोहोंचा संधि दीर्घ होतो;— **अ** किंवा **आ** आदीं असून, पुढें **अ** किंवा **आ** आला, तर त्या दोहों स्वरांच्या स्थानीं **आ** असा दीर्घ आदेश होतो. तसेंच **इ** किंवा **ई** यांच्या पुढें इ किंवा ई असतां त्यांच्या स्थानीं ई आदेश होतो; या वरून पुढें जाणावें.

---

*संस्कृत व्याकरणांत स्वरांस बहुतकरून **अच्** ह्मणतात, आणि व्यंजनांस **हल्** ह्मणतात. हीं नावें, संस्कृतांत प्रत्याहार ह्मणून जी हा संधि करण्याकरितां वर्णरचना करून दाखविली आहे, त्या वरून पडलीं आहेत. संस्कृत व्याकरणांत याच संज्ञा फार प्रसिद्ध आहेत, ह्मणोन एथेंही त्यांचेंच ग्रहण केलें आहे.

उदाहरणें.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वस्त्र + अन्न = वस्त्रान्न. | हरि + इच्छा = हरीच्छा. |
| धर्म + आश्रय = धर्माश्रय. | करी + इंद्र = करींद्र. |
| गंगा + अर्पण. = गंगार्पण. | भानु + उदय = भानूदय. |
| रंभा + आज्ञा = रंभाज्ञा. | भू + उत्तर = भूत्तर. |

पितृ + ऋण = पितॄण.

२७ **अ** किंवा **आ**, आणि दुसरे विजातीय स्वर यांचे संधि येणेंप्रमाणें होतात;—ह्मणजे, पूर्वी **अ** किंवा **आ** असून पुढें जर **इ** किंवा **ई** असला, तर या उभय स्वरांच्या स्थानीं ए आदेश होतो; **उ** किंवा **ऊ** असला, तर **ओ**; **ऋ** किंवा **ॠ** असला तर **अर्**; **ऌ** असला तर **अल्**; ए किंवा ऐ असला तर ऐ; आणि **ओ** किंवा **औ** असला तर **औ** असे आदेश होतातः—

उदाहरणें.

| | |
|---|---|
| मुख + इंदु = मुखेंदु. | तव + ऋद्धि = तवर्द्धि. |
| सुर + ईश्वर = सुरेश्वर. | एक + एक = एकैक. |
| शीत + उष्ण = शीतोष्ण. | देव + ऐश्वर्य = देवैश्वर्य. |
| गंगा + उदक = गंगोदक. | गंगा + ओघ = गंगौघ. |

माया + औपाधिक = मायौपाधिक.

२८ मुख्यस्वरांतले **अ आ** यां शिवाय इतर जे स्वर, त्यांचा मुख्यस्वरांशीं अथवा संयुक्तस्वरांशीं या प्रमाणें संधि होतो:— **इ ई** यांच्या स्थानीं **य्**; **उ ऊ** यांच्या स्थानीं **व्** **ऋ ॠ** यांच्या स्थानीं **र्**; **ऌ**च्या स्थानीं **ल्**; एच्या स्थानीं **अय्**; ऐच्या स्थानीं **आय्**; **ओ**च्या स्थानीं **अव्**; आणि **औ**च्या स्थानीं **आव्**; असे आदेश होतातः—

उदाहरणें.

| | |
|---|---|
| इति + अर्थ = इत्यर्थ. | मातृ + अर्थ = मात्रर्थ. |
| प्रति + उत्तर = प्रत्युत्तर. | पितृ + आनंद = पित्रानंद |
| गौरी + आनंद = गौर्य्यानंद. | ऌ + अनुबंध = लनुबंध. |
| मनु + अंतर = मन्वंतर. | ने + अनं = नयनं. |

गो + उत्साह = गवुत्साह.

इ० इ०

या अच्‌संधी मध्यें दोन प्रकार आहेत;-- एक **गुण**, आणि एक **वृद्धि**.

३९ जेव्हां इचा ए होतो, उचा **ओ**, ऋचा **अर्**, आणि ऌचा **अल्** होतो, तेव्हां त्या विकारास **गुण** ह्मणतात.

४० जेव्हां अचा **आ**, इ आणि ए यांचा ऐ, उ आणि **ओ** यांचा **औ**, ऋचा **आर्**, आणि ऌचा **आल्** होतो, तेव्हां त्या विकारास **वृद्धि** ह्मणतात.

---

## विभाग २.

### हल्‌संधि अ० व्यंजनसंधि.

४१ व्यंजनांचे संधि स्पष्ट कळाया करितां अगोदर प्रत्याहार सांगतों.

**अ, इ, उ; ऋ, ऌ; ए, ओ; ऐ, औ;**
**ह, य, व, र; ल; ञ, म, ङ, ण, न; झ, भ;**
**घ, ढ, ध; ज, ब, ग, ड, द; ख, फ, छ,**
**ठ, थ, च, ट, त; क, प; श, ष, स; ह.**

यां मध्यें असा नियम आहे कीं, या वरल्यां विभागांत कोणतेहि दोन वर्ण ह्मटले ह्मणजे त्यांत त्यां सुद्धां त्यां दोहों मधल्या

सर्व वर्णांचा समावेश जाणावा; जसें;— **अ–ऌ** ह्मटलें ह्मणजे **अ, इ, उ, ऋ, ऌ,** इतक्या वर्णांचा प्रत्याहार जाणावा ; तसेंच **अ–ब** ह्मटलें ह्मणजे त्यांत **अ** पासून **ब** पर्यंत जितके वर्ण आहेत त्यां सर्वांचा समावेश होतो; तसेंच **ज–द** ह्मटलें ह्मणजे यांत **ज, ब, ग, ड, द,** इतके वर्ण येतात, असें जाणावें.

४२ आतां व्यंजनांच्या संधी विषयीं सामान्य नियम असा आहे कीं, पदाच्या अथवा शब्दाच्या अंतीं **झ–ह** (एथें शिकणारानें लक्षांत ठेवावें कीं **झ–ह** ह्मटलें ह्मणजे **झ** पासून **ह** पर्यंत जितके वर्ण ते सारे) असतां पुढें कोणताहि वर्ण येऊ अथवा नयेऊ तथापि विवक्षा असतां त्याच्या स्थानीं **ज–द** होतो; ह्मणजे **क्** अ० **ख्** यांच्या स्थानीं **ग्**; **च्** अ० **छ्** यांच्या स्थानीं **ज्**; **ट्** अ० **ठ्** यांच्या स्थानीं **ड्**; **त्** अ० **थ्** यांच्या स्थानीं **द्**; आणि **प्** अ० **फ्** यांच्या स्थानीं **ब्** आदेश होतो:—

## उदाहरणें.

| | |
|---|---|
| वाक् + वर = वाग्वर. | षट् + रिपु = षड्रिपु. |
| वाक् + ईश = वागीश. | तत् + आश्रय = तदाश्रय. |
| अच् + अंत = अजंत. | अप् + द = अब्द. |
| इ०. | इ०. |

यांत नियम हाच कीं, पुढें वर्ण नसतां विकल्पें **ज–द** होतो, आणि पुढें वर्ण असल्यास **ज–द** केलाच पाहिजे.

४३ यांत आणखी असा नियम आहे कीं, पूर्वीं **त्, थ्, द्, ध्, न्,** असून जर पुढें **च्, छ्, ज्, झ्, ञ्,** अथवा **ट्, ठ्, ड्, ढ्, ण्,** हे वर्ण आले, तर त्यांच्या स्थानीं पुढल्या वर्णांचा

आदेश होतो; परंतु छ् अ० झ्, आणि ट् अ० ढ् यांच्या स्थानीं सवर्णाचा आदेश नहोतां च् अ० ञ्, आणि ट् अ० ड् याच वर्णांचा अनुक्रमें आदेश होतो:—

उदाहरणें.

| | |
|---|---|
| तत् + चरित्र = तच्चरित्र. | सत् + जन = सज्जन. |
| तद् + छत्र = तच्छत्र. | तत् + टीका = तट्टीका. |

भगवत् अ० द् + डमरु = भगवड्डमरु.

४४ तवर्गा पुढें ल् असतां तवर्गाच्या स्थानीं ल आदेश होतो; जसें—भगवत् + लीला = भगवल्लीला.

४५ तवर्गा पुढें श् असतां तवर्गाच्या स्थानीं चवर्ग, आणि श्च्या स्थानीं छ् असे आदेश होतात:—

उदाहरणें.

सत् + शास्त्र = सच्छास्त्र | तद् + श्लोक = तच्छ्लोक.

४६ झ–प पुढें जर ह् असला, आणि त्यांचा संधि कर्तव्य आहे, तर ह्च्या स्थानीं विकल्पें पूर्व वर्णाच्या वर्गांतील जे चतुर्थ वर्ण झ्, भ्, घ्, ढ्, ध् यांचा त्याच्या त्याच्या सवर्णा प्रमाणें आदेश होतो:—

उदाहरणें.

वाक् अ० ग् + हरि = वाग्हरि अ० वाग्घरि.
अच् अ० ज् + हल् = अज्हल् अ० अज्झल्.
षट् अ० ड् + हृदय = षड्हृदय अ० षड्ढृदय.
एतत् अ० इ० द् + हवि = एतद्हवि अ० इ० एतद्धवि.

४७ य–स जर शब्दाच्या अंतीं आहेत, आणि त्यां पुढें

ञ्, म्, ङ् ण् न्, यांतून कोणताहि अनुनासिक वर्ण आला तर पूर्व वर्णाच्या स्थानीं विकल्पें सवर्ण अनुनासिक आदेश होतो:–

उदाहरणें.

वाक् + मन = वाङ्मन अ० वाग्मन.

षट् + मास = षण्मास अ० षड्मास.

चित् + मय = चिन्मय अ० चिद्मय.

तत् + नयन = तन्नयन अ० तद्नयन.

हा संधिविचार संस्कृतांत फार मोठा आहे, म्हणोन त्यांतले जे मुख्य मुख्य नियम, ज्यांच्या मराठींत उपयोग पडतो, ते एथें सांगितले आहेत. त्यांत या हल्संधीचे जे नियम एथें सांगितले आहेत त्यांस कित्येक बाधकहि नियम आहेत, परंतु तितक्या बारकाईत जाण्याचें एथें कांहीं प्रयोजन दिवस नाहीं. या इतक्या नियमां वरून प्राकृतांत बहुधा सर्वत्र निर्वाह होईल असा मला भरंवसा आहे.

---

## खंड ३.

### शब्दविचार.

४८ या विचारा मध्यें भाषेस मूलरूप जे शब्द, त्यांची उत्पत्ति, साधन, जाति, आणि इतर शब्दांशीं त्यांचा संबंध, यां विषयीं विचार सांगितला आहे.

**भाषा** ह्मणजे मनुष्यांस व्यवहारांत परस्पराचे मनोभाव समजावे ह्मणोन परंपरागत शब्दांचें अवलंबन करून मुखानें जें बोलतात तें होय. या वरून अनुमान केलें असतां होईल कीं, भाषे मध्यें शब्दमात्रास नियम असावे; हे नियम कसकसे हा विचार या पुढल्या भागांत केला आहे.

कदाचित् कोणीं शिकणारानें पहिल्यानेंच पुसलें कि, भाषेंत नियम आहेत ? तर त्याणें समजावें कि, जर भाषेंत, नियम नसते तर भाषाच नसती; कांकि जेव्हां मुलें लहान असतात, त्या काळीं 'बाबा आला,' 'आई आली,' 'पोर आलें,' असें म्हणतात; नियम नसता तर या तिघांस **आला**, **आली**, **आलें**, अशीं निराळीं रूपें कां असतीं! बाबा पुरुष आहे, म्हणोन त्यास **आला**; आई स्त्री आहे म्हणोन तीस **आली**; आणि पोर हलकें, अथवा तेथे मुलगा किंवा मुलगी अशी विवक्षा नाहीं म्हणोन त्यास **आलें**, असें म्हणतात; यासच नियम म्हणावा; जर हा नियम नसता, तर एक मूल 'बाबा आली,' दुसरें मूल 'आई आला,' 'टिपू आलें,' आणि तिसरें मूल या परीस विलक्षण म्हणतें; कांकि मग कोणत्याहि गोष्टीचा नियमच न राहता; परंतु पुरुषाला पुरुषा प्रमाणें, स्त्रीला स्त्री प्रमाणें म्हणावें, हा त्यांच्या वडिलांचा परंपरागत नियम आहे, म्हणोन पुढें मुलेंहि यासच अनुसरून बोलतात.

४९ **शब्द** ह्मणजे ज्या पासून अर्थ निष्पन्न होतो असा जो मुखांतून एकवर्णात्मक अथवा बहुवर्णात्मक ध्वनि निघतो तो; अथवा, त्यास दाखविणारा जो लिहिलेला वर्णसमुच्चय त्यासहि **शब्द** ह्मणावें. जसें—तो, हा, घोडा, मनुष्य, खटपट, इत्यादि प्रत्येक शब्द जाणावे.

या प्रमाणें वैय्याकरणांची शब्दाची व्याख्या होय. वेदांती व नैय्यायिक हे तर श्रोत्रेंद्रियविषयक जो ध्वनि त्यास **शब्द** म्हणतात, मग तो सार्थ अथवा व्यर्थ कां असेना.

५० शब्द दोन प्रकारचे—**सिद्ध** आणि **साधित**.

५१ **सिद्ध** शब्द ह्मणजे जे शब्द इतर शब्दां पासून व्युत्पन्न नसून, स्वतःसिद्ध असतात ते; जसें— घोडा, लांकूड, डोळा, नाक, तोंड, इ०.

५२ **साधित** शब्द ह्मणजे जे इतर शब्दां पासून

व्युत्पन्न झाले असतात; जसें—शास्त्री, विद्वान्, याज्ञिक, नैय्यायिक, लांकूडतोड्या, वाघनख्या, इ०.

वास्तविक विचार केला असतां असें ध्यानांत येतें कीं, कोणत्याहि भाषेंत केवळ सिद्ध शब्द तर फार थोडे निघतील; कांकिं भाषेंत जे शब्द वाढतात, ते बहुधा प्रत्ययांच्या उपसर्गांच्या अथवा समासाच्या योगेंकरून; तेव्हां केवळ मूळ प्रकृतीलाच जर सिद्ध शब्द ह्मटलें तर असे सिद्ध शब्द फार थोडे निघतील. त्यांत आणखी कित्येक शब्दांच्या व्युत्पत्तीचें ज्ञान होत नाहीं, तेव्हां अर्थात् तें ज्ञान होई तों पर्यंत त्यांस सिद्धच ह्मटलें पाहिजे; यास उदाहरणः—**माती** ह्मटलें असतां सामान्यतः सर्वांस पहिल्या दृष्टीस सिद्ध शब्दसा दिसतो; परंतु अंमळ विचार करून पाहिलें असतां लागलेंच समजतें कीं, हा संस्कृत शब्द जो **मृत्तिका** त्याचा अपभ्रंश होय. परंतु पुनः मनांत आशंका उत्पन्न होत्ये कीं, **मृत्तिका** हा तरी मुळचा सिद्ध शब्द आहे काय? तर नाहीं. मूळ **मृत्** शब्दा वरून स्वार्थी **तिकन्** प्रत्यय होऊन पुढें त्यास स्त्रीलिंगीं **टाप्** प्रत्यय होऊन **मृत्तिका** शब्द संस्कृतांत सिद्ध झाला आहे. तेव्हां अशा विचाराच्या जाळांत सर्व पडले असतां निर्वाह लागणार नाहीं; अतएव, असा विवाद नकरितां सामान्यतः व्याकरणाचा व्यवहार चालविण्या करितां ज्या कोणास एकाद्या शब्दाची व्युत्पत्ति माहित नसेल त्याणें त्यास सिद्ध शब्द ह्मटलें असतां त्यांत दोष आहे असें कोणीं मानूं नये.

५२ या साधित शब्दां मध्यें **सामासिक** शब्द असा आणखी एक भेद आहे. दोन अथवा अधिक शब्दांचा संयोग होऊन त्यांचा एक शब्द होतो तो **सामासिक** शब्द; जसें—आईबापें, बहिणभावंडें, भक्तिरस, कृपावलोकन, चक्रपाणि, इत्यादि.

---

# भाग १.

## सविभक्तिकशब्दविचार.

५४ आणखी प्रक्रिये वरून व्याकरणांत शब्दांचे मुख्य दोन भेद आहेत; एक **सविभक्तिक**, आणि दुसरा **अविभक्तिक** अ० **अव्यय**.

५५ **सविभक्तिक** शब्द ह्मणजे ज्यां वरून विभक्तिकार्यें होतात असे शब्द; जसें—राम, घर, मी, बरा, जाणें, येणें, इ०.

५६ **अविभक्तिक** अ० **अव्यय** ह्मणजे ज्यां वरून विभक्तिकार्यें होत नाहींत असे शब्द; जसें--सटकन, आणि, जर, खालीं, छिः, इ०.

५७ महाराष्ट्र भाषेंत शब्दांचे आठ वर्ग अथवा जाति आहेत; त्यांत सविभक्तिकांत चार— **नाम**, **सर्वनाम**, **विशेषण**, **क्रियापद**; आणि अविभक्तिकांत अथवा अव्ययांत चार— **क्रियाविशेषण**, **उभयान्वयी**, **शब्दयोगी** आणि **केवलप्रयोगी** अ० **उद्गारवाची**, मिळून आठ.

या व्याकरणाच्या प्रथमावृत्तींत शब्दांच्या जाति पांच केल्या होत्या परंतु त्यांत सविभक्तिकादि मुख्य भेद दर्शविले नव्हते; हे भेद दर्शविल्या वर या आठ जाति पृथक् कल्पिणें कांहीं अप्रशस्त नाहीं, असें माझ्या एका विद्वान् मित्राचें मत पडलें, व तें मला प्रशस्त दिसलें, या वरून या आठ जाति एथें दर्शविल्या आहेत.

तथापि या शब्दांच्या जाती विषयीं निरनिराळ्या पंडितांचीं निरनिराळीं मतें पडलीं असतां नवल नाहीं. अव्ययांत जे चार भेद सांगितले आहेत त्यांचा अंतर्भाव एका अव्ययांत करून पांच जाति मानिल्या असतां होतील; कोणी नुसतें क्रियाविशेषण अव्यय मात्र निराळें मानून सहा गणितात. या प्रमाणें भिन्न

भिन्न मतांचा संभव आहे; परंतु विचारपूर्वक पाहिलें असतां या भाषेंत शब्दांच्या पूर्वोक्त आठ जाति मानणें हेंच प्रशस्त दिसतें.

५८ **नाम** ह्मणजे पदार्थ मात्राचें नांव, मग ते पदार्थ प्रत्यक्ष दिसोत, अथवा त्यांचा नुसता संस्कार मनाच्या ठायीं होऊ; जसें—मनुष्य, पोथी, लेखणी, अहंकार, राग, इ०.

५९ **सर्वनाम** ह्मणजे नामाचा वारंवार उच्चार न व्हावा, ह्मणोन समयविशेषीं त्याच्या स्थानीं जे शब्द येतात ते प्रत्येक ; जसें—मी, तूं, हा, जो, ती, तें, इ०.

६० **विशेषण** ह्मणजे नामाच्या गुणाचा दर्शक जो शब्द तो; जसें—काळा, गोरा, बरा, वाईट, लंगडा, शहाणा, मूर्ख, इ०.

६१ **क्रियापद** ह्मणजे ज्या शब्देंकरून कोणत्याहि क्रियेचा अथवा स्थितीचा बोध होतो तो ; जसें—करणें, बोलणें, चालणें, निजणें, असणें, इ०.

६२ **क्रियाविशेषण** ह्मणजे ज्या शब्देंकरून क्रियेच्या गुणाचा अथवा प्रकाराचा बोध होतो तो शब्द; जसें—हळू, झट्कन, त्वरित, भडभडां, इ०.

६३ **उभयान्वयी अव्यय** ह्मणजे ज्या शब्दांच्या योगें-करून दोन शब्द अथवा दोन वाक्यें यांचा अन्वय होतो ते ; जसें—आणि, व, जर, तर, परंतु, तथापि, इ०.

६४ **शब्दयोगी अव्यय** ह्मणजे ज्या शब्दांचा प्रयोग नामवाचक शब्दांशींच होतो, व ज्या शब्दांशीं यांचा संबंध असतो, त्यांचें यांच्या योगानें सामान्यरूप होतें ; जसें —वर, खालीं, कडे, मध्यें, पुढें, मागें, इ०. यांत **शुद्ध शब्दयोगी** अव्यय ह्मणून एक उपभेद आहे त्याच्या योगानें हें सामान्यरूप होत नाहीं.

६५ **केवलप्रयोगी अव्यय** अ० **उद्गारवाची अव्यय** ह्मणजे जेणेंकरून मानसिक विकारांचा उद्बोध होतो असे जे उद्गाररूप शब्द ते; जसें—छिः, वाःवा, अंः, बबब, इ०.

---

## विभाग १.

### नामविचार.

६६ **नाम** ह्मणजे पदार्थमात्राचें नांव, मग ते पदार्थ प्रत्यक्ष दिसोत, अथवा त्यांचा नुसता संस्कार मनाच्या ठायीं असो; जसें—मनुष्य, पोथी, लेखणी, अहंकार, राग, इ०.

६७ या नामांत **सामान्य, विशेष,** आणि **भाववाचक,** असे तीन भेद आहेत.

६८ नामांस **लिंग, वचन,** आणि **विभक्ति,** हीं असतात.

६९ **सामान्यनाम** ह्मणजे जातिबोधक संज्ञा, ज्यांत या नामजातीचा धर्म अनेकांवर राहतो; जसें—मनुष्य, झाड, पशु, घर, इ०. यांत मनुष्य या शब्दाचा प्रयोग सर्व मनुष्यजाती वर होतो.

यांत मनुष्य, झाड, इ० सामान्य नामांतील एक एक निराळी जाती घेतली तथापि तेंहि सामान्यनाम होतें; जसें-ब्राह्मण, आंबा, गाय, इ०. यांत ब्राह्मण हेंहि सामान्य नाम; कारण, ब्राह्मण्यरूप जो कांहीं त्याज वर आरोपित धर्म तो एका वरच आहे असें नाहीं, जेवढे ब्राह्मण तेवढयां वर तो आहे ह्मणोन हेंहि **सामान्यनाम** होय. तसेच आणखी शब्द आणावे.

७० **विशेषनाम** ह्मणजे व्यक्तिबोधक संज्ञा, ज्यांत या नामाचा धर्म एका वरच राहतो; जसें—कृष्ण, काशी, भागीरथी, खंडू, इ०.

विशेषनामाचें मुख्य लक्षण असें आहे कीं, तें एकाच अधिकरणास धरून राहतें; या वरून जितकीं ठेविलेलीं अथवा दिलेलीं नांवें तितकीं सारीं विशेषनामें जाणावीं. जसें— मनुष्य, नदी, पर्वत, इत्यादिकांचीं जीं नांवें तीं सारीं विशेषनामें. जसें—रामा, हरि, दादा, तात्या, मनी, गंगा, सह्याद्रि, इ०.

कदाचित् कोणी असा आक्षेप घेईल कीं विशेषनामा मध्येंहि सामान्यनामाचें लक्षण उमगतें; जसें—**मनी** म्हटलें असतां एकच मनी आहे असें नाहीं, या नांवाच्या व्यक्ति पुष्कळ असतात; तर असें नव्हे;—ठेविलेलीं जितकीं नांवें तितकीं सारीं विशेषनामें होत; कारण, जरीं मनी एकच नाहीं असें दिसतें, तरीं वस्तुतः पाहिलें असतां उक्त जी मनी ती एकच होय; हें कांहीं जातिबोधक नांव नव्हे; एका मनीचें जें कांहीं लक्षण तेंच दुसऱ्या मनींत असतें असें नाहीं; अथवा, एका मनीच्या लक्षणा प्रमाणें दुसरी स्त्री असली ह्मणजे तिला मनीच नांव देतात असेंही नाहीं, हें केवळ स्वेच्छे प्रमाणें एका व्यक्तीस ओळखाया करितां नांव दिलें असतें, ह्मणोन मनी हें विशेषनाम.

आतां 'तो रावण आहे,' 'तो कर्ण आहे,' 'सर्व बाया लक्ष्मी नसतात', अशा ठिकाणीं विशेषनामाचा प्रयोग सामान्यनामा प्रमाणें करितात, तथापि वस्तुतः हें विशेषनामच होय. 'तो कर्ण आहे,' म्हणजे कर्णनामा कोणी दातृत्वगुणविशिष्ट प्रख्यात पुरुष होऊन गेला त्या सारिखा दाता आहे असा अर्थ. असा बोलण्याचा प्रकार एक वाक्यालंकार होय, ज्यास उपमा असें म्हणतात. अथवा एथें **कर्ण** या शब्दाचा विशेषणा सारिखा प्रयोग केला आहे असें मानिलें तरीं चालेल.

७१ ज्या नामां वरून कोणत्याहि व्यक्तीचा शुद्ध भाव अथवा धर्म यांचा उद्बोध होतो तीं सारीं भाववाचकनामें; असें— काळेपणा, उधळेपणा, मैत्री, इष्टत्व, औदार्य, इ०.

६५ **केवलप्रयोगी अव्यय** अ० **उद्गारवाची अव्यय** ह्मणजे जेणेंकरून मानतिक विकारांचा उद्बोध होतो असे जे उद्गाररूप शब्द ते; जसें–छि:, वा:वा, अं:, बबब, इ०.

---

## विभाग १.

### नामविचार.

६६ **नाम** ह्मणजे पदार्थमात्राचें नांव, मग ते पदार्थ प्रत्यक्ष दिसोत, अथवा त्यांचा नुसता संस्कार मनाच्या ठायीं असो; जसें–मनुष्य, पोथी, लेखणी, अहंकार, राग, इ०.

६७ या नामांत **सामान्य**, **विशेष**, आणि **भाववाचक**, असे तीन भेद आहेत.

६८ नामांस **लिंग**, **वचन**, आणि **विभक्ति**, हीं असतात.

६९ **सामान्यनाम** ह्मणजे जातिबोधक संज्ञा, ज्यांत या नामजातीचा धर्म अनेकां वर राहतो; जसें–मनुष्य, झाड, पशु, घर, इ०. यांत मनुष्य या शब्दाचा प्रयोग सर्व मनुष्यजाती वर होतो.

यांत मनुष्य, झाड, इ० सामान्य नामांतील एक एक निराळी जाती घेतली तथापि तेंहि सामान्यनाम होतें; जसें-ब्राह्मण, आंबा, गाय, इ०. यांत ब्राह्मण हेंहि सामान्य नाम; कारण, ब्राह्मण्यरूप जो कांहीं त्याज वर आरोपित धर्म तो एका वरच आहे असें नाहीं, जेवढे ब्राह्मण तेवढयां वर तो आहे ह्मणोन हेंहि **सामान्यनाम** होय. तसेंच आणखी शब्द जाणावे.

७० **विशेषनाम** ह्मणजे व्यक्तिबोधक संज्ञा, ज्यांत या नामाचा धर्म एका वरच राहतो; जसें–कृष्ण, काशी, भागीरथी, खंडू, इ०.

विशेषनामाचें मुख्य लक्षण असें आहे कीं, तें एकाच अधिकरणास धरून राहतें; या वरून जितकीं ठेविलेलीं अथवा दिलेलीं नांवें तितकीं सारीं विशेषनामें जाणावीं. जसें— मनुष्य, नदी, पर्वत, इत्यादिकांचीं जीं नांवें तीं सारीं विशेषनामें. जसें—रामा, हरि, दादा, तात्या, मनी, गंगा, सह्याद्रि, इ०.

कदाचित् कोणी असा आक्षेप घेईल कीं विशेषनामा मध्येंहि सामान्यनामाचें लक्षण उमगतें; जसें—**मनी** म्हटलें असतां एकच मनी आहे असें नाहीं, या नांवाच्या व्यक्ति पुष्कळ असतात; तर असें नव्हे;—ठेविलेलीं जितकीं नांवें तितकीं सारीं विशेषनामें होत; कारण, जरीं मनी एकच नाहीं असें दिसतें, तरीं वस्तुतः पाहिलें असतां उक्त जी मनी ती एकच होय; हें कांहीं जातिबोधक नांव नव्हे; एका मनीचें जें कांहीं लक्षण तेंच दुसऱ्या मनींत असतें असें नाहीं; अथवा, एका मनीच्या लक्षणा प्रमाणें दुसरी स्त्री असली ह्मणजे तिला मनीच नांव देतात असेंहीं नाहीं, हें केवळ स्वेच्छे प्रमाणें एका व्यक्तीस ओळखाया करितां नांव दिलें असतें, ह्मणोन मनी हें विशेषनाम.

आतां 'तो रावण आहे,' 'तो कर्ण आहे,' 'सर्व बाया लक्ष्मी असतात', अशा ठिकाणीं विशेषनामाचा प्रयोग सामान्यनामा प्रमाणें करितात, तथापि वस्तुतः हें विशेषनामच होय. 'तो कर्ण आहे,' म्हणजे कर्णनामा कोणी दातृत्वगुणविशिष्ट प्रख्यात पुरुष होऊन गेला त्या सारिखा दाता आहे असा अर्थ. असा बोलण्याचा प्रकार एक वाक्यालंकार होय, ज्यास उपमा असें म्हणतात. अथवा एथें **कर्ण** या शब्दाचा विशेषणा सारिखा प्रयोग केला आहे असें मानिलें तरीं चालेल.

७१ ज्या नामां वरून कोणत्याहि व्यक्तीचा शुद्ध भाव अथवा धर्म यांचा उद्बोध होतो तीं सारीं भाववाचकनामें; असें— काळेपणा, उघळेपणा, मैत्री, इष्टत्व, औदार्य, इ०.

## वर्ग १.

### लिंगविचार.

७२ नाममात्रास लिंग असतें. तीं लिंगें तीन आहेत—**पुल्लिंग**, **स्त्रीलिंग**, आणि **नपुंसकलिंग.**

७३ ज्यां नामेंकरून प्राणिवाचक अथवा अप्राणिवाचक पदार्थांच्या पुरुषत्वाचा बोध होतो त्यांस, अथवा त्यांचें **पुल्लिंग** ह्मणतात; जसें—रामा, मुलगा, वाघ, बैल, आंबा, बडगा, इ०.

७४ ज्यां नामेंकरून प्राणिवाचक अथवा अप्राणिवाचक पदार्थांच्या स्त्रीत्वाचा बोध होतो त्यांस, अथवा त्यांचें **स्त्रीलिंग** ह्मणतात, जसें—जानकी, मुलगी, वाघीण, गाय, चिंच, काठी, इ०.

७५ ज्यां नामेंकरून प्राणिवाचक अथवा अप्राणिवाचक पदार्थांच्या पुरुषत्वाचा अथवा स्त्रीत्वाचा बोध होत नाहीं, परंतु जीं सामान्येंकरून सर्व जातीचीं अथवा त्या जातींतल्या एकाद्या क्षुद्र व्यक्तीचीं वाचकें असतात त्यांस, अथवा त्यांचें **नपुंसकलिंग** ह्मणतात; जसें—माणूस, ढोर, कुत्रें, लांकूड, तेल, इ०.

७६ ज्यां नामेंकरून वर सांगितल्या कोणत्याहि लिंगाचा ज्या काळीं एकाद्या वाक्या मध्यें निश्चय करितां येत नाहीं, त्या काळीं त्याचें **सामान्यलिंग** ह्मणावें; जसें—मित्र, मी, तूं, पक्षी, इ०.

७७ हा नामाचा लिंगभेद समजायास मुख्य साधन असें आहे कीं, ज्या नामां मागें तो हें सर्वनाम लागतें, तीं सारीं पुल्लिंग नामें जाणावीं; जसें—**आंबा ह्मटलें ह्मणजे** ‘**तो**

आंबा' असें लागतें, 'ती आंबा' अथवा 'तें आंबा' असें लागत नाहीं; ह्मणोन **आंबा** या नामाचें पुल्लिंग जाणावें. याच प्रमाणें **चिंच** ह्मटलें ह्मणजे 'ती चिंच' असें लागतें, ह्मणोन **चिंच** या नामाचें स्त्रीलिंग जाणावें. आणि **लांकूड** ह्मटलें ह्मणजे 'तें लांकूड' असें लागतें, ह्मणोन याचें नपुंसकलिंग जाणावें.

आतां जे प्राणिवाचक शब्द आहेत (जसें पुरुष, बायको घोडा, गायु, मांजर, इ० ) त्यांचें लिंगविवेचन करणें शक्य होय. कांकीं त्या मध्यें जे पुरुषजातीय प्राणी ते पुल्लिंग, स्त्रीजातीय ते स्त्रीलिंग, आणि ज्यांचें लिंगविवेचन करितां येत नाहीं (जसें–माणूस, कुत्रें, मूल, ढोर इ० ) ते नपुंसकलिंग जाणावें; परंतु अप्राणिवाचक अथवा निर्जीवपदार्थवाचक जीं नामें ( जसें-आंबा, चिंच, शाई, पेरू, इ०) यांसही पुंस्त्व, स्त्रीत्व, मानणें हें विचारपूर्वक पाहिलें असतां आपल्या भाषेंत मोठें आश्चर्य आहे; या लिंगभेदा वर नियम चालत नाहीं, एथें लोकव्यवहार हाच नियम; ह्मणोनच अन्यदेशी मनुष्यांस एकाएकीं शुद्ध बोलतां येत नाहीं. आपण नित्यशः पाहतों तैलिंग लोक कसें बोलतात तें ते 'लांकूड मोडला,' 'आह्मांस एवढाच दाक्षिणा दिल्हा' इत्यादि लिंगाच्या अज्ञानेंकरून अशुद्ध बोलतात.

. ७८ या लिंगानुशासना विषयीं असें अनुमान आहे कीं कोणत्याहि भाषेंत मुळीं नामांस लिंगें पडायास मुख्य तीन कारणें असतात;—एक तर त्यांचा अर्थ, दुसरें शब्दाचें शेवटील अक्षर अथवा प्रत्यय, आणि तिसरें शुद्ध लोकव्यवहार.

ज्यांत अर्था वरून जें लिंगविवेचन करितात तें असें कीं, जीं नामें पुंस्त्ववाचक अथवा बल, प्रताप, तेज, स्थौल्य, इत्यादि पुरुषधर्मांचीं प्रदर्शक असतात, तीं पुल्लिंग जाणावीं. जीं नामें स्त्रीत्ववाचक अथवा सौंदर्य, मार्दव, कोमलता, इत्यादि स्त्रीधर्मांचीं प्रदर्शक असतात, तीं स्त्रीलिंग

जाणावीं. आणि जीं नामें सौक्ष्म्य, निर्बलता, लाघव, इत्याद्यर्थ-प्रदर्शक असतात, तीं नपुंसक जाणावीं. यांत बहुधा लोकांच्या कल्पने वर हा नियम राहतो. कोणा देशांत समुद्र मोठा पराक्रमी व बलवान् वाटतो, तेथील लोक त्याचें पुल्लिंग ह्मणतात; कित्येकांस शांत व स्थिर वाटतो, ते लोक त्याचें स्त्रीलिंग ह्मणतात. ह्मणोनच एका अर्थाच्या नामाचीं निरनिराळ्या भाषांत निरनिराळीं लिंगें असतात. आतां कित्येक भाषांत या लिंगविवेचना विषयीं फार सुलभ नियम आहेत; ते असे कीं,—प्राणिवाचक नामांत जे पुंस्त्ववाचक शब्द ते पुल्लिंग; जे स्त्रीत्ववाचक शब्द ते स्त्रीलिंग; आणि कृमिकीटकादि ज्यांचें लिंगज्ञान होत नाहीं, तद्वाचक सर्व, व अप्राणिवाचक जे शब्द, ते नपुंसकलिंग. कित्येक भाषांत दोनच लिंगें आहेत; कित्येक भाषांत मुळीं लिंगेंच नाहींत; तेव्हां या भाषांत हें लिंगविवेचन तारतम्यभावेंकरून सुलभ होय. परंतु संस्कृत, महाराष्ट्र, गुर्जर, आदिकरून कित्येक भाषांत तसा कांहीं नियम नसून आणखी त्यांत तीन लिंगें; तेव्हां यांत हें लिंगविवेचन अंमळ कठीण होय.

७९ या निर्जीव अथवा अप्राणिवाचक नामांच्या लिंगांवर कांहीं नियम आहेत ते कळविण्याच्या अगोदर अकारान्त, आकारान्त, इकारान्त, इत्यादि शब्द एथें सांगितले पाहिजेत.

### पुल्लिंग.

अकारान्त-खांब, भोग, बेत, नाद, इ०. आकारान्त—आंबा, फाडा, लाखोटा, रस्ता, इ०. इकारान्त—हरि, कवि, कोळी, धोबी, तांबोळी, इ०. उकारान्त—भानु, वेणु,

लाडू, पेरू, चेंडू, इ०. ऋकारान्त—(संस्कृत)पितृ, भ्रातृ, इ०. ओकारान्त—दाहो, लाहो, इ०. मराठी भाषेंत एकारान्त पुलिंग व स्त्रीलिंग शब्द आढळत नाहींत.

स्त्रीलिंग.

अ—कंड, खरूज, गाय, ह्मैस, इ०. आ—जागा, गंगा, रेवा, इ०. इ—रीति, रुचि, साडी, नदी, खोली, लेखणी, इ०. उ—धेनु, जळू, सासू, जाऊ, इ०. ऋ—मातृ, स्वसृ, इ०. ओ—बायको, इत्यादि.

नपुंसकलिंग.

अ—नाक, तेल, ताक, पोर, मूल, इ०. इ—दधि, पाणी, लोणी, इ०. उ—मधु, किरडूं, मेंढरूं, इ०. ए—भांडें, अंडें, तळें, सोनें, बोलणें, इ०.

८० या प्रसंगीं शिकणारांनीं **उपांत्य** काय तें माहीत करून घ्यावें; कांकीं पुढें या विषयीं कांहीं सांगायाचें आहे. **उपांत्य** ह्मणजे शब्दाच्या अंत्याक्षराच्या शेजारचा जो वर्ण तो; जसें—**दउत** यांत ऊ हा उपांत्य; **बाईल** यांत ई हा उपांत्य; **बुरूड** यांत ऊ हा उपांत्य होय.

८१ आणखी, इ ई, उ ऊ, ऋ ॠ, आणि ऌ यांचा, आणि य्, व्, र्, ल्, यांचा, जो अन्योन्य आदेश, ह्मणजे इच्या स्थानीं य्, अथवा य्च्या स्थानीं इ; उच्या स्थानीं व्, अथवा व्च्या स्थानीं उ, इत्यादि, त्यास **संप्रसारण** ह्मणतात.

संस्कृत व्याकरणांत तर य्, व्, र्, यांच्या स्थानीं जे अनुक्रमें इ, उ, ऋ, आदेश होतात त्यां आदेशांस मात्र **संप्रसारण** असी संज्ञा आहे; परंतु तिचा एथें अतिदेश करून य्, व्, र् या आदेशांसाहि ती संज्ञा दिली आहे; कारण प्राकृतांत इ, उ,

इ०कांच्या स्थानीं य्, व्, इ० जे आदेश त्यांची व्याप्ति विशेष होय.

८२ तथापि अर्था वरून, आणि शब्दाच्या शेवटील अक्षरा वरून, अथवा प्रत्यया वरून, या लिंगविवेचना विषयीं कित्येक अबाधित नियम आहेत, त्यांतून मुख्य एथें सांगतों.

## अर्था वरून नामांचा लिंगनिर्बंध.

८३ प्राणिवाचक नामांत जे पुरुषवाचक शब्द ते पुलिंग जाणावे; जसें—रामा, माधव, कृष्ण, इंद्र, गज, वृषभ, वाघ, परीट, शास्त्री, तेली, न्हावी, इ०.

८४ प्राणिवाचक नामांत जे स्त्रीवाचक शब्द ते पुलिंग जाणावे; जसें—रमा, सरस्वती, गंगा, रंभा, धेनु, कुत्री, परिटीण, तेलीण, न्हावीण, इ०.

८५ प्राणिवाचक नामांत सामान्यजातिवाचक जे शब्द त्यांचें, अथवा जेथें लिंगाची विवक्षा नसती तेथें, नपुंसकलिंग जाणावें; जसें—माणूस, मुलगें, पोर, घोडें, कुत्रें, इ०.

८६ कृमिकीटकादि जे क्षुद्र जंतु असतात, त्यांच्या जातीचा निर्देश एका शब्दानें होत असतो; आणि त्यां शब्दाच्या लिंगाची उपलब्धि व्यवहारा वरून होती. जसें.—माशी, मुंगी, भुंगा, पोपट, ऊ, ढेकूण, पिसू, मुरकूट, इ०. यांत बहुधा इकारान्त, उकारान्त जे शब्द ते स्त्रीलिंग जाणावे, आणि आकारान्त पुलिंग जाणावे.

८७ प्रवाहीपदार्थवाचक जीं नामें तीं नपुंसक जाणावीं; जसें—पाणी, लोणी, चिंचवणी, कालवण, तेल, तूप, एरंडेल, इ०.

यांत नदी, ओढा, काढा, सडा, शाई, काकवी, मध, लस, कढी, बासुदी, आमटी, ताकतई, इ०. किती एक शब्द अपवादक होत; यांत आकारान्ता शिवाय इतर सर्व शब्द स्त्रीलिंग जाणावे.

८८ सुवर्णादिधातुवाचक जीं नामें तीं नपुंसक जाणावीं; जसें—सोनें, रुपें, तांबें, कथील, पितळ, इ०.

## २ प्रत्यया वरून अथवा अंत्यवर्णा वरून लिंगनिबंध.

८९ शुद्ध मराठी जीं आकारान्त नामें तीं पुल्लिंग जाणावीं; जसें—सोटा, गोटा, बडगा, मठ्ठा, वांसा, भाला, बरेपणा, भलेपणा, इ०.

९० 'तें ज्यास आहे' अथवा 'तत्संबंधी' अशा अर्थीं, ईप्रत्यय लागून जे शब्द सिद्ध होतात तद्व्यतिरिक्त जे शुद्ध इकारान्त मराठी शब्द ते बहुधा स्त्रीलिंग जाणावे; जसें—नदी, आई, काकी, काकवी, कसोटी, भाकरी, पाटिलकी, मुलुखगिरी, सावकारी, इ०.

९१ ज्या मराठी नामांचे अंत्य वर्ण अनुनासिक असतात, तीं सारीं नपुंसकलिंग जाणावीं; हीं नामें बहुधा इ—ऊ—एकारान्त असतात, जसें—मोतीं, गुरूं, बकरूं, आंडें, तळें, घोंसाळें, पोंवळें, बोलणें, चालणें, इ०.

परंतु गहूं हा शब्द अनुनासिक असतांही पुल्लिंग जाणावा. मला वाटतें हा शब्द गहू असा लिहिला असतां मग हा अपवाद करायास नको.

९२ ओकारान्त मराठी शब्द फार थोडे आहेत, आणि ते बायको, बायो, इ० कित्येक स्त्रीलिंग शब्दां शिवाय सारे पुल्लिंग जाणावे; जसें—लाहो, टाहो, डोहो,

मोहो, इ०. यांत **मोहो** याचें विकल्पें नपुंसकलिंगही होतें.

९३ भावार्थी जो **पण** प्रत्यय होतो तदंत जे शब्द ते नपुंसकलिंग जाणावे; जसें— बरेपण, भलेपण, चांगुलपण, इ०.

९४ शब्दाची अथवा शब्दावयवाची द्विरुक्ति होऊन जे अनुकरणवाचक शब्द सिद्ध होतात ते स्त्रीलिंग जाणावे; जसें—पळपळ, चळचळ, कटकट, झटापट, मारामार, पळापळ, दाणादाण, इ०.

९५ पूर्वोक्त अनुकरणवाचक जे शब्द त्यांहून अतिशयार्थी जो **आट**प्रत्यय तदंत, आणि **आड** आणि **आण** हे प्रत्यय ज्यांच्या अंतीं आहेत असे जे शब्द ते, पुल्लिंग जाणावे; जसें—पळपळाट, चकचकाट, भडाड, गडाड, दणाण, इ०.

९६ व्यापारद्योतक जीं **णान्त** अथवा **नान्त** धातुसाधित नामें तीं नपुंसकलिंग जाणावीं; जसें—दळण, कांडण, सडण, भरण, पोषण, भूषण, कंदन, साधन, मोहन, भंजन, रंजन, इ०.

९७ व्यापारादिदर्शक **ण्यन्त** ह्मणजे **णी** आहे अंतीं ज्यांच्या, अशीं जीं धातुसाधित नामें तीं स्त्रीलिंग होत; जसें—कापणी, काढणी, लावणी, रोपणी, आंकणी, चाळणी, भाजणी, ओढणी, इ०.

९८ पौनःपुन्य अथवा अतिशय यां अर्थी जीं इकारान्त द्विरुक्त धातुसाधित नामें तीं स्त्रीलिंग जाणावीं; जसें—मारामारी, उडाउडी, फाडाफाडी, तोडातोडी, ओढाओढी, ताणाताणी, इ०.

९९ व्यापारदर्शक जीं **णूक**प्रत्ययान्त धातुसाधित नामें

तीं स्त्रीलिंग जाणावीं; जसें—वर्त्तणूक, जाचणूक, वर्णणूक, आठवणूक, आडणूक, नांदणूक, इ०.

१०० व्यापार द्योतक अथवा व्यापृतार्थद्योत जीं आकारान्त धातुसाधित नामें तीं पुल्लिंग होत; जसें—आरडा, आंसडा, हिसका, झपाटा, रपाटा, भरडा, रांधा, सांधा, ठेंचा, ठेवा, इ०.

१०१ प्रकृतिरूप जीं धातुसाधित नामें तीं बहुधा पुल्लिंग होत; जसें—आट, आटोप, व्याप, गाळ, जाळ, नाच, साज, मोड, इ०.

जळ, भेट, भेळ, ठेव, खोंच, ह्मण, ओळख, इ० कितीएक शब्द स्त्रीलिंग होत.

१०२ मूल्यदर्शक जीं **णावळ** प्रत्ययान्त साधुसाधित नामें तीं स्त्रीलिंग जाणावीं; जसें—घडणावळ, शिवणावळ, दळणावळ, खाणावळ, लिहिणावळ, इ०.

१०३ मराठी भाषेंत जे संस्कृत शब्द शुद्धस्वरूपानें वर्त्ततात त्यांचें लिंगविवेचन त्या भाषेच्या अनुरोधानें होतें.

१०४ आकारान्त* जे संस्कृत शब्द ते सारे स्त्रीलिंग जाणावे. जसें—गंगा, श्रद्धा, मृत्तिका, इच्छा, स्पृहा, निद्रा, तंद्रा, व्याख्या, टीका, इ०.

१०५ भावार्थी जे **ता**प्रत्ययान्त संस्कृत शब्द ते सारे स्त्रीलिंग जाणावे; जसें—दक्षता, मधुरता, व्याकुलता, विद्वत्ता, इ०.

१०६ भावार्थी जे **त्व**प्रत्ययान्त शब्द ते नपुंसकलिंग

---

* एथें शिकणारांनीं लक्षांत ठेवावें कीं, संस्कृतांत स्त्रीलिंगीं जो **टाप** प्रत्यय होतो, त्यांतील टकार पकार जाऊन जो **आ** ह्मणोन स्त्रीप्रत्यय अवशिष्ट राहतो तदंत जे शब्द त्यांचें विधान केलें आहे; नाहीं तर आत्मा, ब्रह्मा, राजा, चंद्रमा, प्रेमा, पिता, इ० शब्द अपवादक होतील; हे संस्कृतांत मुळचे आकारान्त शब्द नाहींत.

जाणावे; जसें—ब्राह्मणत्व, मनुष्यत्व, पटुत्व, स्त्रीत्व, पुंस्त्व, इ०.

१०७ भावार्थी कितो एक प्रत्यय लागून पूर्व स्वरास वृद्धि होऊन जे शब्द सिद्ध होतात ते सारे नपुंसकलिंग जाणावे; जसें माधुर्य, क्षात्र, वैभव, चांचल्य, स्थैर्य, धैर्य, क्रौर्य, धौर्त्य, इ०.

१०८ इमा* प्रत्ययान्त जे संस्कृत शब्द ते महाराष्ट्रांत विकल्पें पुलिंग अथवा स्त्रीलिंग जाणावे; जसें—महिमा, अणिमा, गरिमा, इ०.

या नियमां शिवाय आणखी आदि, उपांत्य, आणि अंत्यवर्ण, यां वरून कांहीं या लिंगविवेचना विषयीं नियम शोधूं गेलें असतां सांपडतील असें मला वाटतें; परंतु जरी सांपडले तरी ते केवळ सर्वव्यापक होणार नाहींत; यास्तव, त्यांचा विस्तार एथें केला नाहीं.

## २ लोकव्यवहारा वरून लिंगनिर्बंध.

१०९ पूर्वोक्त नियमा शिवाय जे शब्द राहिले त्यांचें लिंगविवेचन बहुधा लोकव्यवहारा वरून जाणावें.

११० प्राणिवाचक कित्येक स्त्रीत्वबोधक शब्द असून त्यांचें ग्रहण क्वचित् व्यवहारांत नपुंसकलिंगेंकरून होत असतें; जसें—कुटुंब, कलत्र, लांडोर, वटकूर, रांडरूं, रांड-माणूस, इ०. तसेंच—दार, सखिजन, कबीला, हे शब्द स्त्रीत्वबोधक असून नित्यपुलिंग जाणावे.

१११ द्वंद्वसमास होऊन जीं कित्येक शुद्ध मराठी नामें सिद्ध होतात तीं नपुंसकलिंग जाणावीं; जसें—आईबापें, बहीणभावंडें, दादलाबायलें, इ०.

११२ अकारान्त जीं वृक्षांचीं नावें तीं बहुधा स्त्रीलिंग

---

* मुळीं संस्कृतांत भावार्थीं हा इमनच् (इमन्) प्रत्यय होतो, आणि एतदंत जे शब्द ते संस्कृतांत निरंतर पुल्लिंग असतात.

असतात; जसें—भोंकर, बकूळ, नारळ, फोफळ, जांबूळ, आसवन, गुलबास, इ०.

यांत– माड, ताड, देवदार, फणस, वड, पिंपळ, इ० शब्द पुल्लिंग जाणावे.

११३ तेच जर फळ अथवा पुष्प यांचे वाचक शब्द असले तर त्याचें बहुधा नपुंसकलिंग जाणावें; जसें—भोंकर, बकूळ, फोफळ, जांबूळ, इ०.

यांत -नारळ, फणस गुलाब, जब, इ० पुल्लिंग जाणावें.

११४ कित्येक शब्द कोंकण देश इत्यादि स्थानपरत्वें अनेक लिंगीं वर्त्ततात ; जसें—तपकीर, तंबाकू, गुडाखू इ०.

११५ प्राणिवाचक नामाचें कोणतें एक लिंग समजल्यानें त्याज वरून दुसरीं लिंगें साधितां येतात. अकारान्त, इकारान्त, आणि उकारान्त प्राणिवाचक पुल्लिंग नामास पुढें ईण प्रत्यय लाविल्यानें त्याच नामाचा स्त्रीलिंगवाचक शब्द होतो. परंतु हा प्रत्यय लाविते समयीं शब्दाच्या अंत्यस्वराचा लोप होतो; आणि त्या पुल्लिंग शब्दाचा उपांत्य जर इकार किंवा उकार आहे, तर त्यांस हा स्त्रीत्वबोधक प्रत्यय लाविते समयीं त्या उपांत्य स्वराच्या स्थानीं अ आदेश होतो; पक्षीं ते उपांत्य स्वर दीर्घ असल्यास ऱ्हस्वही होतात; उदाहरण—

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| वाघ | वाघीण | तेली | तेलीण |
| सिंह | सिंहीण | न्हावी | न्हावीण |
| सोनार | सोनारीण | तांबोळी | तांबोळीण |
| सुतार | सुतारीण | रामोशी | रामोशीण |
| लोहार | लोहारीण | परभू | परभीण |
| ठाकूर | ठाकरीण. | परीट | परिटीण. |

११६ शुद्ध मराठी शब्दांत, अथवा मराठींत मिसळलेल्या अन्य भाषेंतील शब्दांत, जर उपांत्यस्वर दीर्घ ई अथवा ऊ असला, आणि त्यांस कोणताही प्रत्यय लागून जर त्या मूळ उपांत्याचा पुढील वर्ण दीर्घ होत असला, तर त्यास हा स्त्रीप्रत्यय लाविते समयीं त्या उपांत्य स्वराच्या स्थानीं अ आदेश होतो; पक्षीं हे उपांत्यस्वर ऱ्हस्वही होतात.

(अ) यांत आणखी उपांत्य स्वराचा मागला वर्ण जर दीर्घ असला, तर ई आणि ऊ या उपांत्यांच्या स्थानीं अच आदेश होतो.

उदाहरणें.

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| परीट | परटीण, परिटीण | बेडूक | बेडकीण |
| बुरूड | बुरडीण, बुरुडीण. | ठाकूर | ठाकरीण. |
| | इ० | | इ० |

यांत बहुधा असा नियम आहे कीं, ई, अथवा ऊ, या उपांत्याच्या मागील अक्षर जर दीर्घ असलें तर अ हाच आदेश होतो; तेथें वैकल्पिक रूपांचा संभव दिसत नाहीं; कारण, या भाषेंत मागें पूर्ण अक्षर असतां, त्यांत विशेषेंकरून दीर्घ अक्षर असतां, पुढील ऱ्हस्व अक्षराचें, आणि विशेषेंकरून अकारान्त अक्षराचें अर्धोच्चारण होत असतें, असा स्वाभाविक नियम आहे; तेव्हां मात्रांची गणना केली असतां दीर्घ अक्षरा पुढील उपांत्याच्या स्थानीं अकारच आदेश करणें सयुक्तिक दिसतें.

११७ परंतु शुद्ध मराठी म्हटलें या वरून जर ते शब्द संस्कृत, अथवा यवनी, अथवा कोणतेही अन्यभाषेचे, अथवा उपनाववाचक असले, तर उपांत्य स्वरास कांहीं विकार होत नाहीं. परंतु तेच शब्द जर मराठी भाषेंत फार रूढींत आलेले असले तर विवक्षा असतां त्यांचा उपांत्य ऱ्हस्व करणें हा उत्तम पक्ष.

### उदाहरणें.

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| अतीत | अतीतीण, अतितीण | वकील. | वकीलीण, वकिलीण. |
| गरूड. | गरूडीण, गरुडीण. | फडनीस. | फडनीशीण, फडनिशीण. |
| फकीर. | फकीरीण, फकिरीण | रजपूत. | रजपूतीण, रजपुतीण. |
| अमीर. | अमीरीण, अमिरीण. | गाडगीळ. | गाडगीळीण, गाडगिळीण. |

११८ तसेंच जर ते उपांत्य स्वर हकारयुक्त असले तर त्यांसहि वर सांगितलाच नियम लागतो; जसें—

| पु० | स्त्री० |
|---|---|
| अहीर | अहीरीण, अहिरीण. |
| माहूत | माहूतीण, माहुतीण. |

११९ जर उपांत्य वर्ण केवळ ई किंवा ऊ असला, तर त्याचें पुढील प्रत्ययाच्या योगानें विकल्पें संप्रसारण होतें; जसें—

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| शाईर | शाइरीण, शायरीण | राऊळ | राउळीण, रावळीण |

१२० यांत बहुधा मनुष्यजाती शिवाय इतर जे प्राणी तद्वाचक शब्द, आणि दोहों पेक्षां अधिक ज्यांत अक्षरें आहेत असे जे अकारान्त पुल्लिंग शब्द, त्यांस स्त्रीप्रत्यय ई होतो.

ऐशीं उपांत्य स्वरा विषयीं ईण प्रत्यय लागते समयीं जशीं कार्यें होतात तशींच राहतात.

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| पोपट | पोपटी | गाढव | गाढवी |
| हरीण | हरिणी, हरणी | बेडूक | बेडकी |
| सांभर | सांभरी | ढेकूण | ढेकणी |
| उंदीर | उंदरी. | गोचीड | गोचडी. |

१२१ आकारान्त पुल्लिंग प्राणिवाचक नामास शेवटीं ई होऊन तज्जातीय स्त्रीचा बोध होतो, आणि एँ होऊन त्याचें पिलूं किंवा त्या जातींत एकादें हलकें अशा नपुंसकाचा बोध होतो; जसें—

| पु० | स्त्री० | न० | पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|---|---|---|
| कुत्रा | कुत्री | कुत्रें | कोल्हा | कोल्ही | कोल्हें |
| लांडगा | लांडगी | लांडगें | बकरा | बकरी | बकरें |
| मुलगा | मुलगी | मुलगें. | मेंढा | मेंढी | मेंढें. |

यांत कित्येक नपुंसक शब्द क्वचित् बोलण्यांत येतात.

१२२ आकारान्त शरीरसंबंधवाचक शब्दास, अथवा प्रतिष्ठाशब्दासहि स्त्रीलिंगीं ईकार होतो; जसें—

उदाहरणें.

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| काका | काकी | दादा | दादी |
| मामा | मामी. | आजा | आजी. |

१२३ कित्येक अकारान्त जातिवाचक संस्कृत शब्दांस त्या भाषेच्या नियमा प्रमाणें स्त्रीलिंगीं ई प्रत्यय होतो; जसें—

उदाहरणें.

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| देव | देवी | सिंह | सिंही |
| गोप | गोपी | शूद्र | शूद्री |
| दास | दासी. | ब्राह्मण | ब्राह्मणी. |

१२४ संयोगपूर्वक आकारान्त जे शब्द, ज्यांचीं जाती वरून अथवा वृत्तिसंबंधानें नावें पडलीं आहेत, त्यां

वरून स्त्रीलिंगीं ईण प्रत्यय होतो; परंतु तो होते समयीं शेवटील याचा लोप होतो; उदाहरण—भाट्या, भाटीण; देशपांड्या, देशपांडीण; आगलाव्या, आगलावीण; इ०.

१२५ परंतु या सांगितल्या नियमां वर न चालणार असे कित्येक शब्द आहेत ते सांगतों.

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|---|---|
| बैल | गाय | पुरुष | बायको | बाप | आई |
| ह्मैसा | ह्मैस | दीर | जाऊ | पोर | पोर |
| मोर | लांडोर | बोकड | शेळी | सूल | सून |
| बोका | भाटी, मांजर | गवळी | गवळण | मावळा | मावळण |
| काळवीट | हरणी | सासरा | सासू | राजा | राणी |
| ऊंट | सांड. | भाऊ | भावजय. | वाघ्या | मुरळी.* |

१२६ प्राणिवाचक नामाचें नपुंसक सामान्यतः स्वजातीचा बोध करितें; उदाहरण—'तें कुत्रें येत आहे,' एथें तो कुत्रा किंवा कुत्री आहे हें विवक्षित नाहीं; परंतु कुत्रें ह्मटलें ह्मणजे कुत्र्याची जात आहे, इतकें मात्र समजतें; याच प्रमाणें—पोर, बकरें, मनुष्य, इ०.

१२७ पदार्थाचें स्थूलत्व दाखवायाची विवक्षा असतां, कधीं विनोदानें स्त्रीलिंग शब्दांस व नपुंसकलिंग शब्दांस, आकारान्त करून पुलिंग करितात; जसें पोळा, भाकरा, पागोटा, इ०.

## वचनविचार.

१२८ वचन ह्मणजे नामाच्या ठायीं एकत्वरूपानें

---

* एथें वाघ्याची बायको मुरळी असा अर्थ कोणी समजूं नये; तर खंडोबास जो मुलगा वाहतात तो वाघ्या, आणि मुलगी वाहतात ती मुरळी, असा अर्थ समजावा.

अथवा अनेकत्वरूपानें जो अर्थाची उपस्थिति तें. हीं वचनें दोन आहेत, **एकवचन** आणि **अनेकवचन** अथवा **बहुवचन.**

१२९ **एकवचन** ह्मणजे नामाच्या ज्या रूपा वरून त्याच्या एकत्वाचा बोध होतो तें, अथवा त्या नामाचें, 'एकवचन' असें ह्मणतात; जसें— केळें, नारिंग, पागोटें, अंगरखा, इ०.

१३० ज्या रूपा वरून अनेकत्वाचा बोध होतो त्यास **अनेकवचन** ह्मणतात, कोणी **बहुवचन**हि ह्मणतात; जसें— केळीं, नारिंगें, पागोटीं, अंगरखे, इ०.

१३१ एकवचनी शब्द अनेकवचनांत आणायाच्या रीति बहुत आहेत. या भाषेत नामांच्या अंत्य स्वराच्या आधारा वरून, आणि त्यांच्या लिंगा वरून, अनेकवचनांचीं रूपें साधतात. या भाषेत वचना विषयीं अतिसंक्षिप्त आणि बहुधा सर्वव्यापक असे नियम बांधिले असतां त्यांचें आकलन वक्ष्यमाण रीतींनीं होईल.

(१) **अ—ई—ऊ—ओ**कारान्त पुल्लिंग, आणि **आ**कारान्त स्त्रीलिंग, नामांचीं उभय वचनांचीं रूपें समान होतात.

(२) **आ**कारान्त पुल्लिंग, आणि **अ—इ—उ**कारान्त नपुंसकलिंग नामांस अनेकवचनीं अंतीं एकार होतो.

(३) **अ—इ—उ—ओ**कारान्त स्त्रीलिंग नामांस अनेकवचनीं **आ** विकार होतो.

(४)**आ**कारान्त स्त्रीलिंग, आणि एकारान्त नपुंसकलिंग, नामांस अनेकवचनीं **ई** विकार होतो.

(५) **ई—ऊ**कारान्त शब्दांस पूर्वोक्त विकार होण्याच्या पूर्वीं संप्रसारण होतें.

(६) नपुंसकलिंग शब्दांस शेवटील वर्ण अनुनासिक होतो.

(७) संस्कृत शब्द, अथवा परभाषेंतून येऊन जे शब्द फार रूढींत पडले नाहींत, त्यांचीं उभय वचनें समान होतात.

(८) ज्यांच्या ठायीं संख्येकरून गणण्याचा असंभव आहे अशा पदार्थांचे जे वाचक शब्द त्यांचा प्रायः एक-वचनींच प्रयोग होतो.

या सर्व नियमांचा पुढें त्या त्या स्थळीं विस्तार केला आहे.

---

## प्रकरण १.

### पुल्लिंग.

१३२ अ-इ-उ-ओकारान्त नामांचीं उभय वचनें समान होतात; त्यांचीं वचनें अर्थानुसंधानानें जाणावीं.

उदाहरणें.

| अकारान्त. | | इकारान्त. | |
|---|---|---|---|
| एक० | अने० | एक० | अने० |
| खांब | खांब | कवि | कवि |
| बैल | बैल | अग्नि | अग्नि |
| गाढव | गाढव | भूपति | भूपति |
| पुरुष | पुरुष | शास्त्री | शास्त्री |
| चिरंजीव | चिरंजीव. | तेली | तेली. |

| उकारान्त. | | ओकारान्त. | |
|---|---|---|---|
| एक० | अने० | एक० | अने० |
| वेणु | वेणु | टाहो | टाहो |
| शत्रु | शत्रु | डोहो | डोहो |
| साडू | साडू | लाहो | लाहो |
| परभू | परभू. | छापो | छापो. |

१३३ **आ**कारान्त पुल्लिंग नामाच्या एकवचनास अनेक-वचनीं अंत्य स्वरास ए होतो; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|
| आंबा | आंबे | भाट्या | भाट्ये |
| धोंडा | धोंडे | अंबाडा | अंबाडे |
| पानपुडा | पानपुडे. | देशपांड्या | देशपांड्ये. |

संयोगपूर्वक आकारान्त पुल्लिंग शब्दाच्या शेवटील **य**चा लोप करून अनेकवचनीं ए आदेश करून लिहिण्याचा प्रचार फार आढळतो; परंतु ही शुद्ध रीति नव्हे; कारण, एक तर **य**-चा लोप करण्यास या वरील नियमा वरून आधार नाहीं; आणखी, असा लोप केला असतां संयोगपूर्वक आणि असंयोग-पूर्वक आकारान्त पुल्लिंग शब्दांच्या अनेकवचनाचीं सारखीं रूपें होऊन जी अडचण प्राप्त होईल ती आणखी हा लोप न केला असतां टळती; जसें—**धाम्या** आणि **धामा**, यांत पूर्व शब्दांत **य**चा लोप केला असतां या दोहों शब्दांचें अनेकवचनीं **धामे** असें एक रूप होईल; परंतु **धाम्ये** आणि **धामे** अशीं निराळीं रूपें लिहिलीं असतां त्यां वरून त्यांचें एकवचन शोधून काढ-ण्यास कांहींच अडचण पडणार नाहीं. ह्मणोन माझ्या मतें **भाट्ये**, **देशपांड्ये**, **धोंडफोड्ये**, **लांकुडतोड्ये**, **आगलाव्ये**, **वाघमाऱ्ये**, अशीं रूपें विशेष ग्राह्य होत.

१३४ **ब्रह्मा**, **सोमपा**, **धूम्रपा**, **शंखध्मा**, इत्यादि जे शुद्ध **आ**कारान्त संस्कृत शब्द, त्यांतून जे फारसे प्राकृतांत प्रसिद्ध नाहींत, त्यांचीं उभय वचनीं समान रूपें होतात.

१३५ **आत्मा**, **ब्रह्मा**, इत्यादि जे लोकप्रसिद्ध संस्कृत शब्द, त्यांच्या अनेकवचनीं विवक्षा असल्यास पक्षीं ए आ-देश होतो. **आत्मा** शब्दास विकल्प नाहीं; जसें—आत्मा, आत्मे; ब्रह्मा, ब्रह्मे अ० ब्रह्मा.

१३६ **मामा, काका,** इत्यादि जे **आ**कारान्त शरीर संबंधवाचक शब्द त्यांचींहि रूपें उभय वचनीं समान होतात ; पक्षीं विवक्षा असल्यास ए आदेश होतो; जसें.–

| एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|
| मामा | मामा, मामे | काका | काका, काके |

उदाहरण. 'तुह्मास मामा किती आहेत', 'माझे चौघे मामे काशीस गेले', 'तुमचे दादा जरीं आले तरीं हें कार्य त्यांच्यांनीं होणार नाहीं', इ०.

'हे कोण बायकोचे मामे घरांत हिंडती रिकामे.'

(अ) हींच जर प्रतिष्ठानामें असलीं तर त्यांचीं उभय वचनीं नामास रूपें होतात. उदाह०—या मंडळींत चार अण्णा आहेत, आणि दोन बाबा आहेत, तुला कोणते पाहिजेत.

१३७ ऋकारान्त शब्द या भाषेंत नाहींत. जे ऋकारान्त संस्कृत शब्द आहेत, जसें—पितृ, **मातृ, भ्रातृ, स्वसृ, कर्तृ, दातृ, धातृ,** इ०, आणि ज्यांचीं संस्कृत रीती प्रमाणें जीं प्रथमेचीं रूपें तींच मूलशब्द ह्मणून या भाषेंत वर्त्ततात, जसें—**पिता, माता, भ्राता, स्वसा, कर्त्ता, दाता, धाता,** इ०. त्यांचीं अनेकवचनें त्या त्या **आ**कारान्त शब्दांच्या नियमा प्रमाणें होतात.

१३८ ए-ऐ-**औ**कारान्त शब्द या भाषेंत नाहींत.

१३९ बहुधा जितक्या शब्दांच्या अंतीं या भाषेंत **अई**, अ० **अय**, आणि **अऊ, आऊ**, अ० **अव**, असे वर्ण येतात, ते शब्द कोणी विकल्पें **अनुक्रमें** ऐकारान्त आणि **औ**कारान्तहि लिहितात ; तथापि त्यांचीं अनेकवचनाचीं रूपें त्या त्या **मूळच्या शब्दांच्या नियमा प्रमाणेंच होतात. जसें—पौ [पऊ अ० पव] यांचीं उभयवचनें समान जाणावीं.**

# प्रकरण २.

## स्त्रीलिंग.

१४० अकारान्त स्त्रीलिंग शब्दाचे या भाषेंत वचना वरून आणि विभक्ती वरून तीन निरनिराळे मुख्य गण केले पाहिजेत ;–

त्यांतून प्रथम गणांतील अकारान्त स्त्रीलिंग शब्दांस अनेकवचनीं अंत्य स्वरास ई विकार होतो.. दुसऱ्या गणांतील अकारान्त शब्दांस **आ**, आणि तिसऱ्या गणांतील अकारान्त शब्दांस विकल्पें हे दोन्ही विकार होतात. यांस एथें अनुक्रमें **भिंतीचा गण**, **आतेचा गण**, आणि **झेंपेचा गण**, असें ह्मटलें आहे.

### भिंतीचा गण.

| एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|
| भिंत | भिंती | कावड | कावडी |
| केळ | केळी | उतरड | उतरडी |
| बांक | बांकी | पोंखरण | पोंखरणी |
| फोफळ | फोफळी. | तगर | तगरी. |

### आतेचा गण.

| एक० | अने० |
|---|---|
| आत | आता |
| वेळ | वेळा |
| नणंद | नणंदा |
| सनद | सनदा |
| रकम | रकमा. |

### झेंपेचा गण.

| एक० | अने० |
|---|---|
| झेंपी | झेंपा, झेंपी |
| लात | लाता, लाती |
| शपथ | शपथा, शपथी |
| तरवार | तरवारा, तरवारी |
| अकल | अकला, अकली. |

या अकारान्त स्त्रीलिंग शब्दांचे जे वर तीन वर्ग दाखविले आहेत, त्यां विषयीं सर्वव्यापक असे कांहीं नियम आढळत नाहींत; तथापि या विषया वर बहुत विचार करितां खालीं लिहिल्या प्रमाणें कांहींसें धोरण माझ्या हातीं लागलें आहे.

१४१ द्व्यक्षरी अथवा त्र्यक्षरी अकारान्त स्त्रीलिंग शब्द जर व्युत्पन्न असले, त्यांत विशेषेंकरून ज्यांची व्युत्पत्ति धातू पासून झाली असावी, तर त्यांच्या अनेकवचनीं बहुधा ई विकार होतो; जसें—म्हण, म्हणी; फूट फुटी; इ०. आणखी उदाहरणें सांगतों.

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| वांक* | वांकी | फाड | फाडी | तोड | तोडी |
| भेट | भेटी | तूट | तुटी | झोड | झोडी |
| फूग | फुगी | नड | नडी | खाण* | खाणी |
| धण* | धणी | वण | वणी | प्रेण* | प्रेणी |
| गूत | गुती | भर | भरी | जळ | जळी |
| ओळख | ओळखी | समज | समजी | सुकट | सुकटी |
| लगट | लगटी | थापट | थापटी | उकड | उकडी |
| कोरड | कोरडी | निवड | निवडी | गोठण | गोठणी |
| पाखर | पाखरी | तसर | तसरी | उभार | उभारी |
| ठेवण | ठेवणी. | चाळण | चाळणी | चूण | चुणी. |

* **वांक** हा शब्द मूळचा **वांकणें** या धातू पासून झाला असावा; म्हणजे, सोनें वांकवून केलेलें जें दंडभूषण ती.

* **धणी** या शब्दा पासून, अथवा धाणे या धातू पासून हा शब्द व्युत्पन्न असावा.

* **खाण** हा शब्द **खणणें** अथवा खाणणें या धातू पासून व्युत्पन्न झाला असावा. जी खणलेली जागा, अथवा धातू काढण्यासाठीं खणायास योग्य जें स्थळ, ती.

* प्रेणाची थापून केलेली गोंवरी ती.

(अ) पूर्वोक्त नियमांत नाहींत असेही शब्द पुष्कळ आहेत, त्यांतून मुख्य खालीं लिहिले आहेत.

### व्यभिचरित शब्द.

शिंक, चूक, झडप, झटक, झोंप, नीज, खोक, थुंकथाप, फुंक, रोघ, खीज, धाप, इत्यादि. हा **शिंकेचा गण** जाणावा.

१४२ त्र्यक्षराहून अधिकाक्षरांचे जे अकारान्त स्त्रीलिंग शब्द, त्यांच्या अनेकवचनीं अंतीं ई विकार होतो; उदाहरण—

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| चकमक | चकमकी | तवलक | तवलकी | पावधूक | पावधुकी |
| वरकज | वरकजी | तजवीज | तजविजी | भांजगड | भांजगडी |
| बसकट | बसकटी | उसनवट | उसनवटी | घोरपड | घोरपडी |
| खरखटवड | खरखटवडी | सासुरवड | सासुरवडी | तारंबळ | तारंबळी |
| पोंखरण | पोंखरणी | सोईरगत | सोईरगती | तकरार | तकरारी |
| अबदागीर | अबदागिरी. | कोथिंबीर | कोथिंबिरी | अदलाबदल | अदलाबदली. |

### वैकल्पिक शब्द.

(अ) तरवार, टकमक, उघडीक, कोरडीक, भरताड; अखबर, बकमार, सुरवार, खसखस, कुरनीस, पुरशीस, तसबीर, इ०. हा **तरवारीचा गण** जाणावा.

(आ) एरजार, वळविज, हुरमूज, तसरीफ, इ०. हा **एरजारीचा गण** जाणावा.

१४३ वनस्पतिवाचक जे अकारान्त स्त्रीलिंग शब्द, त्यांच्या अनेकवचनीं ई विकार होतो.

## उदाहरणें.

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| बोर | बोरी | केळ | केळी | नारळ | नारळी |
| तगर | तगरी | भारंग | भारंगी | भेंकर | भेंकरी |
| सुरंग | सुरंगी | नारिंग | नारिंगी | कोंठ | कोंठी |
| बाऊट | बाउटी, बावटी | मांदेट | मांदेटी | जाखन | जाखनी |
| नांदरूख | नांदरुखी | वावडंग | वावडंगी | महाळुंग | महाळुंगी |
| आबोल | आबोली. | गुलबास | गुलबासी. | शिताफळ | शिताफळी. |

[अ] व्यभिचरित शब्द– चिंच, चिंचा.

१४४ परंतु शिकणारांनीं आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवावी कीं, कित्येक शब्द राजापूर प्रांतांत ईकारान्त असतां त्यांस अष्टागर प्रांतांत, उत्तर कोंकणांत, व देशावर बहुधा अकारान्त करितात; जसें–भाकरी, भाकर; धावळी, धावळ; इ०. अशा अकारान्त शब्दांचीं अनेकवचनें ईकारान्त होतात. आणखी उदाहरणें–

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| टीर | टिरी | करवंद | करवंदी | खातर | खातरी |
| शिंप | शिंपी | चिलीम | चिलिमी | जाळ | जाळी |
| ऊंबर | ऊंबरी. | गोद | गोदी. | चुंग | चुंगी. |

१४५ तसेच कित्येक संस्कृत इकारान्त स्त्रीलिंग शब्द महाराष्ट्र भाषेंत विकल्पें अकारान्त होतात; जसें–संस्कृत रीति, प्राकृत रीत; अशा अकारान्त स्त्रीलिंग शब्दांस अनेकवचनीं ई विकार होतो; जसें–

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| रीत | रिती | बुद्ध | बुद्धी | व्याध | व्याधी |
| गत | गती | जात | जाती | रूच | रुची |

१४६ इणप्रत्ययान्त अथवा अणप्रत्ययान्त जीं स्त्रीवाचक

नामें, त्यांच्या अनेकवचनीं अंत्य वर्णास ई आदेश होतो; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| शिंपीण | शिंपणी | कोळीण | कोळणी | परिटीण | परिटिणी |
| रजपुतीण | रजपुतणी | भडभुंजीण | भडभुंजणी | सोनारीण | सोनारणी |

१४७ जे केवळ अव्युत्पन्न अकारान्त स्त्रीलिंग शब्द आहेत त्यांचीं अनेकवचनें आकारान्त होतात..

उदाहरणें.

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| डांक | डांका | वेळ | वेळा | नणंद | नणंदा |
| आत | आता | समीध | समिधा | आण | आणा |
| हाक | हाका | खारीक | खारका | पेंठ | पेंठा |
| तारीख | तारखा. | खूण | खुणा. | भूक | भुका. |

१४८ आकारान्त अथवा उकारान्त संस्कृत शब्दांचा अपभ्रंश होऊन जे अकारान्त स्त्रीलिंग शब्द या भाषेंत झाले आहेत, त्यांचीं अनेकवचनें आकारान्त होतात.

उदाहरणें.

| एक० | | अने० | एक० | | अने० |
|---|---|---|---|---|---|
| कांख | (कुक्षा) | कांखा | खाट | (खट्वा) | खाटा |
| जीभ | (जिव्हा) | जिभा | शाक | (शाखा) | शाका |
| धार | (धारा) | धारा | माळ | (माला) | माळा |
| वस्त | (वस्तु) | वस्ता. | मध | (मधु) | मधा. |

[अ] व्यभिचरित एक० भालूक (भल्लुका), अनेक० भालुकीं; एक० धात (धातु), अनेक० धातीं; एक० काबीळ (कामिला), अनेक० काबळीं.

१४९ वर जे नियम सांगितले त्यांहींकरून बहुधा सर्व अकारान्त स्त्रीलिंग शब्दांचें आकलन होतें, परंतु जेथें या शब्दांच्या व्युत्पत्ती विषयीं निश्चय करवत नाहीं तेथें अशा शब्दांच्या अनेकवचनांचीं रूपें बहुधा वैकल्पिक होतात असें जाणावें.

१५० आतां वर सांगितल्या नियमां प्रमाणें ज्यांचीं अनेकवचनांचीं रूपें होत नाहींत असे अपवादक शब्द पुष्कळ आढळतील, परंतु त्यांतून मुख्य एथें खालीं लिहिले आहेत.

**अपवादक शब्द.**

कळंक, शिळक, टोंक, चितंग, डग, कणिंग, कणंग, रणंग, कुपट, धापट, सांपट, फट, बांबट, कोरट, होरट, सावट, शिळट, बांबूट, आगोठ, इ०.

**आकारान्त.**

१५१ आकारान्त स्त्रीलिंग शब्दांचीं उभय वचनांचीं रूपें समान होतात; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|
| जागा | जागा | मृत्तिका | मृत्तिका |
| पागा | पागा | अवस्था | अवस्था |
| गुहा | गुहा. | मज्जा | मज्जा. |

**इकारान्त** आणि **उकारान्त.**

१५२ एतदंत स्त्रीलिंग शब्दाच्या एकवचनाच्या अंत्य स्वरास अनेकवचनीं संप्रसारण होऊन पुढें **आ** विकार होतो.

**उदाहरणें.**

**इकारान्त.**

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| चुलती | चुलत्या | भाजी | भाज्या | आंथरी | आंथऱ्या |
| काठी | काठ्या | सखी | सख्या | नदी | नद्या. |

[अ] जर इकारान्त अथवा उकारान्त शब्द शुद्ध संस्कृत असले, आणि त्यांचा व्यवहारी भाषणांत अत्यंत परिपाठ नसला, तर त्यांचीं उभयवचनीं समान रूपें होतात; उदाहरणें—

इकारान्त.

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| रुचि | रुचि | भक्ति | भक्ति | जाति | जाति |
| शांति | शांति | आहुति | आहुति | प्रकृति | प्रकृति |
| गोपी | गोपी. | ब्राह्मणी | ब्राह्मणी. | अतिशूद्री | अतिशूद्री. |

[आ] परंतु जर तेच शब्द नित्य रूढींतले असले, तर त्यांचीं अनेकवचनांचीं रूपें वरल्या नियमा प्रमाणें होतात; जसें— नदी, नद्या; सखी, सख्या; इ०.

[इ] जर ते शब्द एकाक्षरी असले तर विकल्पें संप्रसारणास इय् आणि उव् असे अनुक्रमें आदेश होऊन पुढें आ विकार होतो; जसें—

धी, धी, धिया; ह्री, ह्री, ह्रिया; श्री, श्री, श्रिया; भ्रु, भ्रु, भ्रुवा; इ०.

[ई] **स्त्री, स्त्री** यां शब्दांचीं अनेकवचनें **स्त्रिया, स्त्रिया,** अशींच होतात.

[उ] जर शब्दांचें अंत्याक्षर ई अथवा ऊ असलें तर त्यास विकल्पें **या** अथवा **वा** आदेश होतो; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| आई | आई, आया | बाई | बाई, बाया | गाई | गाई, गाया |
| राई | राई, राया | खाई | खाई, खाया | कुई | कुई, कुया |
| तवई | तवई, तवया. | अवई | अवई, अवया. | संवई | संवई, संवया. |

[ऊ] **उकारान्त.**

| **एक०** | **अने०** | **एक०** | **अने०** | **एक०** | **अने०** |
|---|---|---|---|---|---|
| सासू | सास्वा | जळू | जळ्वा | पेळू | पेळ्वा |
| वाळू | वाळ्वा. | टाळू | टाळ्वा. | पिसू | पिस्वा. |

यांत **सासू** आणि **पिसू** यांचीं देशस्थ रीतीं प्रमाणें अनेकवचनाचीं **सासा** आणि **पिसा** अशीं रूपें होतात.

**अपवादक शब्द**—खडू, गेरू, गुडाखू, तमाखू.

[ऋ] जर ते शब्द मूळचे अकारान्त असून अपभ्रंशेंकरून उकारान्त झाले असले, अथवा विकल्पें अकारान्त असले, तर त्यांचीं अनेकवचनांचीं रूपें विकल्पें मूळ शब्दाच्या नियमा प्रमाणें होतात; जसें—

| **एक०** | **अने०** | **एक०** | **अने०** |
|---|---|---|---|
| पाचू (पाच) | पाचा, पाचू | माऊ (माव) | मावा, माऊ |
| शेळू (शेळ) | शेळा, शेळू | शेपू (शेप) | शेपा, शेपू. |

[ॠ] परंतु अंत्य अक्षर ऊ असल्यास विकल्प नाहीं; **जाऊ, पाऊ,** इ० शब्दांचीं अनेकवचनें **जावा, पावा,** अशींच होतात.

[ऌ] उकारान्त संस्कृत शब्द (पाहा पृष्ठ ५०, लेख १५२ [अ] ).

| **एक०** | **अने०** | **एक०** | **अने०** | **एक०** | **अने०** |
|---|---|---|---|---|---|
| धेनु | धेनु | धातु | धातु | रज्जु | रज्जु |
| चमू | चमू. | वधू | वधू. | भू | भू. |

[ॡ] **आऊ, माऊ,** या शब्दांचीं उभयवचनांचीं रूपें समान होतात.

[ए] **ऊ** या शब्दाचें अनेकवचन **उवा** असें होतें.

[ऐ] धू* शब्दाचें अनेकवचन धुवा असें होतें.

[ओ] परंतु जर ते शब्द मूळचे ईकारान्त असून ईचा लोप होऊन ऊकारान्त झाले असले तर मूळरूपा प्रमाणेंच त्यांच्या अनेकवचनांचीं रूपें होतात; जसें—सू (सुई) अने० **सुया.**

ईकारान्त फारसी शब्दाचें अनेकवचन मराठी ईकारान्त शब्दा प्रमाणेंच होतें; उदाह० "आह्मीं नानाच्या अमलांत सुभेदाऱ्या मुजूमदाऱ्या फडणिश्या वांकनिश्या करून पुढें मोठमोठया मुलूखगिऱ्या केल्या, नंतर दैवाची रेषा फिरली तेव्हां लोकांच्या खिदमतगाऱ्याहि कराव्या लागल्या, परंतु अश्या खोटया सह्या करून दगलबाज्या कधीं केल्या नाहींत."

[औ] जे ऊकारान्त शब्द परभाषेंतून या भाषेंत आले आहेत त्यांचीं उभयवचनांचीं रूपें समान होतात; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| बाजू | बाजू | अफू | अफू | अब्रू | अब्रू |
| तराजू | तराजू. | कानू | कानू. | जादू | जादू. |

**अपवादक शब्द**—खडू, गेरू, गुडाखू, कुरकू, कौलू, शाडू, इ०. (हे परभाषेचे शब्द नसतां यांचीं उभयवचनां समान रूपें होतात).

**ऋकारान्त.**

१५३ शुद्ध महाराष्ट्र असे ऋकारान्त स्त्रीलिंग शब्द नाहींत. ऋकारन्त जे संस्कृत शब्द आहेत त्यांचीं प्रथमेचीं रूपें या भाषेंत वर्त्ततात. त्यांचीं वचनें आकारान्त स्त्रीलिंग शब्दां प्रमाणें जाणावीं; जसें—माता, स्वसा, श्वश्रू, इ०.

* या शब्दाचा व्यवहार बहुधा मुंबईत कितीएक जातीं मध्यें मात्र आढळतो.

### ए-ऐ-औकारान्त.

१५४ **आते** या शब्दा शिवाय एकारान्त शब्द या भाषेंत आढळत नाहीं. याचें अनेकवचन **आत** शब्दाच्या प्रमाणें **आता** असें होतें.

१५५ **संवे** हा **संवई** शब्दाचा अपभ्रंश; याचें अनेकवचन **संवया** असें होतें.

१५६ ऐ-**औ**कारान्त स्त्रीलिंग शब्दांविषयीं जो नियम पुल्लिंगप्रकरणीं सांगितला तोच जाणावा. ( पहा पृ० ४३, ले० १३९ ).

| एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|
| तिवे तिवई | तिवय, तिवया | गै गई | गय, गया |
| खै खई | खय, खया | जिल्है जिल्हई | जिल्हय, जिल्हया. |

एक०—चौ चऊ चव. अने०—चवा.

### ओकारान्त.

१५७ **ओ**कारान्त स्त्रीलिंग शब्द या भाषेंत एकच आहे असें वाटतें, त्याचें अनेकवचन **आ**कारान्त होतें; जसें—बायको, बायका.

कोंकणांत निंदेनें ढमाल्ल बायकोस **ढंवो**, **ताटको** असें ह्मणतात; तव्हां या शब्दांचा अनेकवचनीं प्रयोग कर्तव्य असताहि हाच नियम जाणावा. उदाह०—"ही ढंवो आली ह्मणजे कांहीं केल्या जात नाहीं, ह्या तुकल्याच ढंवा येऊन गेल्या आतां ताटका येतील."

---

## प्रकरण ३.

### नपुंसकलिंग.

### अकारान्त.

१५८ **अ**कारान्त नपुंसक शब्दास अनेकवचनीं ऍं आदेश होतो; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| पान | पानें | वस्त्र | वस्त्रें | अंग | अंगें |
| छिद्र | छिद्रें | तेल | तेलें | घर | घरें |
| सूप | सुपें | तूप | तुपें | रूप | रूपें |
| रेशीम | रेशमें. | दफतर | दफतरें. | लांकूड | लांकडें. |

### आकारान्त.

१५९ आकारान्त नपुंसक शब्द नाहींत.

### इकारान्त आणि उकारान्त.

१६० ऱ्हस्वइकारान्त जे संस्कृत शब्द त्यांचीं उभयवचनाचीं रूपें समान होतात; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| अग्नि | अग्नि. | अस्थि | अस्थि. | वारि | वारि. |

१६१ इकारान्त आणि उकारान्त नपुंसक नामांत अंत्यवर्णांत संप्रसारण होऊन अनेकवचनीं एँ आदेश होतो; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|
| मोती | मोत्यें | मिरीं | मिऱ्यें |
| गुळीं | गुळ्यें | आशी | आश्ये* |
| कुणी | कुण्यें. | केवरी | केंवऱ्यें. |

१६२ विवक्षा असता वीं याचें अनेकवचन विपें असें होतें.

१६३ आर्द्रपदार्थवाचक जीं इकारान्त नपुंसक नामें यांच्या अनेकवचनांचा संभव नसतो, आणि जरी अनेकवचनीं प्रयोग कर्तव्य असला तथापि त्यांचीं उभयवचनीं रूपें समान होतात. जसें—पाणी, दहीं, लोणी, इ०.

---

*हा शब्द महाराष्ट्र कोशांत नाहीं, परन्तु कोंकणांत फार प्रसिद्ध आहे. याचा अर्थ पोरे पावसाळ्या नंतर जे सुका सकळ अपविद्ध करून राखतात ते.

आतां एथें अशी आशंका प्राप्त होती कीं **मोतीं**, **मिरीं**, इ० शब्दांचीं अनेकवचनीं **मोतें**, **मिरें**, अशीं रूपें न लिहितां त्यांस संप्रसारण करून **मोत्यें**, **मिर्‍यें**, अशीं रूपें लिहिण्यास आधार कोणता? लोकांचें उच्चारण आधार म्हणावा तर तो कांहीं सबळ आधार नव्हे, कारण **मोत्यें** आणि **मोतें** यांच्या उच्चारणांत फारसा भेद लक्षांत येत नाहीं. त्यांत आणखी कोंकणांत यकार स्पष्ट उच्चारून **मोत्यें**, **मिर्‍यें** असें म्हणतात; देशावर तितका यवर नेट ठेवित नाहींत. तेव्हां हें कांहीं अशीं रूपें लिहिण्यास सबळ कारण नव्हे. त्यास एक तर या भाषेंत इकारान्त, उकारान्त शब्दास पुढें अजादि* प्रत्यय लागले असतां बहुधा इस आणि ऊस संप्रसारण होत असतें हा आधार. दुसरें, इकारान्त नपुंसक शब्दांचे बंधु जे कित्येक उकारान्त नपुंसक शब्द, त्यांस तर हें संप्रसारण अवश्य होतें: जसें **तारूं** याचें अनेकवचन **तार्वें** असें होतें, **तारें** असें कदापि होत नाहीं. तेव्हां **मोतीं** याचें अनेकवचनाचें रूप **मोत्यें** असेंच लिहिलें पाहिजे; **मोतें**, **मिरें** अशीं रूपें लिहिणें प्रशस्त नाहीं. तिसरा आणखी असा नियम आहे कीं, इकारान्त आणि उकारान्त शब्द ज्यांस अनेकवचनीं संप्रसारण होत असतें ते जर एकाक्षरी असले तर संप्रसारणाच्या स्थानीं **इय्** आणि **उव्** असे आदेश होऊन पुढें जो अनेकवचनीं प्रत्यय लागायाचा तो लागतो; जसें स्त्री आणि भ्रू यांत संप्रसारणाच्या स्थानीं **इय** आणि **उव्** हे आदेश होऊन पुढें अनेकवचनाचा प्रत्यय जो **आ** तो होतो; तेव्हां **स्त्रिया** आणि **भ्रुवा** अशीं अनेकवचनाचीं रूपें होतात; याच नियमास अनुसरून **बीं** या इकारान्त नपुंसकाचें **बियें** असें रूप होतें; एथें अनेकवचनाचा प्रत्यय ए होय; या वरून अर्थात् सिद्ध होतें कीं, जसें **काठी**, **सासू**, याचीं अनेकवचनीं **काठ्या**, **सास्वा** अशीं रूपें होतात, त्याच नियमास अनुसरलें असतां **मोतीं**, **मिरीं** यांचींहि **मोत्यें**, **मिर्‍यें** अशींच रूपें लिहिलीं पाहिजेत.

---

* स्वरादि.

**उकारान्त.**

| १६४ एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|
| तारूं | तार्वें | असूं | अस्वें |
| अळूं | अळ्वें | गळूं | गळ्वें. |

वरील नियमा प्रमाणें उकारान्त नपुंसक नामांचीं रूपें अशींच लिहावीं, **तारवें, अळवें, असवें** या प्रमाणें रूपें लिहिण्याचा परिपाठ फार आहे, परंतु तो शुद्ध नव्हे.

१६५ दोहों पेक्षां अधिकाक्षरी जीं उकारान्त नपुंसक नामें, अथवा कुत्सितार्थदर्शक किंवा लघुत्वार्थदर्शक जीं उकारान्त द्व्यक्षरी नामें, त्यांस अनेकवचनीं संप्रसारण होत नाहीं; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|
| लेकरूं | लेकरें | गुरूं | गुरें |
| पांखरूं | पांखरें | रताळूं | रताळें |
| वांसरूं | वांसरें. | तट्टूं | तट्टें. |

१६६ **लिंवूं** अ० **निंवूं** शब्दाचें अनेकवचन **लिंवें** अ० **निंवें** होतें. **सुकाणूं**, **जिवाणूं** या शब्दांचीं अनेकवचनें कोंकणांत **सुकाण्वें**, **जिवाण्वें** अशीं होतात.

[अ] यांत ज्यांस संप्रसारण होऊन ए आदेश होतो त्यांस **तार्वादिकांचा** गण, आणि ज्यांस हें संप्रसारण होत नाहीं त्यांस **लेकरादिकांचा** गण ह्मटलें आहे.

**एकारान्त.**

१६७ एकारान्त नपुंसक नामास अनेकवचनीं ई आदेश होतो; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|
| तळें | तळीं | भांडें | भांडीं |
| घोंसाळें | घोंसाळीं. | बोलणें | बोलणीं. |

## प्रकरण ४.

### वचनसंबंधीं स्फुट विचार.

१६८ कितीएक शब्द बहुधा एकवचनांतच वर्त्ततात; जसें, पाणी, सोनें, रुपें, ताक, तेल, दूध, गहूं, बाजरी, कांजी, इ०.

१६९ कितीएक शब्द बहुधा अनेकवचनांतच वर्त्ततात; जसें—मुस्क्या, कास्या, खडावा, मिश्या*, कारेवारे, मिटक्या, ख्याल, इ०.

## प्रकरण ५.

### उपान्त्यनियम.

१७० उपांत्य ई अथवा ऊ असतां ११६ व्या नियमाप्रमाणें त्या उपांत्यास कार्य होऊन अनेकवचनांचीं रूपें सिद्ध होतात; जसें—

#### स्त्रीलिंग.

| एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|
| जीभ | जिभा | बंदूक | बंदुका--की |
| टीक | टिका | संदूक | संदुका |
| खारीक | खारका | कावीळ | कावळी. |

* लहान असल्यास मिशी ह्मणतात.

| | | | |
|---|---|---|---|
| सोपरीक | सोपरिकी—का | तिडीक | तिडिका—डका |
| बाभूळ | बाभळी | निंबूण | निंबणी |
| जांबूळ | जांबळी | माजूम | माजमी—माजुमी |
| बकूळ | बकुळी | बटीक | बटिकी—टकी |
| चूल | चुली | विहीर | विहिरी |
| तजवीज | तजविजा—जी. | चाहूल | चाहुली. |

नपुंसकलिंग.

| एक॰ | अने॰ | एक॰ | अने॰ |
|---|---|---|---|
| भरीत | भरितें—रतें | रेजीम | रेजमें |
| भोरीप | भोरपें | कणीस | कणिसें—णसें |
| रेशीम | रेशमें | अंबसूल | अंबसुलें |
| जोखीम | जोखमें. | वाघूळ | वाघळें. |

१७१ उपांत्य जर ई अथवा ऊ हे वर्ण असले, आणि अनेकवचनीं अंत्यवर्णास दीर्घत्व प्राप्त झालें, तर ११९व्या नियमा प्रमाणें ते उपांत्य ऱ्हस्व होतात; विकल्पें त्यांस संप्रसारणहि होतें; जसें—

स्त्रिलिंग.

| एक॰ | अने॰ | | एक॰ | अने॰ | |
|---|---|---|---|---|---|
| काईल | काइली | कायली | ताईत | ताइती | तायती |
| अईन | अइनी | अयनी | कवाईत | कवाइती | कवायती |
| सुईण | सुइणी | सुयणी | पंचाईत | पंचाइती | पंचायती |
| दऊत | दउती | दवती | ओंऊळ | ओंउळी | ओंवळी |
| माऊली | माउल्या | मावल्या. | माऊशी | माउश्या | मावश्या. |

**नपुंसकलिंग.**

| एक० | अने० | | एक० | अने० | |
|---|---|---|---|---|---|
| कुईट | कुइटें | कुयटें | बाईल | बाइला | बायला |
| देऊळ | देउळें | देवळें | पाऊल | पाउलें | पावलें |
| कऊल | कउलें | कवलें. | राऊळ | राउळें | रावळें. |

१७२ शुद्ध संस्कृत शब्दांच्या उपांत्यात अनेकवचनीं कांहीं विशेष होत नाहीं; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|---|---|
| गीत | गीतें | रूप | रूपें | सूत्र | सूत्रें. |

## प्रकरण ६.

### च ज इ० वर्णां विषयीं नियम.

१७३ **च ज झ स** हीं अक्षरें नामाच्या अंतीं असून जर त्यांस अजादि प्रत्ययें करून ए अथवा इ असा विकार होत असला, तर त्यांचा विकल्पें तालव्य उच्चार होऊन पुढें ते प्रत्यय लागत असतात, यांत इ असतां विकल्प नाहीं असलाच तर **स** असतां होतो.

| एक० | अने० | | एक० | अने० | |
|---|---|---|---|---|---|
| राजा | राजे | राजे | चमचा | चमचे | चमचे |
| सांजा | सांजे | सांजे | भाचा | भाचे | भाचे |
| आरसा | आरसे | आरशे | मासा | मासे | माशे |
| चोंच | चोंचा | चोंची | खोंच | खोंची | खोंची |
| तजवीज | तजविजी | तजविजी | तज | तजी | तजी |
| रास | राशी | रासी. | घूस | घुशी | घुसी. |

कोणास असें वाटेल कीं, या नियमाची कांहीं अवश्यकता नाहीं; परंतु त्यांहीं असें समजावें कीं, जसें कोंकणांत राजे,

**भाचे** या प्रमाणें उच्चारण्याचा प्रचार आहे, तसा देशांत व इतर ठिकाणीं **राते, भाचे** इ० उच्चारणाचाहि प्रचार आढळतो. त्यास आणखी एक दुसरें प्रमाण;-या भाषेंत **च ज झ** आणि **स** यांजपुढें ए आणि इ हे स्वर असतां त्यांचा दंततालव्य उच्चार बहुधा राहत नाहीं, असा एक नियम आढळतो; कांकीं **चै जी चि जि** हीं अक्षरें आरंभीं अथवा मध्यें आहेत ज्यांच्या, असे शब्दच या भाषेंत आढळत नाहींत. तेव्हां कार्यविशेषेंकरून **च, ज, स,** इ० वर्णां पुढें शब्दांच्या अंतीं ए अथवा इ आला असतांहि त्याच नियमास अनुसरून कित्येक प्रांतीं **राते, भाचे, राशी** इत्यादि प्रकारें बोलतात; हा नियम आपण कोणत्या आधारा वरून समूळ काढून टाकावा; म्हणोन एथें वैकल्पिक असेंहि रूपें होतात असें लिहिलें आहे. वरकड शुद्ध रीति म्हटली असतां-**राते-भाचे-मासे**, हीच जाणावी.

[अ] एकार आणि इकार म्हटलें यावरून अन्य विकार झाला असतां दंततालव्योच्चारच राहतो; जसें—

| एक० | अने० | एक० | अने० |
|---|---|---|---|
| काच | कांचा | टांच | टांचा |
| वाज | वाजा | वीझ | विझा |
| कास | कांसा. | जिन्नस | जिन्नसा. |

## वर्ग ३.

### विभक्तिविचार.

१५४ नामाशीं आणि क्रियेशीं जो संबंध त्यास **कारक** अशी संज्ञा आहे, आणि हा संबंध सुचविणारे जे प्रत्यय तदन्त जे शब्द त्यांस **विभक्ति** ह्मणतात.

१५५ या विभक्ति आठ आहेत— **प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी,** आणि **संबोधन.**

**प्रथमा** विभक्ती असतां नामास कांहीं कार्य होत नाहीं; जें मूळचें रूप तेंच प्रथमा; इतर विभक्ति असतां नामां वरून त्या त्या विभाक्तीचे जे प्रत्यय होतात ते असे.—

| विभक्ति० | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| द्वितीया. | ला. स. तें. | ना. ला. स. तें. |
| तृतीया. | नें. एं. शीं. | नीं. हीं. ईं. शीं. |
| चतुर्थी. | ला. स. तें, अर्थ. | ना. स. तें. अर्थ. |
| पंचमी. | ऊन. हून. ँतून. | ऊन. हून. ँतून. |
| षष्ठी. | चा. ची. चें. | चा. ची. चें. |
| सप्तमी. | ँत. ई. आं. | ँत. ई. आं. |

अनेकवचनाचे प्रत्यय लागतांना अंगाचा अंत्य स्वर अनुनासिक होतो.

१७६ आतां स्पष्ट करण्याकरितां या विभक्ति एका नामास लावून खालीं दाखवितों.

## पुरुषशब्द.

| विभक्ति. | एकव० |
|---|---|
| प्र० | पुरुष. |
| द्वि० | पुरुषाला. पुरुषास. पुरुषातें. |
| तृ० | पुरुषानें. पुरुषें. पुरुषाशीं. |
| च० | पुरुषाला. पुरुषास. पुरुषातें. |
| पं० | पुरुषाहून. पुरुषांतून. |
| ष० | पुरुषाचा. |
| स० | पुरुषांत. पुरुषीं. |
| सं० | पुरुषा. |

| विभक्ति. | अनेकव०. |
|---|---|
| प्र० | पुरुष. |
| द्वि० | पुरुषांना. पुरुषांला. पुरुषांस. पुरुषांतें. |
| तृ० | पुरुषांनीं. पुरुषांहीं. पुरुषीं. पुरुषांशीं. |
| च० | पुरुषांना. पुरुषांला. पुरुषांस. पुरुषांतें. |
| पं० | पुरुषांहून. पुरुषांतून. |
| ष० | पुरुषांचा. |
| स० | पुरुषांत. पुरुषीं. |
| सं० | पुरुषांनों. पुरुषांहो. |

या भाषेत विभक्ति विषयीं फार गोंधळ आहे. जर प्रत्यया वरून विभक्ती मानाव्या, तर चतुर्थीस आणि पंचमीस प्रत्यय नाहींत ; जर अर्था वरून विभक्ति मानाव्या, तर एका विभक्तीचे अनेक अर्थ होतात ; ह्मणूनच, या व्याकरणाच्या प्रथमावृत्तींत कोठें अर्थास, आणि कोठें प्रत्ययास, अनुसरून विभक्ती मानिल्या होत्या; परंतु अलीकडेस एका विद्वान मित्राचें असें मत पडलें कीं, अशानें एक नियम राहत नाहीं. यास्तव संस्कृत भाषेच्या नियमा प्रमाणें प्रत्यया वरूनच विभक्ति मानाव्या हें नीट. परंतु असें केल्यानें ही जी पूर्वोक्त अडचण आहे तिचें निवारण होत नाहीं. तेव्हा जेथें विभक्तिप्रत्यय नाहींत तेथें शब्दयोगी अव्ययांची योजना करून निर्वाह करणें प्राप्त होतें. परंतु हीं अव्ययें पुष्कळ आहेत यांतून कोणतीं या विभक्तीच्या स्थानीं योजावीं ही एक आशंका उत्पन्न होती; जर **साठीं**, **करितां** यांस चतुर्थी, आणि **पासून**, **कडून**, **पेक्षां** यांस पंचमी मानावी, तर मग **स्तव**, **अर्थी**, **कारणें**, यांस चतुर्थी, **वरून**, **खालून**, **आंतून**. यांस पंचमी, **योगें**, **करवीं**, **करून** यांस तृतीया, आणि **प्रत**, **लागीं**, यांस द्वितीया, कां मानूं नये ! अशी सहज आशंका उत्पन्न होती, आणि तिचें यथास्थित समाधान होत नाहीं.

तथापि सूक्ष्म विचार करून पाहिलें असतां हा पक्ष कांहींसा सयुक्तिक दिसतो ; कारण, जर केवळ अर्थासच अनुसरून विभक्ति

मानिल्या तर एका विभक्तीचे अनेक अर्थ होतात, असें कारकप्रकरणीं सविस्तर सांगितलें आहे, तेव्हां हा नियम अगदीं चालणार नाहीं. विभक्ति ह्मणजे कारकसंबंधाद्यर्थसूचक जे प्रत्यय ते लागून जें रूप सिद्ध होतें त्या रूपाची संज्ञा होय; तदंतर्गत जे अर्थ आहेत त्यांची संज्ञा नव्हे. अर्थावरून विभक्ति मानिल्या असतां कदाचित् एका रूपाच्याठायीं कर्ताकर्मकरणसंप्रदानादि चार पांचही विभक्त्यर्थांची संभावना होती, तेव्हां त्या रूपास तो तो अर्थ विवक्षित असतां ती ती विभक्ति ह्मटली पाहिजे. ही आणखी मोठी अडचण आहे, तेव्हां आतां या दोन्ही अडचणींचें निवारण कसें होतें? त्यास, मला असें वाटतें कीं द्वितीया आणि चतुर्थी यांचीं रूपें सारखींच मानिलीं असतां ही अडचण दूर होईल. मग या अव्ययांची योजना करायास नको; एका कर्माच्या अर्थाशिवाय जेथें द्वितीयेचें रूप आढळेल ती चतुर्थी मानावी. आणि वाक्यांत कर्म जाणायास विशेष कठीण पडत नाहीं. 'राजा दुष्टांस मारितो,' या वाक्यांत **दुष्टांस** ही द्वितीया मानावी आणि 'राजा ब्राह्मणास गाई देतो,' एथें **ब्राह्मणास** ही चतुर्थी मानावी; कां कीं एथें **गाई** हें प्रत्यक्ष कर्म आहे. आणखी असें मानायास आपल्यास संस्कृत व्याकरणाचाहि आधार आहे; त्यांत चतुर्थी आणि पंचमी यांची बहुवचनीं, तृतीया व चतुर्थी आणि पंचमी या विभक्तींचीं द्विवचनीं, आणि कित्येक नामांचीं पंचमी आणि षष्ठी यांचीं एकवचनीं, आणि षष्ठी आणि सप्तमी यांचीं द्विवचनीं सारखींच रूपें होतात. तेथेंहि त्या त्या स्थळीं अर्थावरूनच विभक्तीचा निश्चय केला पाहिजे; तद्वत् एथेंहि द्वितीया आणि चतुर्थी असतां अर्थावरून विभक्तीचें विवेचन करावें, आणि तें करायास कांहीं कठीण नाहीं, कांकि वाक्यांत कर्म सहज ओळखतां येतें. या अर्थाशिवाय अर्थांतरीं सर्वत्र जेथें हें रूप आढळेल तेथें ती चतुर्थी मानावी.

जर संस्कृत आणि प्राकृत व्याकरणांचा मूलशाखासंबंध नसता, आणि तो संबंध ठेवणें इष्ट नसतें, तर चतुर्थीस केव्हांच काढून टाकून संबोधना सुद्धां सातच विभक्ति मानिल्या असत्या;

परंतु तसें करणें प्रशस्त दिसत नाहीं, कारण त्यांत लाभा पेक्षां हानि फार होत्ये.

आतां पंचमी विषयीं तर विशेष शंका आहे अशी गोष्ट नाहीं. **घरून, गांवून, हातून,** हीं केवळ उघडी पंचमी दिसती; **हून** हें बहुतकरून अव्यय वाटतें, परंतु हें अव्यय नव्हे; हा केवळ प्रत्यय दिसतो; ह्मणून घराहून, दाराहून, इत्यादि शुद्ध पंचमी विभक्ति जाणावी;–इतकेंच कीं **स, ला, ना,** इत्यादि विभक्तिप्रत्यया सारिखा हा एकाक्षरी प्रत्यय नव्हे.

### द्वितीया आणि चतुर्थी.

१५७ द्वितीया आणि चतुर्थी विभक्ति असतां मूळ प्रकृतीस **स, ला, तें,** हे प्रत्यय लागतात.

**स**– या प्रत्ययाचा उपयोग बोलण्यांत बहुधा कोंकणांत फार करितात; व इतर ठिकाणीं करणें झाल्याच तर लिहिण्यांत करितात.

**ला**– या प्रत्ययाचा प्रयोग देशस्थ लोकांत आढळतो; व **स** पेक्षां याचा प्रचार फार आहे.

**तें**– हा प्रत्यय भाषणांत येत नाहीं. बहुतकरून प्राकृत ग्रंथांत याचा प्रयोग आढळतो.

**अर्थ**– संस्कृत शब्दा वरूनच चतुर्थ्यर्थी हा प्रत्यय होत असतो; पूर्व वर्णाशीं यांतील अचा संधि होतो; जसें– द्रव्यार्थ, मोक्षार्थ, उदरभरणार्थ, प्रीत्यर्थ, इ०.

कोठें कोठें विभक्तीच्या योगानें जें अंग सिद्ध होतें, तेंच द्वितीयेचें रूप होतें. परंतु अशा रूपांचा प्रयोग प्राकृत ग्रंथांत व प्राकृत काव्यांत मात्र होतो; जसें–

"नक्र बोलिला तुज लागोन॥ तुझें नाम पतितपावन॥
आणि माझा अव्हेर करून॥ जासी घेवोन **गजेंद्रा.**"–भक्तिविजय.
"अगा प्रणतवत्सला ह्मणति त्या जनां पावलां,
ह्मणोनि तुमच्याच मीं स्मरतसें सदां **पावलां.**"–केकावलि.

"जीजी ह्मणोनि जाउनि, घेउनि आला सभेंत **भावजये** ॥
पतिव्रतांळि कलत्र नये, कांहीं सिद्धाश्रमांत सावज ये ॥ १ ॥
सांगत यथामति परि, कोठें तो नृप ह्मणे वहा **भ्रात्या** ॥
आणि सभेंत पुनरपि, वळवुनि विदुर वातसा **महाभ्रात्या**"—मोरोपंत.

## तृतीया.

१७८ नें—या प्रत्ययाचा प्रयोग इतर प्रत्ययां पेक्षां विशेष होतो.

एं—ईं—हे प्रत्यय विशेषेंकरून अकारान्त संस्कृत नामास कवितेंत लागतात, या काळीं अंत्य अकाराचा लोप होतो. उदाह०.

"तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदाचा **रजें**,
"न तें अनृत वर्णिना बुधजनीं सदाचार **ॲं**"—केकावलि
"**श्रोतीं** व्हावें सावधान."
"**हस्तीं** करी वलय उंच अशा **उपायीं**.
नृपें हळूच धरिला कलहंस **पायीं**."—वामन.

**शीं**—हा प्रत्यय बहुधा सन्निधान दर्शवितो; कधीं कारणही दर्शवितो.

याचा विचार कारकप्रकरणीं केला आहे.

मराठी भाषेंत तृतीया विभक्तीचें आणखी एका प्रकारचें रूप होतें. तें असें कीं, नामास आणि सर्वनामास षष्ठ्यन्त-सामान्यरूप होऊन त्यांस हे तृतीया विभक्तीचे प्रत्यय लागून तृतीयेचीं रूपें साधतात; जसें— रामाच्यानें, माझ्यानें, तुझ्यानें, त्यांच्यानीं, आमच्यानीं. इ०. या प्रकारच्या तृतीयेस **सविकरणतृतीया**, आणि या रूपांस **सविकरणतृतीयेचीं रूपें** ह्मणावें.

ही सविकरणतृतीया बहुधा शक्यार्थ असतां सर्वनामा वरून होते, जसें— माझ्यानें लिहवेल, तुझ्यानें चालवतें, इ०.

**नें, नीं** या प्रत्ययां शिवाय इतर तृतीयेचे प्रत्यय बहुधा षष्ठ्यंतसामान्यरूपा वरून होत नाहींत;— **आमच्यांशीं, तुमच्यांशीं**, अशीं, सर्वनामाचीं रूपें कोठें कोठें आढळतात, परंतु यां पेक्षां **आह्मांशीं तुह्मांशीं**, हीं रूपें शुद्ध होत.

## पंचमी.

१७९ **ऊन**— स्थलाचे अथवा अधिकरणाचे वाचक जितके पुल्लिंग व नपुंसकलिंग द्व्यक्षरी प्राकृत शब्द आहेत, त्यां वरून पंचम्यर्थी हा प्रत्यय होत असतो, सर्वत्र होत नाहीं; जसें— गांवून, घरून देशून, हातून तोंडून, इ०. हा प्रत्यय होत असतां नामाचें सामान्यरूप होत नाहीं.

**हून**— याचा प्रयोग बहुधा सर्वत्र होतो. हा प्रत्यय होत असतां नामाचें सामान्यरूप होतें.

**ंतून**— हें मूळचें **आंतून** होय. परंतु जसा **त** हा सप्तमीचा प्रत्यय मानावा तसा **तून** हा साधिकरण अपादानार्थ याचा वाचक पंचमीचा प्रत्यय मानिल्यास व्याकरण करिते समयीं पुष्कळ अडचणी दूर होतील. हा प्रत्यय होत असतां पूर्ववर्ण अनुनासिक होतो. जसें —गावांतून, डोंगंतून, इ०. असें न केलें तर व्याकरणपदच्छेद करायास मोठी अडचण पडेल.

## षष्ठी.

१८० **चा—ची—चें**—षष्ठीचा अर्थ संबंध आहे, यास्तव ही विभक्ती ज्याशीं संबंध ठेविते त्याच्या लिंगवचना प्रमाणें या प्रत्ययाचीं रूपें फिरतात.

| | पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|---|
| एकव० | चा | ची | चें |
| अनेक० | चे | च्या | चीं |

## सप्तमी·

१८१ **त. ई. आं**— यांत मराठी शब्दांस **त** हा प्रत्यय फार लागत असतो; व हा लाविते समयीं शब्दांचा अंत्य स्वर जर ऱ्हस्व असला, तर दीर्घ होऊन अनुनासिक होतो. दीर्घ असल्यास अनुनासिक मात्र होतो.

कित्येकांचें असें मत आहे कीं **त** हा प्रत्यय नव्हे, हें **आंत** शब्दयोगी अव्यय होय. **घरांत** ह्मणजे 'घराच्या आंत' असा विग्रह करून **घरांत, दारांत** अशा ठिकाणीं ते अव्ययीभाव समास मानितात. परंतु मला केवळ तसें वाटत नाहीं, **त** हें मूळचें **आंत** या अव्ययाचें संक्षिप्त रूप खरें; परंतु व्याकरण-पदच्छेद करिते समयीं आतां यास अव्यय मानणें प्रशस्त नाहीं: कारण, आकारान्त पुल्लिंग व नपुंसकलिंग शब्दांच्या ठायीं असा आभास व्हावयास अवकाश आहे; परंतु यास अव्यय मानून इकाराद्यंत शब्दां पुढें यांतील **आ**चा लोप करावा, त्या पेक्षां **त** हा सप्तमीविभक्तिप्रत्ययच मानावा हें मला बरें दिसतें.

[अ] **ई**—अकारान्त जीं संस्कृत नामें आहेत, त्यांस अंत्य-स्वराचा लोप करून हा प्रत्यय लावितात; जसें— वनीं, करीं मुखीं, इ०. देशकालवाचक शब्दांचीं, व इतर कित्येक मराठी शब्दांचींहि त्याच प्रमाणें या प्रत्ययाच्या योगानें सप्तमीचीं रूपें होतात; जसें—घरीं, गांवीं, देशीं, समयीं, हातीं, पायीं, तोंडीं, इ०.

[आ] **आँ**— कित्येक मराठी शब्दांत अंत्यस्वराचा लोप करून हा प्रत्यय लावितात; जसें— मायां पायां, इ०.

'वेदाचा तो अर्थ आह्मासीच ठावा,
इतरांनीं वाहवा भार **माथां**'.—तुकाराम.

१८२ कोणत्याहि नामास वर सांगितले विभक्तिप्रत्यय लाविले असतां, त्या नामाच्या अंत्यस्वराच्या स्थानीं जो विकार होतो, त्यास **विभक्तिकार्य** ह्मणतात; जसें—**पुरुष** या शब्दास विभक्ति लाविली असतां मध्यें जो (पुरुषास, पुरुषानें, पुरुषाचा, इ०.) आकाररूप विकार उत्पन्न होतो तें विभक्तिकार्य जाणावें.

हीं विभक्तिकार्यें नामाच्या लिंगा वरून आणि अंत्य स्वरा वरून भिन्न भिन्न होतात.

१८३ हें विभक्तिकार्य होण्याच्या पूर्वी जें शुद्ध मूळचें रूप, ज्या वरून पुढें विभक्तिप्रत्यय व्हावयाचे, त्या रूपास त्या विभक्तीच्या संबंधानें **अंग** अशी संज्ञा आहे; जसें **पुरुष** या शब्दास विभक्ति लावावयाची असतां तिच्या योगानें **पुरुष** यास अंग ही संज्ञा होय.

१८४ हें विभक्तिकार्य होऊन जें नामाचें रूप विभक्तिप्रत्ययग्रहणार्थ सिद्ध होतें, त्यास **सामान्यरूप** ह्मणतात; जसें **देव** या शब्दाचें सामान्यरूप **देवा**, **गंगा** या शब्दाचें सामान्यरूप **गंगे**, **तारूं** शब्दाचें सामान्यरूप **तारवा**.

१८५ सामान्यरूपाचा अंत्य स्वर अनेकवचनीं अनुनासिक होतो; जसें—**देवां**, **हत्तीं**, **काठ्यां**, **सास्वां**, **स्त्रियां**, इ०.

१८६ ज्यांचीं अनेकवचनीं दोन प्रकारचीं रूपें होतात, त्यांचीं सामान्यरूपेंहि त्या त्या प्रमाणें दोन दोन प्रकारचीं

होतात; जसें—**गाई, गायां; बाई, बायां; परातीं, परातां;** इ०.

१८७ या सामान्यरूपांत दोन भेद आहेत, एक **विभक्तिसामान्यरूप** जसें वर सांगितलें; आणि एक **विशेषणसामान्यरूप**, ह्मणजे जें विशेषणाचें अथवा विशेषणा सारिख्या शब्दाचें सामान्यरूप पुढील सविभक्तिक अथवा सशब्दयोगिक विशेष्याच्या संबंधानें मागें असतें तें; जसें—'हलक्या मनुष्याच्या तोंडीं लागूं नये', या वाक्यांत **हलक्या** हें विशेषणसामान्यरूप होय; तसेंच '**ज्या** भगवंतानें आपल्यास निर्माण केलें, **त्या** भगवंतास अनन्यभावें शरण असावें'; '**मज** रावणा सारिखे हटनात, तेथें **तुह्मा** गरीबांचा काय पाड'; एथें **ज्या, त्या, मज,** आणि **तुम्हा**, हीं सामान्यरूपें खरीं, परंतु विशेषणसामान्यरूपें जाणावीं.

१८८ विभक्तिसामान्यरूप जें असतें तेंच बहुधा विशेषणसामान्यरूप होतें.

या नियमास कोठें कोठें बाधकें आहेत, ह्मणोनच हा पृथक् संज्ञानिर्देश करण्याची आवश्यकता: ती पुढें सर्वनाम, विशेषण, आणि वाक्यरचना या प्रकरणांत समजेल.

१८९ विशेषणसामान्यरूपा पुढें विशेष्य असतां अनेकवचनीं त्या सामान्यरूपाचा अंत्य स्वर अनुनासिक करून लिहिण्याचा परिपाठ आढळत नाहीं:— जसें—'या मनुष्यांस', 'चांगल्या मुलांचीं', इ०.

१९० विशेषनामांस आणि कित्येक संस्कृत नामांस विभक्तिकार्य होत नाहीं; जसें— रामोबास, गंगानें, खंडूचा, हरीपासून, इ०.

१९१ तीं विशेषनामें किंवा संस्कृत नामें जर ऱ्हस्वस्वरान्त

असलां तर विभक्तीनें अंत्य स्वर दीर्घ होतो; जसें— भानू-
चा, कवीपासून, इ०.

१९२ जीं संस्कृत नामें बोलण्याच्या रूढींत फार अस-
तात, त्यांस इतर प्राकृत नामा प्रमाणें विभक्तिकार्यें होतात,
जसें— आत्म्याचा, पुस्तकानें, इ०.

१९३ जर नामाचा उपांत्य दीर्घ ई किंवा ऊ असला,
तर पुढल्या विभक्तिकार्यानें तो उपांत्य न्हस्व होतो; जसें—
रीत, रितीस; कूड, कुडापासून; इ०.

१९४ षष्ठी विभक्ति अंतीं असून पुढें कित्येक विभक्ति-
प्रत्ययांचा व शब्दयोगी अव्ययांचा योग होतो, त्या रूपास
**षष्ठ्यंतसामान्यरूप** अथवा **सविकरणसामान्यरूप** ह्म-
णावें; व पुढें तृतीयादिविभक्ति असतील त्यांस **षष्ठ्यंतसा-
मान्यरूपी** अथवा **सविकरणसामान्यरूपी** तृतीया असें
ह्मणावें; जसें— **त्याच्यानें**, एथें **त्याच्या** हें षष्ठ्यंतसामान्य-
रूप किंवा सविकरणसामान्यरूप, आणि **त्याच्यानें** ही षष्ठ्यंत
सामान्यरूपी किंवा सविकरणसामान्यरूपी तृतीया होय.
तसेंच **माझ्याहून** ही षष्ठ्यंतसामान्यरूपी किंवा सविकरण-
सामान्यरूपी पंचमी. अशींच 'मनुष्याच्या ठायीं,' 'तिच्या
करितां', इत्यादि स्थळीं शब्दयोगी अव्ययांच्या योगानें जीं
षष्ठ्यंतसामान्यरूपें होतात त्यांचीं उदाहरणें जाणावीं.

यांत विभक्ति लावायाची असतां **च्या** या प्रत्ययाचा योग
करितात, व शब्दयोगी अव्यय असतां **च्या** किंवा **चे** या दो-
हींतून कोणत्याही प्रत्ययाचा योग करितात. परंतु मला वाटतें
उभयपक्षीं **च्या** याचेंच ग्रहण योग्य होय.

## संबोधन.

१९५ दुसऱ्यास हाक मारावयाची असतां, अथवा

त्याचें लक्ष आपणाकडेस ओढून घ्यावयाचें मनांत असतां, जें नामास विभक्ती सारिखें कार्य होऊन रूप सिद्ध होतें, त्यास संबोधन ह्मणतात; जसें— रामा, देवा, आई, बये, मुलांनो, स्त्रियांनों, इत्यादि. विवक्षा असल्यास संबोधनार्थबोधक जीं अव्ययें, त्यांचीहि योजना या रूपां मागें करितात; जसें —अरे रामा, अगे बये, अहो बाबा, इ०.

१९६ याचा नियम असा आहे कीं, ज्या नामाचें जें एकवचनीं सामान्यरूप तेंच बहुधा त्याचें एकवचनीं संबोधनाचें रूप होतें; परंतु अनेकवचनीं मात्र त्यास अनुनासिक करून पुढें नों हा प्रत्यय लावितात; जसें—रामा, बये, देवांनों, बाबांनों, माणसांनों, इ०.

"सख्यांनो कृष्ण गडी आपुला राजा मथुरेचा झाला."

## विभक्ती विषयीं सामान्य नियम.

१९७ महाराष्ट्र भाषेंत नामांस विभक्ति लागल्या असतां नामांच्या जातिभेदानें सात प्रकारचीं सामान्यरूपें होतात.

पहिला प्रकार—यांत सामान्यरूप अंगा प्रमाणेंच असतें.

दुसरा प्रकार —यांत सामान्यरूपीं अंगाच्या अंत्यास दीर्घ आदेश होतो.

तिसरा प्रकार —यांत अंगाच्या अंत्यास सामान्यरूपीं या आदेश होतो.

चवथा प्रकार —यांत अंगाच्या अंत्यास सामान्यरूपीं ए आदेश होतो.

पांचवा प्रकार —यांत अंगाच्या अंत्यास सामान्यरूपीं ई आदेश होतो.

साहवा प्रकार — यांत अंगाच्या अंत्यास सामान्यरूपीं **आ** आदेश होतो.

सातवा प्रकार — यांत अंगाच्या अंत्य स्वरास संप्रसारण होऊन पुढें इतर नियमां प्रमाणें सामान्यरूप होतें.

याचा विस्तार करून खालीं दाखवितों.

## पहिला विभक्तिप्रकार.

१९८ **आ**कारान्त प्रतिष्ठितनामें, अथवा अधिकारवाचक कित्येक नामें, व शरीरसंबंधवाचक नामें, व दीर्घस्वरान्त विशेषनामें, व एकारान्त आणि **ओ**कारान्त नामें, व अनेकाक्षरी ईकारान्त व कित्येक ऊकारान्त स्त्रिलिंग शब्द. आणि एकाक्षरी शब्द यांचीं सामान्यरूपें पहिल्या प्रकारा प्रमाणें होतात; जसें—दादा, नाना, राघोबा, बये, बायको. लाहो, मशालजी, देवजी, ताई, भाऊ, खंडू, देवी, कुमारी, तंबाखू, च, मा, श्री, इ०.

## दुसरा विभक्तिप्रकार.

१९९ यांत आकारान्त इकारान्त आणि उकारान्त पुलिंग, कित्तीएक इकारान्त आणि उकारान्त स्त्रीलिंग, आणि. अकारान्त नपुंसकलिंग यांच्या अंगाच्या अंत्यास सामान्यरूपीं दीर्घ आदेश होतो; जसें—खांब—खांबा, कवि—कवी, साधु—साधू, व्यक्ति,—व्यक्ती धेनु—धेनू, बोर—बोरा, इत्यादि.

## तिसरा विभक्तिप्रकार.

२०० यांत **आ**कारान्त पुलिंग, आणि एकारान्त नपुंसकलिंग, यांच्या अंगाच्या अंत्यास **या** आदेश होऊन सामान्यरूप होतें; जसें—वांटा—वांट्या, तळें—तळ्या, इ०.

### चौथा विभक्तिप्रकार.

२०१ आकारान्त व कित्येक अकारान्त स्त्रीलिंग शब्दांच्या अंगास, ए आदेश होऊन सामान्यरूप होतें ; जसें—पागा—पागे, आत—आते, इ०.

### पांचवा विभक्तिप्रकार.

२०२ यांत कितीएक अकारान्त स्त्रीलिंग शब्दांच्या अंगास सामान्यरूपीं ई आदेश होतो ; जसें—भिंत—भिंती, चूल—चुली, इ०.

### सहावा विभक्तिप्रकार.

२०३ यांत कितीएक उकारान्त पुल्लिंग व नपुंसकलिंग नामांच्या अंगास, व एकारान्त संख्यावाचक पुल्लिंग विशेषणास, सामान्यरूपीं आ आदेश होतो : जसें—तट्टू—तट्टा, वांसरूं—वांसरा, दोघे— दोघां, इ०.

### सातवा विभक्तिप्रकार.

२०४ यांत कितीएक इकारान्त व उकारान्त नामांच्या अंगाच्या अंत्य स्वरास संप्रसारण होऊन ते शब्द अकारान्त होतात, नंतर त्यांच्या लिंगाच्या नियमा प्रमाणें त्यांचीं सामान्यरूपें होतात ; जसें—मोती मोत्या, न्हावी—न्हाव्या, लाडू—लाड्वा, सासू—सास्वे, तारूं—तार्वा, इ०.

---

## प्रकरण ९.

### पुल्लिंग नामें.

### अकारान्त.

२०५ अकारान्त पुल्लिंग नामाचें सामान्यरूप दुसऱ्या प्रकारा प्रमाणें होतें ; जसें—

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | वाघ. | वाघ. |
| द्वि० | वाघाला—स—तें. | वाघांना—स—तें. |
| तृ० | वाघानें—शीं. | वाघांनीं—शीं. |
| सं० | वाघा. | वाघांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

२०६ जर ते अकारान्त शब्द केवळ एकाक्षरी असले तर त्यांचीं सामान्यरूपें पहिल्या प्रकारा प्रमाणें होतात; जसें—'मुला तूं या कला काना द्यायास विसरलास,' 'या ढला तुह्मीं कितीहि पढविलें तरीं हा ढच्या ढचै,' इ०.

आकारान्त.

२०७ आकारान्त पुल्लिंग नामांचें सामान्यरूप तिसऱ्या प्रकारा प्रमाणें होतें: जसें—

आकारान्त पुल्लिंग आंबा शब्द.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | आंबा. | आंबे. |
| द्वि० | आंब्याला—स—तें. | आंब्यांना—स—तें. |
| तृ० | आंब्यानें—शीं. | आंब्यांनीं—शीं. |
| सं० | आंब्या. | आंब्यांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—धोंडा, खांबा, वांसा, डोळा, कांसोटा, बरेपणा, देवपणा, इ०. नामांचीं रूपें जाणावीं.

२०८ तीं आकारान्त नामें जर प्रतिष्ठा अथवा शरीरसंबंध यांचीं वाचक असलीं, अथवा एकाक्षरी असलीं, तर त्यांचीं सामान्यरूपें पहिल्या प्रकारा प्रमाणें होतात ; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | बाबा. | बाबा. |
| द्वि० | बाबाला—स. | बाबांना—स. |
| तृ० | बाबानें—शीं. | बाबांहीं—नीं—शीं. |
| सं० | बाबा. | बाबांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—तात्या, अण्णा, दादा, काका, मामा, नाना, दाजीबा, खंडोबा, जनोबा, नाखोदा, नाखवा, मुल्ना, मुल्ला, इत्यादि नामांचीं रूपें जाणावीं.

२०९ जे आकारान्त संस्कृत शब्द फारसे रूढींत नाहींत त्यांचीं सामान्यरूपें पहिल्या प्रकारा प्रमाणें होतात; जसें—आज्यपा, आज्यपास, आज्यपातें, चंद्रमाचें, इ०.

२१० तेच शब्द रूढींतले असले तर त्यांचीं तिसऱ्या प्रकारा प्रमाणें सामान्यरूपें होतात; जसें—आत्म्यांत, आत्म्याचें, इ०.

२११ जे शब्द संस्कृतांत मूळचे ऋकारान्त असून प्राकृतांत आकारान्त होतात, त्यांचीं सामान्यरूपें तिसऱ्या प्रकारा प्रमाणें होतात; जसें—

| विभ० | एकव० | अनेक० |
|---|---|---|
| प्र० | पिता. | पिते. |
| द्वि० | पित्याला—स. | पित्यांना—स. |
| तृ० | पित्यानें—शीं. | पित्यांहीं—नीं-शीं. |
| सं० | पित्या. | पित्यांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—भ्राता, भर्त्ता, धाता, कर्त्ता, दाता, योद्धा, स्वष्टा, इत्यादि नामांचीं रूपें जाणावीं.

२१२ याप्रत्ययान्त जीं साधितनामें त्यांचीं सामान्यरूपें पहिल्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; जसें—

| विभ० | एकव० | अनेक० |
|---|---|---|
| प्र० | पाग्या. | पाग्ये. |
| द्वि० | पाग्याला—स. | पाग्यांना—ला—स. |
| तृ० | पाग्यानें—शीं. | पाग्यांहीं—नीं—शीं. |
| सं० | पाग्या. | पाग्यांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें— वाघ्या, धाम्या, देशपांड्या, लांकुडफोड्या, आगलाव्या, इ० नामांचीं रूपें जाणावीं.

इकारान्त.

२१३ (ऱ्हस्व) इकारान्त शब्द बहुधा सर्व संस्कृत असतात; त्यांचीं सामान्यरूपें दुसऱ्या प्रकारा प्रमाणें होतात; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | कवि. | कवि. |
| द्वि० | कवीला—स. | कवींना—स. |
| तृ० | कवीनें—शीं. | कवींहीं—नीं—शीं. |
| सं० | कवी. | कवींनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—अग्नि, पति, अलि, हरि, मरीचि, वैधृति, अरि, गिरि, रवि, कलि, मुरारि, शकुनि, परिधि, शूलपाणि, चंद्रमौलि, प्रजापति, इ० नामांचीं रूपें जाणावीं.

२१४ (दीर्घ) ईकारान्त शब्दांचीं सामान्यरूपें सातव्या प्रकारा प्रमाणें होतात; जसें—

ईकारान्त पुल्लिंग **न्हावी** शब्द.

| **विभ०** | **एकव०** | **अनेकव०** |
|---|---|---|
| **प्र०** | न्हावी. | न्हावी. |
| **द्वि०** | न्हाव्याला—स. | न्हाव्यांना—स. |
| **तृ०** | न्हाव्यानें—शीं. | न्हाव्यांहीं—नीं—शीं. |
| **सं०** | न्हाव्या. | न्हाव्यांनों. |
| **इ०.** | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—तेली, तांबोळी, धोबी, गोंधळी, वाणी, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

याच प्रमाणें ईकारान्त जीं प्राकृत अथवा संस्कृत साधितनामें, त्यांचीं रूपें जाणावीं; जसें—शास्त्री, पापी, दोषी, गोसावी, संन्यासी, शेतकरी, गांवकरी, पुजारी, कोंकणी, इत्यादि. परंतु यांचीं संबोधनें मात्र पहिल्या प्रकारा प्रमाणें होतात. निंदा अथवा धिक्कार कर्तव्य असता सातव्या प्रकारा प्रमाणें संबोधन होतें, जसें— शास्त्र्या, अरे कोंकण्या, हे पुजाऱ्या, इ०. हा **सन्यास्याचा** गण जाणावा.

२१५ परंतु हत्ती आदिकरून कितीएक नामांचीं पहिल्या प्रकारा प्रमाणें सामान्यरूपें होतात ; जसें—

| **विभ०** | **एकव०** | **अनेकव०** |
|---|---|---|
| **प्र०** | हत्ती. | हत्ती. |
| **द्वि०** | हत्तीला—स. | हत्तींना—ला—स. |
| **तृ०** | हत्तीनें—शीं. | हत्तींनीं—शीं. |
| **सं०** | हत्ती. | हत्तींनों. |
| **इ०.** | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—हस्ती, करी, दंडी, दंती, यती, जती, वादी, प्रतिवादी, आततायी, केसरी, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं. हा हस्तीचा गण जाणावा.

२१६ जीकारान्त जीं प्रतिष्ठितनामें, आणि गुणवाचक अथवा अधिकारवाचक जीं ईकारान्त यवनी नामें, त्यांचीं-हि सामान्यरूपें पहिल्या प्रकारा प्रमाणें होतात; जसें—

| विभ० | एकव० | अनेक० |
|---|---|---|
| प्र० | पंतोजी. | पंतोजी. |
| द्वि० | पंतोजीला—स. | पंतोजींनां—स. |
| तृ० | पंतोजीनें—शीं. | पंतोजींहीं—नीं—शीं. |
| सं० | पंतोजी. | पंतोजींनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—बाजी, दाजी, बाबाजी, दादाजी, रामजी, मशालजी, काजी, मौलवी, दादी, फिर्यादी, इत्यादि नामांचीं रूपें जाणावीं.

उकारान्त शब्द.

२१७ (ऱ्हस्व) उकारांत शब्द बहुधा संस्कृत असतात, त्यांचीं सामान्यरूपें दुसऱ्या प्रकारा प्रमाणें होतात; जसें—

| विभ० | एकव० | अनेक० |
|---|---|---|
| प्र० | गुरु. | गुरु. |
| द्वि० | गुरूला—स. | गुरूंनां—ला—स. |
| तृ० | गुरूनें—शीं. | गुरूंहीं—नीं—शीं. |
| सं० | गुरू. | गुरूंनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें— भानु, शत्रु, ऋतु, वायु, मृत्यु, अगरु, देवदारु, अणुरेणु, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

२१८ (दीर्घ) ऊकारान्त पुलिंग शब्दांचीं सामान्य-रूपें तीन प्रकारचीं होतात, त्यांत पहिल्या प्रकारा प्रमाणें फार होतात.

यांत ज्यांचीं सामान्यरूपें सातव्या आणि सहाव्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात त्यांस अनुक्रमें **मेरूचा, गव्हांचा** आणि **तट्टाचा**, गण ह्मटलें आहे.

**पहिला प्रकार-मेरूचा** गण.

ऊकारान्त पुलिंग **मेरू** शब्द.

| **विभ०** | **एकव०** | **अनेक०** |
|---|---|---|
| **प्र०** | मेरू. | मेरू. |
| **द्वि०** | मेरूला—स. | मेरूंना—स. |
| **तृ०** | मेरूनें—शीं. | मेरूंनीं—शीं. |
| **सं०** | मेरू. | मेरूंनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—काजू, नारू, पेरू, चाकू, खडू, गडू, काऊ, खाऊ, डहू, वेळू, बांबू, दांडू, साडू, अळू, घरू, वळू, सांकू, वसू, बोरू, कोद्रू, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

२१९ संस्कृत (दीर्घ) ऊकारान्त जे—खलपू, वर्षाभू, स्वयंभू, प्रतिभू, इ० धातुसाधित शब्द, तसेच प्राकृत—वाटसरू, पोटभरू, चटणीखाऊ, झोंपाळू, लाजाळू, इ० धातुसाधित शब्द, यांचींहि सामान्यरूपें याच प्रमाणें जाणावीं.

२२० परंतु परभू शब्दास बहुधा तट्टाच्या गणांत लेखितात; जसें-

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | परभू. | परभू. |
| द्वि० | परभाला—स. | परभांना—ला—स. |
| तृ० | परभानें—शीं. | परभांही—नीं—शीं. |
| सं० | परभू. | परभांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

क्वचित् जेथें हो जाति फारशी प्रसिद्ध नाहीं त्या प्रांता या शब्दास मेरूच्या गणांत लेखितात; उदाह०—'या गांवांत परभूंचीं घरें नाहींत,' 'एथें पूर्वी कांहीं दिवस कायस्थ परभूंनीं अंमल चालविला होता,' इ०.

## दुसरा प्रकार—गव्हांचा गण.

२२१ लाडू आदिकरून जे थोडे शब्द ऊकारान्त आहेत त्यांचीं सामान्यरूपें बहुधा सातव्या प्रकारा प्रमाणें होतात; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | लाडू. | लाडू. |
| द्वि० | लाड्वाला—स. | लाड्वांना—ला—स. |
| तृ० | लाड्वानें—शीं. | लाड्वांनीं—शीं. |
| सं० | लाड्वा. | लाड्वांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—गहूं, नातू, विंचू, चाटू, नारू, काडू, इ० शब्दांचीं सामान्यरूपें होतात.

२२२ क्वचित् पहिल्या विभक्तिप्रकारा प्रमाणेंहि यांचीं सामान्यरूपें होतात. उ०—'दोन लाडूंनीं माझें पोट भरलें,' 'विंचूचों नांगी मोठी कठीण,' इ० असेहि प्रयोग होतात. यांत शिकणारांनीं ही गोष्ट लक्षांत ठेवावी की देशांत मेरूच्या गणाची, आणि कोंकणांत गव्हांच्या गणाची प्रवृत्ति विशेषेंकरून आढळते.

आतां **लाडू** आदिकरून शब्द, ज्यांचीं सामान्यरूपें सातव्या प्रकारा प्रमाणें होतात, त्यांचीं तीं रूपें लिहिण्याचे दोन प्रकार अढळतात **लाड्वानें**,आणि **लाडवानें**, परंतु यांत व्याकरणशुद्ध ह्मटलें ह्मणजे पहिलें रूप, याचें कारण या विभक्तिप्रकरणाच्या शेवटीं स्पष्ट केलें आहे. [पा० पृ०२६, ले० १६४.]

### तिसरा प्रकार-तट्टाचा गण.

२२३ कितीएक ऊकारान्त शब्दांचीं सामान्यरूपें बहुधा साहाव्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; जसे—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | तट्टू. | तट्टू. |
| द्वि० | तट्टाला—स. | तट्टांनां—ला—स. |
| तृ० | तट्टानें—शीं. | तट्टांनीं—शीं. |
| सं० | तट्टा. | तट्टांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—भट्टू, वाटसरू, यात्रेकरू, इ०.

२२४ यांचीं विकल्पे प्रथम प्रकारा प्रमाणेंहि सामान्यरूपें होतात.

२२५ **भाऊ** शब्द शरीरसंबंधवाचक असतां त्याचें

सातव्या प्रकारा प्रमाणें, आणि प्रतिष्ठितनाम असतां प्रथम प्रकारा प्रमाणें सामान्यरूप होतें; जसें—'माझ्या भावानें,' 'हा भाऊंचा मुलगा.'

२२६ एकाक्षरी जे (दीर्घ) ऊकारान्त शब्द, त्यांचीं सामान्यरूपें सातव्या प्रकारा प्रमाणेंच होतात. परंतु त्यांच्या अंगास संप्रसारणरूप आदेश होत असतां अंत्यस्वराचा लोप न होतां त्यास ऱ्हस्व आदेश होतो; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | पू. | पू. |
| द्वि० | पुवाला—स. | पुवांना—ला—स. |
| तृ० | पुवानें—शीं. | पुवांनीं—शीं. |
| सं० | पुवा. | पुवांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—गू, रू, शब्दांचीं रूपें जाणावीं.

ऋकारान्त शब्द.

२२७ महाराष्ट्र भाषेत ऋकारान्त शब्द नाहींत. संस्कृतांत जे ऋकारान्त शब्द आहेत, त्यांचे प्रथमेच्या एकवचनाचें जें त्या भाषेंत रूप होतें त्यास अंग मानून या भाषेंत त्यांचीं सामान्यरूपें होतात.(पा०पृ०४३,ले०१३७)

ओकारान्त शब्द.

२२८ ओकारान्त नामांचीं सामान्यरूपें पहिल्या प्रकारा प्रमाणें होतात; जसें—

ओकारान्त स्त्रीलिंग लाहो शब्द.

| विभ० | एकव० | अनेक० |
|---|---|---|
| प्र० | लाहो. | लाहो. |
| द्वि० | लाहोला—स. | लाहोंनां—ला—स. |
| तृ० | लाहोनें—शीं. | लाहोंनीं—शीं. |
| सं० | लाहो. | लाहोंनों. |
| इ०. | इ० | इ०. |

याच प्रमाणें—टाहो, डोहो, खो, छापो, इ०. शब्दांचीं रूपें जाणावीं.

---

## प्रकरण २.

### स्त्रीलिंगनामें.

अकारान्त.

२२९ वचनप्रकरणीं अकारान्त स्त्रीलिंगनामांचे तीन गण दाखविले आहेत, त्यांज वर लक्ष दिलें असतां या प्रकरणीं त्या शब्दांच्या सामान्यरूपांच्या नियमा विषयीं कांहीं अडचण पडायाची नाहीं. ते नियम या प्रमाणें.—

भिंतीचा गण.

२३० भिंतीच्या गणाचीं, अथवा ज्यांच्या अनेकवचनीं ई आदेश होतो अशा अकारान्त स्त्रीलिंग नामांचीं सामान्यरूपें पांचव्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात.

अकारान्त स्त्रीलिंग भिंत शब्द.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | भिंत. | भिंती. |
| द्वि० | भिंतीला—स. | भिंतींनां—ला—स. |
| तृ०. | भिंतीनें—शीं. | भिंतींनीं—शीं. |
| सं० | भिंती. | भिंतींनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—केळ, वांक, पोफळ, कावड, भेट, ह्मण, ओळख, कोरड, चाळण, उकड, थापट, भाकर, धावळ, चकमक, बसकट, बोर, तगर, रीत, गत, जात, शिंपीण, रजपुतीण, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

## आतेचा गण.

२३१ आतेच्या गणाचीं, अथवा ज्यांच्या अनेकवचनीं आ आदेश होतो अशा आकारान्त स्त्रीलिंग नामांचीं सामान्यरूपें चौथ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; आणि अनेकवचनाचें सामान्यरूप अनेकवचना प्रमाणें होतें. जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | आत. | आता. |
| द्वि० | आतेला—स. | आतांना—ला—स. |
| तृ० | आतेनें—शीं. | आतांहीं—नीं—शीं. |
| सं० | आते. | आतांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—जीभ, हांक, कांख, सून, धार, नणंद, समिध, इत्यादि शब्दांचीं रूपें जाणावीं.

## झेंपेचा गण.

२३२ झेंपेच्या गणाचीं, अथवा ज्या अकारान्त स्त्रीलिंग नामांचीं अनेकवचनीं वैकल्पिक रूपें होतात, त्यांचीं सामान्यरूपेंहि त्या त्या प्रमाणें वैकाल्पिक होतात; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
| --- | --- | --- |
| प्र० | झेंप. | झेंपी, झेंपा. |
| द्वि० | झेंपीला, झेंपेला; झेंपीस, झेंपेस. | झेंपींना, झेंपांना; झेंपींस, झेंपांस. |
| तृ० | झेंपीनें, झेंपेनें; झेंपीशीं, झेंपेशीं. | झेंपींनीं, झेंपांनीं; झेंपींशीं, झेंपांशीं. |
| सं० | झेंपी, झेंपे. | झेंपींनो, झेंपांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

यांत—फीत, हद्द, परात, वरात, बखर, बखार, इजार, कटार, तरवार, इत्यादि शब्दांचीं रूपें वैकल्पिक नाहींत.

२३३ ब (आई) या शब्दाचें सामान्यरूप पहिल्या प्रकारा प्रमाणें बन्न होतें; उ०—माझ्या बनें मला हा खाऊ दिला; माझी ब कोणी कडे गेली? इ०.

## आकारान्त.

२३४ आकारान्त स्त्रीलिंग नामाचें सामान्यरूप चौथ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतें; आणि अनेकवचनाचें सामान्यरूप अनेकवचना प्रमाणें होतें; जसें—

### आकारान्त स्त्रीलिंग पागा शब्द.

| विभ० | एकव० | अनेकव० |
| --- | --- | --- |
| प्र० | पागा. | पागा. |
| द्वि० | पागेला—स. | पागांना—ला—स. |
| तृ० | पागेनें—शीं. | पागांनीं—शीं. |
| सं० | पागे. | पागांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—जागा, माळा, मैना, रजा, गुहा, माता, भाषा, विद्या, मृत्तिका, अवस्था, रक्तता, शुभ्रता, गंगा, यमुना, मथुरा, द्वारका, इत्यादि नामांचीं सामान्यरूपें जाणावीं.

[अ] परंतु तींच जर स्त्रियांचीं ठेविलेलीं नामें असलीं, तर प्रतिष्ठेनें बोलायाचें असतां पहिल्या प्रकारा प्रमाणें सामान्यरूपें होतात; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | रमा. | रमा. |
| द्वि० | रमाला—स. | रमांना—ला—स. |
| तृ० | रमानें—शीं. | रमाहीं—नीं—शीं. |
| सं० | रमा. | रमांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—गंगा, यमुना, भीमा, द्वारका, इत्यादि स्त्रियांच्या नामांचीं सामान्यरूपें जाणावीं.

[आ] प्रतिष्ठेनें बोलायाचें नसल्यास—रमेला, रमेनें, रमे, अशीं रूपें होतात.

### इकारान्त.

२३५. (ऱ्हस्व) इकारान्त शब्द बहुधा संस्कृत असतात. त्यांचीं सामान्यरूपें दुसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | रुचि. | रुचि. |
| द्वि० | रुचीला—स. | रुचींना—ला—स. |
| तृ० | रुचीनें—शीं. | रुचींनीं—शीं. |
| सं० | रुची. | रुचींनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—शांति, भक्ति, जाति, ज्ञाति, आहुति, व्यक्ति, प्रकृति, इत्यादि नामांचीं रूपें जाणावीं.

'ज्या साध्वीनें कळी नसती वा तिळहि हानि रीतीची'.—मोरोपंत.

२३६ (दीर्घ) ईकारान्त स्त्रीलिंग नामांचींहि सामान्य-रूपें दुसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणेंच होतात; जसें—

ईकारान्त स्त्रीलिंग **काठी** शब्द.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | काठी. | काठ्या. |
| द्वि० | काठीला—स | काठ्यांना—ला—स. |
| तृ० | काठीनें—शीं. | काठ्यांनीं—शीं. |
| सं० | काठी, काठ्ये. | काठ्यांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—बगी, माडी, साडी, घोडी, चौकी, नदी, गोंकटी, पासोडी, शालजोडी, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

(अ) आई, काकी, मामी, इत्यादि शब्द जर शरीर-संबंधवाचक असले तर अनेकवचनीं त्यांचीं याच प्रमाणें रूपें होतात; परंतु जर तीं प्रतिष्ठित नामें असलीं तर अनेक-वचनीं त्यांचीं सामान्यरूपें प्रथम विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; जसें—आईना, काकींहीं, मामींस, इ०.

२३७ (दीर्घ) ईकारान्त जे संस्कृत शब्द आहेत त्यांचींहीं सामान्यरूपें याच प्रमाणें होतात; परंतु त्यांतून ज्यांच्या उभयवचनांचीं रूपें समान होतात, त्यांच्या अनेक-वचनाच्या सामान्यरूपांत मात्र त्या प्रमाणें विकार होतो; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव |
|---|---|---|
| प्र० | नारी. | नारी. |
| द्वि० | नारीला—स. | नारींना—ला—स. |
| तृ० | नारीनें—शीं. | नारींहीं—नीं—शीं. |
| सं० | नारी. | नारींनो. |
| इ० | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—देवी, सती, साध्वी, कुमारी, अटवी, श्रीमती, गर्भवती, सौभाग्यवती, इत्यादि शब्दांचीं रूपें जाणावीं.

२३८ स्त्रीशब्दाचें सामान्यरूप एकवचनीं विकल्पें सातव्या प्रकारा प्रमाणें होतें. तेव्हां यांत अंत्य स्वरास ऱ्हस्व होऊन पुढें संप्रसारण होतें; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | स्त्री. | स्त्रिया. |
| द्वि० | स्त्रीला—स; स्त्रियेला—स. | स्त्रियांना—ला—स. |
| तृ० | स्त्रीनें—शीं; स्त्रियेनें—शीं. | स्त्रियांहीं—नीं—शीं. |
| सं० | स्त्रिये. | स्त्रियांनो. |
| इ० | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—बी शब्दाचीं बियेला, बियेनें, बियांचा, इ० रूपें होतात. क्वचित्—बीला, बीनें, बींत इ० अशीहि रूपें आढळतात.

उकारान्त.

२३९ (ऱ्हस्व) उकारान्त शब्द बहुधा संस्कृत असतात. त्यांचीं सामान्यरूपें दुसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | धेनु. | धेनु. |
| द्वि० | धेनूला—स. | धेनूंना—ला—स. |
| तृ० | धेनूनें—शीं. | धेनूंनीं—शीं. |
| सं० | धेनू. | धेनूंनों. |
| इ० | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—धातु, रज्जु, रेणु, तनु, इत्यादि शब्दांचीं रूपें जाणावीं.

ऊकारान्त.

२४० (दीर्घ) ऊकारान्त स्त्रीलिंग नामांचीं सामान्यरूपें दोन प्रकारचीं होतात; त्यांत वधूच्या गणाचीं, ह्मणजे ज्यांचीं उभयवचनांचीं रूपें समान होतात त्यांचीं, सामान्यरूपें पहिल्या प्रकारा प्रमाणें होतात. (या वर्गांत कितीएक प्राकृत शब्द, व सर्व ऊकारान्त संस्कृत शब्द येतात,) आणि जळ्वेच्या गणाचीं, ह्मणजे ज्यांच्या अनेकवचनीं संप्रसारण होतें त्यांचीं, सातव्या प्रकारा प्रमाणें सामान्यरूपें होतात; जसें—

पहिला प्रकार—वधूचा गण.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | गेरू. | गेरू. |
| द्वि० | गेरूला—स. | गेरूंना—ला—स. |
| तृ० | गेरूनें—शीं. | गेरूंनीं—शीं. |
| सं० | गेरू. | गेरूंनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—गुडाखू, बाजू, अकू, आबरू, काकू, तंबाखू, खडू, आऊ, माऊ, इत्यादि प्राकृत शब्दांचीं, व चमू, वधू, भू, सुभ्रू, श्वश्रू, इ० संस्कृत शब्दांचीं रूपें जाणावीं.

दुसरा प्रकार. जळवेचा गण.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | जळू. | जळवा. |
| द्वि० | जळवेला—स. | जळ्वांना—ला—स. |
| तृ० | जळ्वेनें—शीं. | जळ्वांनीं—शीं. |
| सं० | जळवे. | जळ्वांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—सासू, जाऊ, पाऊ, वाळू, पिसू, दारू, पेळू, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

बहुधा **सासू** आदिकरून शब्दांचीं **सासवेला, सासवेस, सासवेनें, वाळवेचें, पिसवांनीं,** अशीं रूपें लिहिण्याचा प्रघात पडला आहे; परंतु व्याकरणदृष्टीनें पाहिलें असतां हा प्रघात शुद्ध नव्हे; **सास्वेला, सास्वेनें, वाळ्वेचें, पिस्वांनीं,** इ० हीं रूपें शुद्ध होत. (पा० पृ० ५६, ले० १६४.)

यांत विकल्पें देशपरत्वें **वधूच्या** गणांतील शब्द **जळ्वेच्या** गणांत, आणि **जळ्वेच्या** गणांतील शब्द **वधूच्या** गणांत मानून सामान्यरूपें होतात; जसें—कोंकणांत **सास्वेनें, सास्वेला,** इ०; आणि देशांत **सासूनें, सासूचा, जाऊनें, पिसूला, दारूचा,** इ० असें बोलतात.

यांत बहुधा असा नियम जाणावा कीं वधूच्या गणाची प्रवृत्ति देशावर, आणि जळवेच्या गणाची प्रवृत्ति कोंकणांत, विशेषेंकरून असते.

२४१ ऊ शब्दाचें सामान्यरूप ऊ अ० उवे असें होतें; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | ऊ. | उवा. |
| द्वि० | ऊला—स; उवेला—स. | उवांना—ला—स. |
| तृ० | ऊनें—शीं; उवेनें—शीं. | उवांनीं—शीं. |
| सं० | ऊ, उवे. | उवांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

२४२ धू शब्दाचीं सातव्या विभक्तिप्रकारा प्रमाणेंच रूपें होतात. एथें विकल्प नाहीं.

२४३ दयाळु, कृपाळु, इ० विशेषणें स्त्रीलिंग असतां संबोधनीं बहुधा—दयाळे, कृपाळे, अशीं रूपें होतात.

ऋकारान्त.

२४४ (पहा पृ० ४३, ले० १३७)

ए-ऐ-औकारान्त.

२४५ आते शब्दाचीं विभक्तिरूपें आत शब्दाच्या प्रमाणें जाणावीं.

२४६ संवे शब्दाचीं रूपें एकवचनीं विकल्पें आत शब्दाच्या प्रमाणें होतात; परंतु अनेकवचनीं तर मूळ शब्द जो संवई ह्याच्या अनेकवचनाच्या सामान्यरूपा प्रमाणें होतात.

२४७ ऐकारान्त आणि औकारान्त शब्दांचीं रूपें तीन प्रकारचीं असतात. (पहा पृ० ४३, ले० १३९.)

ह्मणोन त्यांचीं विभक्तीचीं रूपेंहि त्या त्या प्रमाणें तीन तीन प्रकारचीं होतात, जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | तिवै. | तिवया. |
| द्वि० | तिवईला. तिवयेला, तिवैला. | तिवईना, तिवयांना, तिवैंना. |
| तृ० | तिवईनें, तिवयेनें, तिवैनें. | तिवईनां, तिवयांनीं, तिवैंनीं. |
| सं० | तिवई, तिवये, तिवै, | तिवईनों, तिवयांनों, तिवैंनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—वै, गै, जिल्है, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

### ओकारान्त.

२४८ ओकारान्त स्त्रीलिंग शब्दांचीं सामान्यरूपें पहिल्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात. अनेकवचनाचीं सामान्यरूपें अनेकवचनाच्या नियमा प्रमाणें होतात; जसें—

ओकारान्त स्त्रीलिंग **बायको** शब्द.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | बायको. | बायका. |
| द्वि० | बायकोला—स. | बायकांना—ला—स. |
| तृ० | बायकोनें—शीं. | बायकांनीं—हीं—शीं. |
| सं० | बायको. | बायकांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें--बायो, ढेबो, ताटको, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

## प्रकरण ३.

### नपुंसकलिंग नामें.

अकारान्त.

२४९ अकारान्त नपुंसकलिंग नामाचें सामान्यरूप दुसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतें; जसें–

अकारान्त नपुंसकलिंग बोर शब्द.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | बोर. | बोरें. |
| द्वि० | बोराला–स. | बोरांना–ला–स. |
| तृ० | बोरानें–शीं. | बोरांनीं–शीं. |
| सं० | बोरा. | बोरांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें–ढोर, पोर, फूल, अन्न, वस्त्र, लांकूड, रेशीम, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

आकारान्त.

२५० (पहा पृ० ५४, ले० १५९)

इकारान्त.

२५१ (ऱ्हस्व) इकारान्त नपुंसकलिंग शब्द संस्कृत असतात, त्यांचीं सामान्यरूपें दुसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; जसें–

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | वारि. | वारि. |
| द्वि० | वारीला—स. | वारींना—ला—स. |
| तृ० | वारीनें—शीं. | वारींनीं—शीं. |
| सं० | वारी. | वारींनो. |
| इ० | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—अग्नि, अक्षि, दधि, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

२५२ (दीर्घ) ईकारान्त शब्दाचें सामान्यरूप सातव्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतें : जसें--

ईकारान्त नपुंसकलिंग **मोतीं** शब्द.

| विभ०. | एकव०. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | मोतीं. | मोत्यें. |
| द्वि० | मोत्याला—स. | मोत्यांना—ला—स. |
| तृ० | मोत्यानें—शीं. | मोत्यांनीं—शीं. |
| सं० | मोत्या. | मोत्यांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—मिरीं, गुळीं, आंशीं, कुणीं, कैवरीं, पाणीं, लोणीं, दहीं, चिंचवणीं, ताकवणीं, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

२५३ वीं शब्दाच्या अंत्य स्वरास ऱ्हस्व होऊन पुढें संप्रसारण होतें ; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | बीं. | बियें. |
| द्वि० | बियाला—स. | बियांना—ला—स. |
| तृ० | बियानें—शीं. | बियांनीं—शीं. |
| सं० | बिया. | बियांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

उकारान्त.

२५४ (ऱ्हस्व) उकारान्त नपुंसकलिंग नामाचें सामान्यरूप दुसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतें; जसें—

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मधु. | मधु. |
| द्वि० | मधूला—स. | मधूंना—स. |
| तृ० | मधूनें—शीं. | मधूंनीं—शीं. |
| सं० | मधू. | मधूंनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—वस्तु, जानु, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं. [हे शब्द संस्कृतांत नपुंसकलिंग होत, ह्मणोन त्या आधारावरून कोणी मराठींतही नपुंसक मानितात].

२५५ (दीर्घ) ऊकारान्त नपुंसकलिंग नामांचीं सामान्यरूपें दोन प्रकारचीं होतात, त्यांत लेंकराचा गण ह्मणजे ज्यांच्या अनेकवचनीं केवळ ए आदेश होतो, त्यांचीं सामान्यरूपें सहाव्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; आणि नावांचा गण ह्मणजे ज्यांच्या अनेकवचनीं संप्रसारण होऊन ए आदेश होतो, त्यांचीं सामान्यरूपें सातव्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; जसें—

## पहिला प्रकार-लेंकराचा गण.

ऊकारान्त नपुंसकलिंग **वांसरूं** शब्द.

| विभ०. | एकव०. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | वांसरूं. | वांसरें. |
| द्वि० | वांसराला—स. | वांसरांना—स. |
| तृ० | वांसरानें—शीं. | वांसरांनीं—शीं. |
| सं० | वांसरा. | वांसरांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—गुरूं, तट्टूं, निंबूं, पिलूं, पाखरूं, वांसरूं. करडूं, अगरूं, परसूं, मेंढरूं, फाळ्टूं, रेडकूं, टिपरूं, शेरडूं, शिंगरूं, सुकाणूं, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

## दुसरा प्रकार-तावांचा गण.

| विभ०. | एकव०. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | तारूं. | तावें. |
| द्वि० | तावाला—स. | तावांना—ला—स. |
| तृ० | तावानें—शीं. | तावांनीं—शीं. |
| सं० | तावा. | तावांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—असूं, अळूं, गळूं, कुंकूं, कुसूं, थरूं, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

[अ] **सुकाणूं** आणि **जिवाणूं** यांचीं दोन प्रकारचीं रूपें होतात.

२०६ एकारान्त नपुंसकलिंग नामाचें सामान्यरूप तिसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतें; असें—

एकारान्त नपुंसक भांडें शब्द.

| विभ०. | एकव०. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | भांडें. | भांडीं. |
| द्वि० | भांड्याला—स. | भांड्यांना—स. |
| तृ० | भांड्यानें—शीं. | भांड्यांनीं—शीं. |
| सं० | भांड्या. | भांड्यांनो. |
| इ० | इ० | इ० |

याच प्रमाणें—तळें, कुचें, केळें, घोसाळें, बोलणें, चालणें, इत्यादि शब्दांचीं रूपें जाणावीं.

---

## प्रकरण ४.

### जे विभक्तिजन्य विकार उपांत्य वर्णाच्या ठायीं होतात त्यांच्या प्रकरणीं नियम.

२९७ ज्या नामाचा उपांत्य ई अथवा ऊ आहे, त्याचे हे उपांत्य स्वर विभक्तीच्या योगानें ऱ्हस्व होऊन पूर्वोक्त नियमां प्रमाणें रूपें सिद्ध होतात ; जसें—

ईकारोपान्त्य.

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | चीक. | चीक. |
| द्वि० | चिकाला—स. | चिकांना—ला—स. |
| तृ० | चिकानें—शीं. | चिकांनीं—शीं. |
| सं० | चिका. | चिकांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—ईट, डींक, ढीग, जीभ, टीक, पीक. इ० द्व्यक्षरी ईकारोपान्त्य शब्दांचीं रूपें जाणावीं.

ऊकारोपांत्य.

| विभ०. | एकव०. | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | खूण. | खुणा. |
| द्वि० | खुणेला—स. | खुणांना—स. |
| तृ० | खुणेनें—शीं. | खुणांनीं—शीं. |
| सं० | खुणे. | खुणांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—चूक, भूक, सूज, कूड, सूड, चूल, कूस, मूस, इ० द्व्यक्षरी ऊकारोपांत्य शब्दांचीं रूपें जाणावीं.

२५८ जर दोहों पेक्षां अधिक अक्षरांच्या शब्दांचा उपांत्य स्वर ई अथवा ऊ असला, आणि उपांत्य स्वराच्या मागील अक्षर ऱ्हस्व असलें, तर १७० व्या नियमा प्रमाणें त्या उपांत्य स्वरास कार्यें होऊन विभक्तीनें रूपें सिद्ध होतात; जसें—

| विभ०. | एकव०. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | बटीक. | बटिकी, बटकी. |
| द्वि० | बटिकीला—स.<br>बटकीला—स. | बटिकींना—ला—स.<br>बटकींना—ला—स. |
| तृ० | बटिकीनें—शीं.<br>बटकीनें—शीं. | बटिकींनीं—हीं—शीं.<br>बटकींनीं—हीं—शीं. |
| सं० | बटिकी, बटकी. | बटिकींनो, बटकींनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें——तिडीक, भटीण, हरीक, उदीम, जिलीब, भरीत, कथील, कणीस, इ० ऱ्हस्वस्वरपूर्वकेकारोपांत्य* शब्दांचीं रूपें जाणावीं.

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | कुलूप. | कुलुपें, कुलपें. |
| द्वि० | कुलुपाला—स. | कुलुपांना—ला—स. |
| | कुलपाला—स. | कुलपांना—ला—स. |
| तृ० | कुलुपानें—शीं. | कुलुपांनीं—शीं. |
| | कुलपानें—शीं. | कुलपांनीं—शीं. |
| सं० | कुलुपा, कुलपा. | कुलुपांनो, कुलपांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें——इसूप, कुसूर, खजूर, खरूज, कुरूड, चिभूड, चुणूक, जुगूत, इ० ऱ्हस्वस्वरपूर्वकोकारोपांत्य† शब्दांचीं रूपें जाणावीं.

२५९ **फकीर** इत्यादि जे कित्येक तत्तद्व्यापारकर्तृवाचक अथवा अधिकारकर्तृवाचक यवनी शब्द, त्यांचा उपांत्य दीर्घच राहतो; पशीं ऱ्हस्व होतो.

एथें मागल्या नियमा वरून उपान्त्याच्या स्थानीं जो अ आदेश होतो त्याचा निषेध जाणावा.

---

* ह्मणजे ऱ्हस्वस्वर ज्याच्या पूर्वीं आहे असा जो ईकार तो आहे उपान्त्य ज्यांचा असे शब्द.

† ह्मणजे ऱ्हस्वस्वर ज्याच्या पूर्वीं आहे असा जो ऊकार तो आहे उपान्त्य ज्यांचा असे शब्द.

| विभ०. | एकव०. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | फकीर. | फकीर. |
| द्वि० | फकीराला—स.<br>फकिराला—स. | फकीरांना—ला—स.<br>फकिरांना—ला—स. |
| तृ० | फकीरानें—शीं.<br>फकिरानें—शीं. | फकीरांनीं—हीं—शीं.<br>फकिरांनीं—हीं—शीं. |
| सं० | फकीरा, फकिरा. | फकीरांनों, फकिरांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—अमीर, खलीफा, वकील, मुनीम, हकीम, जामीन, दवीर, फडनीस, चिटनीस, वाकनीस; इ० शब्दांचीं रूपें जाणावीं. हा फकीराचा गण जाणावा.

२६० हकारपूर्वक उपांत्य ई अथवा ऊ असला तर त्यास विभक्तीनें ऱ्हस्वच होतो.

| विभ०. | एकव०. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | बहीण. | बहिणी. |
| द्वि० | बहिणीला—स. | बहिणींना—ला—स. |
| तृ० | बहिणीनें—शीं. | बहिणींनीं—हीं—शीं. |
| सं० | बहिणी. | बहिणींनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—अहीर, मोहीम, विहीर, काहील, चाहूर, चाहूल, लाहूर, काहूर, माहूत, जवाहीर, इ० शब्दांचीं रूपें जाणावीं.

२६१ जर उपांत्य अक्षराच्या मागील अक्षर दीर्घ अथवा

द्विमात्रक असलें, तर उपांत्य ई अथवा ऊ याच्या स्थानीं अ आदेश होतो; पक्षीं क्वचित् ऱ्हस्व होतो; जसें —

| विभ०. | एकव०. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | काळीज. | काळजें, काळिजें. |
| द्वि० | काळजाला—स.<br>काळिजाला—स. | काळजांनां—ला—स.<br>काळिजांनां—ला—स. |
| तृ० | काळजानें—शीं.<br>काळिजानें—शीं. | काळजांनीं—शीं.<br>काळिजांनीं—शीं. |
| सं० | काळजा, काळिजा. | काळजांनों, काळिजांनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—आंबील, कांबोट, उंदीर, उंडीण, कांतीण, कांटोल, तालीम, तारीख, तरीज, लजीम, रेजीम, भोरीप, गोचीड, इ० दीर्घस्वरपूर्वकेकारोपांत्य शब्दांचीं रूपें जाणावीं.

| विभ०. | एकव. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | बाभूळ. | बाभळी, बाभुळी. |
| द्वि० | बाभळीला—स.<br>बाभुळीला—स. | बाभळींनां—ला—स.<br>बाभुळींनां—ला—स. |
| तृ० | बाभळीनें—शीं.<br>बाभुळीनें—शीं. | बाभळींनीं—शीं.<br>बाभुळींनीं—शीं. |
| सं० | बाभळी, बाभुळी. | बाभळींनों, बाभुळींनों. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—झांकूड, काडूक, कापूस, आंसूड,

खांडूक, माणूस, गांडूळ, घारूड, तांदूळ, ढेकूण, मुंगूस, ढेकूळ, इत्यादि दीर्घस्वरपूर्वकोकारोपांत्य शब्दांचीं रूपें जाणावीं.

यांत जीं दुसरीं वैकल्पिक रूपें लिहिलीं आहेत तीं विशेषकरून प्राकृत काव्यांत आढळतात.

"वदे हि भलतेंचि ते तिसचि कोप टाका पुसा
असें मृदु म्हणोनि वा मज न घोपटा कापुसा."—केकावलि.

२६२ परंतु यांत जमीन आदिकरून कितीएक यवनी भाषेंतील शब्दांस विभक्तीनें ऱ्हस्वच होतो; जसें—

| विभ०. | एकव०. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | जमीन. | जमिनी. |
| द्वि० | जमिनीला—स. | जमिनींना—ला—स. |
| तृ० | जमिनीनें—शीं. | जमिनींनीं—शीं. |
| सं० | जमिनी. | जमिनींनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें— अफीण, तशीम, जंजीर, खंजीर, अंजीर, बंदूक, संदूक, इत्यादि शब्दांचीं रूपें जाणावीं. हा **जमिनीचा** गण जाणावा.

हा जरी **फकीराच्या** गणांत मोडिला तरी चालेल.

२६३ कितीएक स्त्रीलिंग **ईण**प्रत्ययान्तां शिवाय जितके तिहींपेक्षां अधिक अक्षरांचे शब्द आहेत, त्यांच्या उपांत्य स्वरास विभक्तीनें ऱ्हस्वच होतो; जसें—

| विभ०. | एकव०. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | रजपूत. | रजपूत. |
| द्वि० | रजपुताला—स. | रजपुतांना—ला—स. |
| तृ० | रजपुतानें—शीं. | रजपुतांहीं—नीं—शीं. |
| सं० | रजपुता. | रजपुतांनो. |
| इ०. | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—समजून, वर्तणूक, जाचणूक, नगचीर, कोथिंबीर, कोशिंबीर, मुरकूट, घुंगरूट, उचडीक, सोयरीक, पावणूक, तजवीज, खरबूज, अटापीट, अट्ठावीस, अब्दागीर, अठेचाळीस, इत्यादि शब्दांचीं रूपें जाणावीं.

२६४ कितीएक स्त्रीलिंग ईणप्रत्ययान्तां शिवाय म्हटलें. या वरून कितीएक स्त्रीलिंग ईणप्रत्ययान्त जे शब्द त्यांचीं रूपें पूर्वोक्त नियमां प्रमाणें होतात; जसें—

| विभ०. | एकव०. | अनेकव०. |
|---|---|---|
| प्र० | कुंभारीण.. | कुंभारणी, कुंभारिणी. |
| द्वि० | कुंभारणीला—स.<br>कुंभारिणीला—स. | कुंभारणींना—ला—स.<br>कुंभारिणींना—ला—स. |
| तृ० | कुंभारणीनें—शीं.<br>कुंभारिणीनें—शीं. | कुंभारणींनीं—हीं—शीं.<br>कुंभारिणींनीं—हीं—शीं. |
| सं० | कुंभारणी, कुंभारिणी. | कुंभारणींनो, कुंभारिणींनो. |
| | इ०. | इ०. |

याच प्रमाणें—सुतारीण, सोनारीण, बुरूडीण, भडभुंजीण, कलालीण, कळवंतीण, मराठीण, मुसलमानीण,

उदाह० — '**बऱ्यांच्या** मंडळींत असावें', '**चांगल्यांची** संगति धरावी', '**आंधळ्यांस पांगळ्यांस** सहाय होत असावें', **विद्वानाची** संगत केली असतां दोन अक्षरें येतील', इ० स्थळीं ज्या विशेषणाचा प्रयोग विशेष्याची अपेक्षा नठेवितां बहुधा होतो, अथवा ज्याच्या विशेष्याचा बोलण्याचा प्रघात नाहीं, अशा विशेषणास नामें मानिलीं असतां चिंता नाहीं; जसें —आंधळा, विद्वान्, पांगळा, इ० या विशेषणां पुढें मनुष्यादि विशेष्यांचा प्रयोग नकरितां शुद्ध नामा प्रमाणें यांचा प्रयोग करितात ह्मणोन हीं नामें ह्मणावीं, परंतु बरा, चांगला, इ० शब्दां पुढें क्वचित् विशेष्याचा अध्याहार होतो ह्मणोन यांस विशेषणें मानून पुढल्या विशेष्याचा अध्याहार मानावा हें मला नीट दिसतें.

---

## वर्ग २.

### संख्याविशेषणें.

२४४ संख्याविशेषण ह्मणोन जो विशेषणाचा भेद वर सांगितला, त्याचे **संख्यावाचक**, **संख्यापूरक**, **संख्यावृत्तिवाचक**, आणि **संख्यांशवाचक**, हे चार विभाग आहेत.

### प्रकरण १.

### संख्यावाचकें.

२४५ **एक** याचीं पुल्लिंगीं आणि नपुंसकीं अकारान्त नामा प्रमाणें विभक्तींचीं रूपें होतात. याचें विशेषणसामान्यरूप **एका** असें जाणावें; हा शब्द नित्य एकवचनांत असतो.

**एक्या**, **एके**, हीं विशेषणसामान्यरूपें व्याकरणरीतीवरून प्रशस्त नाहींत.

३४६ **एक** याचीं स्त्रीलिंगीं भिंतीच्या गणा प्रमाणें विभक्तींनीं रूपें होतात.

३४७ **दोन**, **तीन**, **चार**, यांस विभक्तींच्या योगानें **दोहों**, **तिहीं**, **चोहों**, असे आदेश होतात; नंतर प्रथम विभक्तिप्रकारा प्रमाणें याचें लिंगत्रयीं सामान्यरूप होतें. हे शब्द निरंतर अनेकवचनांत असतात. **चार** यास **चौहों** हा विकल्पें आदेश होतो.

| **विभ०** | **अनेकव०** | **अनेकव०** |
|---|---|---|
| **प्र०.** | दोन. | तीन. |
| **द्वि०** | दोहोंनां—ला—स. | तिहींनां—ला—स. |
| **तृ०** | दोहोंनीं—शीं. | तिहींनीं—शीं. |
| **वि०सा०** | दोहों, दोन. | तिहीं, तीन. |

| **विभ०** | **अनेकव०** |
|---|---|
| **प्र०** | चार. |
| **द्वि०** | चोहोंनां—ला—स. चारांनां—ला—स. |
| **तृ०** | चोहोंनीं—शीं. चारांनीं—हीं—शीं. |
| **वि०सा०** | चोहों, चार. |

कोणी **दोंहला**, **चोंहला**, अशीं रूपें लिहितात, परंतु तीं व्याकरणदृष्टीनें अशुद्ध होत; कारण, **दोन**, **चार**, यांस **दोंह**, **चोंह**, **असें** जर आदेश केले तर यांस पृ० ७२, ले० १९९ जा, या नियमा प्रमाणें सामान्यरूपीं दीर्घादेश केला पाहिजे; तेव्हां **दोंहाला**, **चोंहानीं**, अशीं रूपें होऊं लागतील. ह्मणोन **दोहों**, **चोहों**, हेच आदेश मानून पहिल्या विभक्तिप्रकारा प्रमाणें यांचीं **दोहोंला**, **चोंहोंशीं**, अशींच रूपें लिहिलीं पाहिजेत.

३४८ **पांचा** पासून पुढें आकारान्त संख्याविशेषणांचीं दुसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें रूपें जाणावीं.

३४९ **सहा, दहा, अकरा,** इ० आकारान्त संख्याविशेषणांचीं विभक्तिसामान्यरूपें पहिल्या विभक्तिप्रकारा प्रमाणें जाणावीं.

३५० **दोन, तीन, चार,** हे शब्द जर मनुष्यवाचक नामाचीं विशेषणें असलीं तर समुच्चय अर्थ असतां, अथवा ज्यां विषयीं कांहीं सांगितलें आहे तितके सारे, असा अर्थ असतां, यांच्या स्थानीं लिंगानुक्रमें **दोघे, तिघे, चौघे ; दोघी, तिघी, चौघी ;** आणि **दोघें, तिघें, चौघें ;** हे आदेश होतात.

३५१ **दोघे, तिघे, चौघे,** यांचीं सहाव्या विभक्ति प्रकारा प्रमाणें सामान्यरूपें होतात ; जसें—

| **विभ०** | **अनेकव०** |
|---|---|
| **प्र०** | दोघे. |
| **द्वि०** | दोघांना—ला—स. |
| **तृ०** | दोघांनीं—हीं—शीं. |
| **वि० सा०** | दोघां. |

याच प्रमाणें—**तिघे, चौघे,** यांचीं रूपें जाणावीं.

३५२ **दोघी** याचें पहिल्या विभक्तिप्रकारा प्रमाणें सामान्यरूप जाणावें.

| **विभ०** | **अनेकव०** |
|---|---|
| **प्र०** | दोघी. |
| **द्वि०** | दोघींना—स. |
| **तृ०** | दोघींनीं—हीं—शीं. |
| **वि० सा०** | दोहीं, दोघीं. |

याच प्रमाणें —**तिघी, चौघी,** यांचीं रूपें जाणावीं.

हा जो आदेश होतो त्याचा प्रयोग बहुधा मनुष्यवाचक विशेष्य असतां फार, इतर प्राणिवाचक असतां क्वचित् जाणावा; जसें—'या **दोघां** पुरुषांहीं मिळून वाघ मारिलें', आणि 'हें दळण **दोघीं** बायांनीं दळिलें', 'या **दोहों** घोड्यांनीं हे चार मण हरबरे खाले', 'हें इतकें दूध या **तिहीं** गाईचें', यांत बहुधा जेथें समुच्चयार्थ असतो तेथें **दोघे**, **तिघे**, इत्यादि शब्दांचा प्रयोग विशेषेकरून होतो; 'आमच्या घरीं **तीन** गाई व्याल्या', ह्मणजे सामान्यतः पुष्कळ गाई होत्या त्यांतून तीन व्याल्या, परंतु आमच्या **तिघी** गाई व्याल्या', ह्मणजे तिहीं गाईचा समुच्चय अथवा ज्या तीन ह्मणोन सर्वांस माहित आहेत त्या तीन गाई व्याल्या इतका सूक्ष्म अर्थ निघतो; 'कृष्णंभटास दोन मुलगे झाले, मग ते महायात्रेस गेले, पुढें तेथें दोघे मुलगे मोठ्या लौकिकास चढले'.

३५३ **जण**, हा शब्द पुढें असतां **दोन**, **तीन**, **चार**, यांच्या स्थानीं ३५० व्या लेखा प्रमाणें दोघे, तिघे, चौघे, इ० आदेश होतात; जसें—चौघेजण, दोघीजणी, तिघीजणी, चौघीजणी, दोघेजणें, 'हें पांचजणांचें काम या तिघांजणांनीं आटोपिलें' इ०.

## प्रकरण २.

### संख्यापूरकें अ० क्रमवाचकें.

३५४ **संख्यापूरक** विशेषण ह्मणजे संख्येचें पूरण करणारा जो अर्थ तद्वाचक जो शब्द तें; जसें—**पहिला**, **दुसरा**, **तिसरा**, **पांचवा**, **दहावा**, इ०.

एथें **पहिला** ह्मटलें ह्मणजे एक जी संख्या तिचें पूरण करणारा जो पदार्थविशेष तद्बोधक शब्द होय; तसेंच—**दुसरा**, **तिसरा**, **हजारावा**, हीं **दोन**, **तीन**, **हजार**, या संख्यांनीं पूरकें होत.

३५५ **एक** हा मुख्य शब्द असतां याचें संख्यापूरक **पहिला** होतें, **दोन** याचें **दुसरा, तीन, चार** यांचीं **तिसरा, चौथा**, अशीं संख्यापूरकें होतात.

३५६ पांचां पासून पुढें सर्व संख्यावाचकांस **वा, वी, वें**, इ० लिंगवचनांच्या नियमा प्रमाणें प्रत्यय लाविले ह्मणजे संख्यापूरकें सिद्ध होतात.

३५७ दहां पासून पुढें जितकीं संख्यावाचकें त्यांच्या अंत्यस्वरास दीर्घ करून संख्यापूरक **वा, वी, वें** हे लिंगवचनां प्रमाणें प्रत्यय लागतात; जसें— **विसावा, शंभरावा, हजारावी, लक्षावें**, इ०.

३५८ पुल्लिंग आणि नपुंसकलिंग असतां त्यांचीं विभक्तिसामान्यरूपें तिसऱ्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; आणि स्त्रीलिंग संख्यापूरकांचीं पहिल्या विभक्तिप्रकारा प्रमाणें होतात; जसें—

**पुल्लिंग.**

| **विभ०** | **एकव०** | **अनेकव०** |
|---|---|---|
| **प्र०** | पहिला. | पहिले. |
| **द्वि०** | पहिल्याला—स. | पहिल्यांना—ला—स. |
| **तृ०** | पहिल्यानें—शीं. | पहिल्यांहीं—नीं—शीं. |
| **वि०सा०** | पहिल्या. | पहिल्यां. |

याच प्रमाणें—दुसरा, तिसरा, चौथा, पांचवा, हजारावा, इ० संख्यापूरकांचीं विभक्तींचीं रूपें जाणावीं.

प्रथमा वर्ज्य करून नपुंसक संख्यापूरकें जीं दुसरें, तिसरें, चौथें, इ० यांचीहि विभक्तींचीं रूपें याच प्रमाणें जाणावीं.

**स्त्रीलिंग.**

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | पहिली. | पहिल्या. |
| द्वि० | पहिलीला—स. | पहिल्यांना—ला—स. |
| तृ० | पहिलीनें—शीं. | पहिल्यांहीं—नीं—शा. |
| वि०सा० | पहिल्या. | पहिल्यां. |

याच प्रमाणें—दुसरी, तिसरी, चौथी, पांचवी, इ० स्त्रीलिंग संख्यापूरकांचीं विभक्तींचीं रूपें जाणावीं.

## प्रकरण ३.

## आवृत्तिवाचकें.

३५९ संख्यावाचकांचा आवृत्त्यर्थ असतां त्यांस **टप** हा प्रत्यय लागतो; जसें—**एकपट**, **पांचपट**, **सातपट**, इ०.

३६० **दोन**, **तीन**, **चार**, यांस या प्रत्ययाच्या योगानें **दु**, **ति**, **चौ**, हे अनुक्रमें आदेश होतात; आणि **दोन**, **तीन**, हीं उपपदें असतां विकल्पें **पट** यांतील **प** स द्वित्व होतें; जसें—**दुपट**, **दुप्पट**; **तिपट**, **तिप्पट**. **दहा** यास या प्रत्ययाच्या योगानें विकल्पें **दस** आदेश होतो; जसें—दहापट, दसपट.

३६१ क्वचित् संस्कृत रीती प्रमाणें **गुणित** हा शब्द लागून संस्कृत संख्यावाचकां वरून हीं आवृत्तिवाचकें सिद्ध होतात; जसें—द्विगुणित, त्रिगुणित, चतुर्गुणित, शतगुणित, सहस्रगुणित, इ०.

## प्रकरण ४.

## संख्यांशवाचकें.

३६२ संख्येच्या अंशाचीं दर्शक जीं विशेषणें तीं

संख्यांशवाचकें ह्मणावीं ; जसें— पाव, अर्धा, पाऊण, सवा अ० सव्वा, दीड, अडीच, इ०.

३६३ कित्येक संख्यांशवाचकें तर सिद्ध शब्दच होत ; जसें—पाव, दीड, अडीच, इ०.

३६४ परंतु सर्वत्र नियम असा आहे कीं, पाव अथवा एकचतुर्थांशानें अधिक अशा संख्येचें विधान कर्तव्य असतां त्या संख्येस मागें **सवा** अ० **सव्वा** हा आगम होतो ; जसें—सवादोन, सव्वादोन ; सवातीन, सव्वातीन ; सवाचार, सव्वाचार ; इ०.

कोणी **सवाच्या** ठिकाणीं **सव्वा** असें लिहितात. परंतु सर्वत्र एक रीत ठेवून **सवा** लिहावें हें बरें. नेट देऊन बोलायाचें असतां वस द्वित्व केल्यास चिंता नाहीं ; जसें— 'मी त्यास सव्वा पांच रुपये कीं हो द्यावयास केले'.

३६५ अर्धा अथवा एकद्वितीयांशानें अधिक असें विधान असतां त्या त्या संख्येस **साडे**, आणि पाऊण अथवा तीनचतुर्थांशानें अधिक असें विधान असतां एकाधिक संख्येस **पाउणें**, असे मागें आगम होतात; जसें—साडेतीन, साडेचार, साडेसात ; पाउणेआठ, पाउणेपन्नास, इ०.

**पावणे** पेक्षां **पाउणे** हें शुद्ध होय. पा+उणे=**पाउणे**.

---

## विभाग ४.

### क्रियापदविचार.

३६६ क्रियापद ह्मणजे ज्या शब्देंकरून कोणत्याहि व्यापाराचा अथवा स्थितीचा बोध होतो तें ; जसें—करितो, बोलतोस, चालतों, असतात, राहतात, पाहिलें, जाईल, इ०.

३६७ क्रियापदाचें जें मूळ, ह्मणजे प्रत्ययादिक वर्ज्य

करून जें मूळचें रूप त्यास **धातु** ह्मणतात; जसें—ह्मण, बस, अस, हो, कर, राह, पाह, इ०.

हे धातु जाणावयाचे असतां बहुधा त्यां पुढें णें हा स्वार्थी प्रत्यय लावून त्यांचीं रूपें लिहिण्याचा प्रघात पडला आहे; जसें—ह्मणणें, बसणें, असणें, होणें, करणें, राहणें, पाहणें, इ०.

३६८ कित्येक धातु अव्युत्पन्न ह्मणजे सिद्ध असतात; जसें-होणें, असणें, निजणें, भिणें, पाहणें, खाणें, ऐकणें, इ०

३६९ कित्येक धातु व्युत्पन्न ह्मणजे साधित असतात; जसें—विझवणें, भिवडावणें, देविवणें, अंगीकारणें, अनुवादणें, अभिलाषणें, माणसाळणें, भोळसावणें, खुळावणें, इ०

३७० कित्येक धातु अनुकरणवाचक असतात; जसें—चकचकणें, फटफटणें, धगधगणें, हडबडणें, खदखदणें, गुणगुणणें, बचबचणें, टकमकणें, इ०.

३७१ क्रियापदाचे मुख्य भेद दोन प्रकारचे आहेत, त्यांत अर्था वरून पांच, आणि रूपा वरून तीन; ते असे—**सकर्मक**, **अकर्मक**, **उभयविध**, **भावकर्तृक**, आणि **सहाय**,* हे पांच शुद्ध अर्था वरून; आणि **शक्य**, **प्रयोज्य**, **गौण**, अथवा **सिद्ध**, हे तीन रूपा वरून.

३७२ क्रियापदास **रूप**, **भेद**, **अर्थ**, **प्रयोग**, **काळ**, **पुरुष**, **लिंग**, **वचन**, हीं असतात.

---

## वर्ग १.

### सकर्मक क्रियापदें.

---

* हा निराळा भेद नमानिला तथापि चालेल, कारण याचा अंतर्भाव सकर्मक आणि अकर्मक यांत केला असतां होईल.

३७३ सकर्मक क्रियापद ह्मणजे कोणतांहि क्रिया अथवा व्यापार कर्त्या पासून निघून ज्याचें व्यापारफल-भोक्तृत्व अन्य विषया कडेस असतें तें; जसें—'कृष्णानें कंस मारिला', या वाक्यांत **मारिला** या क्रियेचा कर्त्ता कृष्ण, या पासून मारणें हा व्यापार उत्पन्न होऊन त्याचें जें फल त्याचें भोक्तृत्व कंस जो अन्य विषय त्याज कडेस आलें; ह्मणोन **मारिला** हें सकर्मक क्रियापद; याच प्रमाणें—देतो, घेतो, पाहतो, करील, भरील, इ० सकर्मक क्रियापदें जाणावीं.

---

## वर्ग २.

### अकर्मक क्रियापदें.

३७४ ज्या क्रियापदास कर्म नाहीं, ह्मणजे जेथें कर्त्या पासून व्यापार उत्पन्न होऊन त्याचें फलभोक्तृत्वहि त्याज कडेसच असतें त्यास **अकर्मक** ह्मणावें; जसें—'हरि निजतो' या वाक्यांत हरि हा कर्त्ता, या पासून निजण्याचा व्यापार उत्पन्न होतो, आणि त्याचा फलभोक्ताहि तोच आहे, ह्मणोन **निजतो** हें अकर्मक क्रियापद; याच प्रमाणें—बसतो, उठतो, फिरतो, जातो, येतो, हंसतो, थकतो, इ०.

### प्रकरण १.

### **सकर्मक** आणि **अकर्मक** क्रियापदांचें विवेचन.

३७५ सकर्मक किंवा अकर्मक क्रियापद ओळखून काढण्याची मुख्य खूण अशी आहे कीं, ज्या क्रियापदास 'काय' हें प्रश्नार्थक सर्वनाम लावून प्रश्न केला असतां ज्या पासून उत्तर निघण्याचा संभव असतो तें सकर्मक क्रियापद

जाणावें; जसें—'तो लिहितो, जेवतो, मारील, पुजील'; एथें—काय लिहितो? काय जेवतो? काय मारील? काय पुजील? असे प्रश्न केले असतां—पोथी, भात, वाघ, देव, इत्यादि उत्तरें निघतात; ह्मणून—लिहितो, जेवतो, मारील, पुजील, इ० हीं सकर्मक क्रियापदें जाणावीं.

परंतु ज्या क्रियापदांस 'काय' हें प्रश्नार्थक सर्वनाम लागत नाहीं, व बळानें लाविलें असतां ज्यां पासून कांहीं उत्तर निघत नाहीं, तीं अकर्मक क्रियापदें जाणावीं; जसें—तो बसतो, उठतो, निजेल; एथें—काय बसतो? काय उठतो? काय निजेल? असा प्रश्न होत नाहीं, आणि केला असतां उत्तर येत नाहीं, ह्मणून—बसतो, उठतो, निजेल, हीं अकर्मक क्रियापदें जाणावीं.

३७६ सकर्मक आणि अकर्मक क्रियापदें ओळखायाची बहुधा सुगम रीति अशी आहे कीं, ज्या क्रियापदास भविष्यकाळीं एकवचनीं तृतीय पुरुषीं **ईल**, आणि प्रथम पुरुषीं **ईन**, असे प्रत्यय लागतात तें सकर्मक; आणि **एल** व **एन** लागतात तें अकर्मक; जसें—तो करील, मारील, लिहील, वाचील; मीं करीन, मारीन, लिहीन, वाचीन, इ० सकर्मक; आणि तो अडकेल, फुटेल, बसेल; मीं अडकेन, फुटेन, बसेन, इ० अकर्मक क्रियापदें जाणावीं.

यांत **ह्मणणें, बोलणें, सांगणें**, इ० कितीएक क्रियापदें सकर्मक असतां **ह्मणेल, बोलेल, सांगेल**, इ० अशीं रूपें होतात.

तसेंच अकर्मक धातु एकाक्षरी असले तर हा नियम लागत नाहीं; त्यांस भविष्यकाळीं **ईल** आणि **ईन** हेच प्रत्यय लागतात; जसें—होईल, जाईल, येईल, न्हाईन, इ०.

३७७ दुसरा सकर्मक आणि अकर्मक क्रियापदांविषयीं.

असा नियम आहे कीं, जर क्रियापद सकर्मक आहे, तर स्वार्थी भूतकाळीं त्याचा कर्मणिप्रयोग होत असतो; जसें—'त्याणें वाडा बांधिला', 'तिणें शालजोडी पांघरिली,' 'गोपाळ्यानें माझें अंगवस्त्र धुतलें', इ० हीं सकर्मक क्रियापदांचीं उदाहरणें; आणि, 'तो गेला', 'त्याची घोडी पळाली', 'तें पोर त्या चिखलांत फसलें', इ० अकर्मक क्रियापदांचीं उदाहरणें जाणावीं.

या नियमास बाधक अशीं कितीएक क्रियापदें आहेत, तीं प्रयोगप्रकरणीं सांगेन.

३७८ तिसरा आणखी असा नियम आहे कीं जे धातु अकारान्त आहेत, त्यांचा सकर्मक अर्थ असतां, वर्त्तमान-कालवाचक धातुसाधित अव्ययांस, व त्यां वरून साधलेल्या क्रियापदांस, विकल्पें **इत** प्रत्यय लागतो; आणि अकर्मक अर्थ असतां **अत** प्रत्यय लागतो; उदाहरण—'तो जसजसा त्या दगडास **लोटितो**, तसतसा तो दगड **लोटत** चालला आहे', 'तो जसजसें तें लांकूड **कापितो**, तसतसें तें **कापत** आहे', 'वारा दार **उघडितो**, हें दार आपेआप **उघडतें**', 'राजा पंडितांस **मानितो**', 'त्याच्या प्रकृतीस उष्णोपचार **मानत** नाहीं'.*

विकल्पें ह्मटलें या वरून या नियमाचा भंगहि होतो; परंतु मला वाटतें हा नियम फार प्रशस्त आणि उपयोगी आहे, ह्मणोन साधेल तितकें यासच अनुसरलें असतां बरें आहे.

---

* हा तिसरा नियम स्वर्गवासी राजश्री बाळ गंगाधर शास्त्री यांनीं सुचविला, याज वर आणखी विचार पुढें धातुसाधित अव्ययाच्या प्रकरणीं केला आहे.

## वर्ग ३.

### उभयविध क्रियापदें.

३ ७९ जीं क्रियापदें सकर्मक आणि अकर्मक या दोन्हीं अर्थीं असतात त्यांस **उभयविध** ह्मणतात ; जसें **मोडणें**; याचें सकर्मक उदाहरण—'त्याणें आपलें घर मोडिलें', यांत तो हा कर्त्ता, घर हें कर्म, आणि मोडिलें' हें सकर्मक क्रियापद: अकर्मक उदाहरण—'त्याचें घर मोडलें', एथें घर हा कर्त्ता, आणि मोडलें हें अकर्मक क्रियापद. याच प्रमाणें—फळणें, उघडणें, इ० उभयविध क्रियापदें जाणावीं.

याचा नियम असा आहे कीं क्रियापदाचें मूळचें जें रूप तेंच रूप त्यांचा सकर्मक आणि अकर्मक अर्थ असताहि जर एकाच व्यापाराचें दर्शक असलें तर तें उभयविध क्रियापद जाणावें; जसें-मोडणें, उघडणें, फळणें, इ०.

---

## वर्ग ४.

### भावकर्तृक क्रियापदें.

३८० अकर्मक क्रियापदें असून, अथवा सकर्मकांचा अकर्मका प्रमाणें प्रयोग होऊन, ज्या ठिकाणीं स्पष्ट क्रियेचा जो भाव तोच कर्त्ता आहे असें भासतें, व ज्यांचा प्रयोग तृतीय पुरुषीं एकवचनीं मात्र होतो, अशीं जीं क्रियापदें तीं **भावकर्तृक** जाणावीं ; जसें—उजाडतें, कळमळतें, सांजावलें, फावेल, इ०.

**वाटणें** हा अकर्मक धातु होय, जसें-'मला ही मसलत चांगली वाटत्ये', 'मला या मुलाचा स्वभाव गोड वाटतो,' 'त्याला हें तुझें भाषण कठोर वाटलें', इ०. कोठें कोठें याचा भावकर्तृक

धातू प्रमाणेंहि प्रयोग होतो; जसें—'मला वाटतें त्याणें हें कृत्य केलें असावें'.

---

## वर्ग ५.

### सहाय क्रियापदें.

३८१ आणखी एक **सहाय** ह्मणोन क्रियापदांचा भेद आहे, तीं इतर धातूंच्या रूपांशीं योजिलीं असतां त्यांचा काळ व अर्थ फिरवितात ; तीं सहाय क्रियापदें— **अस, नस, हो, जा, ये, दे, लाग, बस, पाहिजे, नको, नये, नलगे**, हीं आहेत.

३८२ यांत काळ फिरवायास करणरूपीं **अस**, अकरणरूपीं **नस**, आणि **हो**, या धातूंचें साहाय्य लागतें.

३८३ कोणा एका नियमित धातुसाधिता पुढें **जा, ये, दे, लाग, बस, पाहिजे, नको, नये**, आणि **नलगे**; हे सहायधातु बहुधा सर्व काळीं योजिले असतां त्या त्या धातूंचा अर्थ फिरवितात.

याचा विस्तार या विभागांत शेवटीं 'अवशिष्ट सहायधातूं विषयीं विचार' या वर्गांत करीन.

---

## वर्ग ६.

### प्रयोजक क्रियापदें.

३८४ जेथें क्रियेच्या मुख्य कर्त्यास अन्याच्या प्रेरणेनें गौणत्व येऊन अन्यच मुख्य कर्त्ता असतो, तेथें त्या क्रियापदास प्रयोजक क्रियापद ह्मणतात ; जसें—करवितो, बोलवितो, नेसवितो, कापवील, भरवीन, काढविलें, इ०.

वस्तुतः सूक्ष्मदृष्टीनें विचार केला असतां **प्रयोजक** हें विशेषण

क्रियापदास लागूं नये, कर्त्यास लागावें; क्रियापद जें आहे तें प्रयोज्यप्रयोजकभावसूचक होय; अथापि त्या अर्थाचा एथें अतिदेश मानून कर्तृविशेषण क्रियापदाच्या ठायीं आरोपित करून, **प्रयोजक** अथवा कोठें **प्रयोज्य** क्रियापद ह्मणण्याचा परिपाठ पडला आहे, व यांत शब्दलाघवाहि आहे, ह्मणून त्यासच एथें अनुसरून प्रयोजक ह्मटलें आहे.

३८५ यांत सकर्मक धातूं वरून प्रयोजक प्रत्यय झाले असतां मूळकर्त्याचें प्राधान्य राहून व्यापार दुसऱ्या करवीं केला जातो असा अर्थ होतो; आणि अकर्मक धातूं वरून झाले असतांहि अर्थ तसाच, परंतु ज्या करवीं मूळ-धातुबोधित व्यापार केला जातो तो मूळकर्त्याचें कर्म होतो; उदाहरण—'मी पुराण वाचवितों', एथें मूळकर्ता **मीं** याचें प्राधान्य असून वाचण्याचा जो व्यापार तो पुराणिकादि अन्य कर्त्या करवीं केला जातो. तसेंच 'तो निजवितो', या वाक्यांतहि अर्थ तसाच, ह्मणजे तो हा मुख्य कर्ता असून निजण्याचा व्यापार ज्या बालादि अन्य कर्त्या करवीं केला जातो तीं आतां **तो** या मूळकर्त्याचीं कर्मे होतात.

एथें मोठें विचार करावयाचें व वादाचें स्थळ आहे. हें प्रयोजक क्रियापद लिहिण्याचीं चार प्रकारचीं रूपें आढळतात;—**करवणें, करिवणें, करीवणें, करविणें**; तशींच वर्त्तमानादि काळांचींहि चार चार प्रकारचीं रूपें आढळतात; जसें-**करवतो, करिवतो, करीवतो, करवितो; करवलें, करिवलें, करीवलें, करविलें**. आतां या चार रूपांत ग्राह्य रूप कोणतें हा मोठा प्रश्न आहे, या विषयीं कांहीं युक्ति योजून समाधान करण्याचा प्रयत्न करणें एथें अवश्य आहे. त्यास, प्रथम तर **करवणें** ह्यास प्रयोजक भेदाचें रूप मानणें हें युक्तीच्या दृष्टीस प्रशस्त दिसत नाहीं; कारण, असें मानिलें असतां प्रत्येक भेदाचें जें निराळें व असाधारण रूप असावें, व ज्या रूपा वरून हा

भेदाचा निराळेपणा आहे, त्या नियमास बाध येतो; ह्मणजे प्रयोजक भेदाच्या वांटणीस दोन प्रकारचीं रूपें येऊन शक्य भेदास एकहि असाधारण रूप राहत नाहीं; त्यांत आणखी शक्य भेद असतां ज्या पक्षीं प्रयोजक भेदाच्या असाधारण रूपाच प्रयोग होत नाहीं, ह्मणजे, 'माझ्यानें तें काम **करिवत, करीव** अ०-**करविन** नाहीं,' असें होत नाहीं, '**करवत** नाहीं,' असें रूप होतें, त्या पक्षीं हेंच शक्य भेदाचें असाधारण रूप खरें आतां समयविशेषीं प्रेरणेचा अर्थ असतां कोणी मूळधातूस **व** प्रत्यय लावून **करवतो, बोलवतो**, इ० रूपांचा प्रयोग करितात म्हणजे 'तो तें काम त्या जवळून **करवतो**', 'तो त्यास **मारवतो** इत्यादि रीतीनें बोलतात; परंतु पूर्वोक्त नियमा वर दृष्टि ठेविली असतां मला असें वाटतें कि या रूपांची जी प्रेरणार्थ असत लिहिण्याची व बोलण्याची प्रवृत्ति पडून गेली आहे ती शु प्रमादानें; कारण, असें केल्यानें एका शक्य भेदास त्याचें अस धारण रूप असून तें त्यास अनन्यग्राह्यत्वानें नदेतां, प्रयोज भेदास तद्व्यतिरिक्त अनेक रूपें असून यांतहि त्यास अंशहा करणें हें युक्तीस प्रशस्त दिसत नाहीं; अतएव, **करवणें, बोल वणें, मारवतो, नेसवतो**, इ० हीं शक्यभेदाचींच रूपें हो प्रयोजकभेदाचीं रूपें नव्हत; तेव्हां आतां या रूपां विषयीं वाद राहिला नाहीं असें मला वाटतें. अथापि ही युक्ति कोणास नरुचेल, तर या भाषेंत लिहिण्याची पद्धति सर्वत्र ए सारखी असावी असें ज्यास वाटत असेल त्यांहीं तरी, शक भेदमात्र असतां या रूपांचा प्रयोग करावा, म्हणजे बरें.

आतां **करिवणें, करविणें**, आणि **करीवणें**, या तिहीं रू मध्यें विशेषेंकरून ग्राह्य रूप कोणतें हा प्रश्न राहिला. त्या **करिवणें** हें मूळधातूचें प्रयोजक रूप विशेषें करून ग्राह्य णावें; आणि याचीं वर्त्तमान काळीं **करवितो**, आणि भूतका **करविलें**, हीं रूपें ग्राह्य जाणावीं. कारण, सर्व धातूं वर जो **णें** प्रत्यय असतो तो काढून टाकिला म्हणजे त्या धा आज्ञार्थी द्वितीय पुरुषाचें एकवचनीं रूप होतें, असा या भा

सर्वत्र अबाधित नियम आहे; जसें—**कर, बोल, हंस,** इ०. जर उपांत्य ऱ्हस्व **इ** अथवा **उ** असला तर आज्ञार्थी द्वितीय पुरुषाच्या एकवचनीं दीर्घ होतो, या नियमा वरून **करीव, बोलीव, हंशीव,** अशीं आज्ञार्थी रूपें होतात इतकेंच; वरकड मूळचीं **करिवणें, बोलिवणें,** इ० रूपें खरीं; **करविणें, बोलविणें,** हीं प्रयोजक धातूचीं रूपें नव्हत; जर हीं रूपें असतीं तर पूर्वोक्त नियमा प्रमाणें आज्ञार्थी द्वितीय पुरुषाच्या एकवचनीं **करवि, बोलवि. हंसवि,** अशीं रूपें होतीं. परंतु ज्या पक्षीं अशीं रूपें होत नाहींत, त्या पक्षीं प्रयोजक धातूचीं **करिवणें, बोलिवणें,** हींच रूपें खरीं. आतां हे प्रयोजक धातू निरंतर सकर्मक असतात, तेव्हां सकर्मक धातूच्या नियमां प्रमाणें यांच्या वर्त्तमानकाळाच्या धातुसाधितास **इ** आगम होऊन त्या वरून वर्त्तमानकाळीं **करिविती, बोलिविती,** अशीं रूपें होऊं लागतील; परंतु अशीं रूपें तर होत नाहींत, यांतून कोणताहि इकार ठेविला असतां चालतो; ह्मणजे **करिवितो,** अथवा **करवितो,** अशीं दोन्हीं रूपें होतात; तेव्हां यांत कोणता इकार बलवत्तर ह्मणजे आवश्यक होय हा एक विचार आतां अवशिष्ट राहिला; त्यास, स्वार्थी वर्त्तमानकाळाचीं जीं रूपें होतात तीं वर्त्तमानकाळाच्या धातुसाधिता वरून होतात, असा सर्वत्र नियम आहे; अतएव, **करवितो. बोलवितो,** अशींच रूपें लिहिलीं पाहिजेत, कारण या प्रयोजक धातूच्या वर्त्तमान काळाचीं धातुसाधितें **करवित, बोलवित,** अशीं होतात; **करिवत, बोलिवत,** अशीं होत नाहींत; ह्मणोन **करवितो, बोलवितो, करविलें, बोलविलें,** हींच रूपें व्याकरणाच्या सूक्ष्म दृष्टीनें शुद्ध होत.

३८६ जर मूळधातु **ह**कारान्त, अथवा एकाक्षरी असला, तर त्या वरून **विवणें** प्रत्यय होतो; जसें—साहविवणें, लिहविवणें, खाविवणें, गाविवणें, दाविवणें, घेविवणें, इ०.

एथें पूर्वोक्त प्रत्ययान्तराच्या संभवाचा निषेध जाणावा.

३८७ कित्येक धातूं वरून **आवणें** प्रत्यय होऊन प्रयोजक क्रियापदें साधतात; जसें—फिनावणें, बहकावणें,

निभावणें, इ०. परंतु हे शुद्ध सकर्मक धातु होत असें मानल्यासहि कांहीं चिंता नाहीं.

३८८ तसेंच अनुकरणवाचक जे अकर्मक धातु ते प्रयोजक अथवा सकर्मक कर्तव्य असतां बहुधा **आवणें** प्रत्यय लागतो; जसें— फडफडावणें, फटफटावणें, खळखळावणें, इत्यादि.

३८९ दुसरा आणखी असा एक चमत्कारिक संस्कृत भाषे प्रमाणें गूढ नियम या भाषेंत आढळतो; तो असा कीं बहुधा ज्यांचें पहिलें अक्षर **अ**, **आ**, **इ**, अथवा **उ**, एतदंत आहे, असे जे कित्येक द्व्यक्षरी अकर्मक धातु त्यांस प्रयोजक अथवा सकर्मक कर्तव्य असतां पहिल्या अक्षराचा **अ** किंवा **आ** यास वृद्धि होत्ये, आणि पुढें टकार असतां **इ** अ० **उ** यास गुण होतो; आणि टच्या स्थानीं **ड** आदेश होतो. जसें—

| **अकर्मक धातु.** | **प्रयोजक अ० सकर्मक धातु.** |
|---|---|
| पडणें | पाडणें |
| दवणें | दावणें |
| सरणें | सारणें |
| टळणें | टाळणें |
| चरणें | चारणें |
| मरणें | मारणें |
| तरणें | तारणें |
| फाटणें | फाडणें |
| फिटणें | फेडणें |
| तुटणें | तोडणें |
| फुटणें, इ०. | फोडणें, इ०. |

२९० कित्येक धातूं वरून प्रयोजक प्रत्यय लागत नाहींत, कारण तदर्थी दुसरे धातु सिद्ध आहेत; आणि, यद्यापि त्यांत प्रेरणेचा अर्थ गम्यमान होतो खरा, तथापि त्यांस शुद्ध सकर्मक ह्मटलें असतां कांहीं बाध नाहीं; जसें—

| धातु० | प्र० अ० स० धातु० |
| --- | --- |
| येणें | आणणें |
| लागणें | लावणें |
| जाणें, इ० | नेणें, इ० |

२९१ हे प्रयोजक धातु निरंतर सकर्मक असतात. आणि **इवणें** अ० **आवणें** प्रत्यय नलागतां जे प्रयोजकत्वार्थबोधक धातु या भाषेंत सिद्ध असतात, ह्मणजे ज्या सकर्मक धातूंत प्रेरणारूप अर्थ गम्यमान असतो, त्या वरून इतर सकर्मक धातूं प्रमाणें हे प्रयोजक प्रत्यय लागून आणखी प्रयोजक क्रियापदें साधतात; जसें—सोडिवणें, तोडिवणें, आणिवणें, मारिवणें, पाडिवणें, इ०.

आणखी या भाषेंत एक चमत्कार आहे, तो असा कीं, एकदां मूळ धातू वरून प्रत्यय लावून प्रयोजक धातु साधिला असतां वक्त्याच्या मनांत त्या प्रयोजक धातु वरूनहि आणखी प्रेरणारूप अर्थ दर्शवायाचा असल्यास आणखी प्रयोजक धातु साधतात. जसें—**करणें, करिवणें, करविवणें**; ह्मणजे, आपण **करणें**, दुसऱ्या कडून **करिवणें**, आणि दुसऱ्या कडून तिसऱ्या करवीं **करविवणें**; उदाहरण—'रामा तें काम करितो', 'रामा, विठूकडून तें काम करवितो', आणि 'रामा विठूकडून गोविंदाच्या हातून तें काम करविवतो'; परंतु असे धातु साधून त्याचा प्रयोग करणें हें फार विरळा. वक्त्याच्या इच्छे वर आहे.

३९२ आणखी शिकणारांनीं एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, कित्येक धातूंचीं रूपें प्रयोजक धातूंच्या प्रमाणें दिसतात, परंतु ते प्रयोजक धातु नव्हत, मूळचे सिद्ध धातु होत; जसें—पाठिवणें, बडिवणें, कालिवणें इ०.

## वर्ग ७.

### शक्य क्रियापदें.

३९३ मूळ धातूस **वणें** अथवा **ववणें** प्रत्यय लागून जें नवें क्रियापद सिद्ध होतें त्यास **शक्य** क्रियापद ह्मणावें; जसें—करवणें, चालवणें, जाववणें, घेववणें, देववणें, इ० यांत शक्तीचा बोध होतो; जसें—'माझ्यानें अ० मला हें काम **करवतें**', 'त्याच्यानें अ० त्याला पैका **देववत** नाहीं' इ०; ह्मणजे हें काम करायास मला शक्ति आहे, पैका द्यावयास त्यास शक्ति नाहीं, असा अर्थ.

३९४ यांत असा नियम आहे कीं जर मूळचा एकाक्षरी धातु असला तर त्यास **ववणें**, आणि अनेकाक्षरी धातु असला तर त्यास **वणें** अ० **ववणें**, असे प्रत्यय लागतात, जसें—देववतें, घेववतें, जाववतें; आणि करवतें, नेसवतें, हांसवतें; अथवा, करववतें, हांसववतें; इ०.

३९५ परंतु जर ते अनेकाक्षरी मूळचे हकारान्त धातु असले तर त्यां वरून **ववणें** हाच प्रत्यय होतो; जसें—'मला लिहववतें', 'माझ्यानें पाहववतें', इ०.

**लिह** धातूस हा प्रत्यय विकल्पें होतो; जसें—'माझ्यानें लिहवतें', 'माझ्यानें लिहववतें'.

३९६ हा प्रत्यय सकर्मक आणि अकर्मक या उभय धातूं वरून होतो. परंतु जेव्हां अकर्मका वरून हा प्रत्यय होऊन रूपें साधतात, तेव्हां याचा निरंतर भावकर्तरिप्रयोग

होतो; जसें— 'माझ्यानें अ० मला **चालवतें,**' 'त्याच्यानें अ० त्याला **निजवत** नाहीं', इ०.

## प्रकरण १.

## भेदविचार.

३९७ कोणा एका अर्थास उद्देशून मूळ धातूंच्या रूपांत विकार होऊन तदर्थी जो नवा क्रियारूप शब्द सिद्ध होतो तो **भेद** जाणावा. भेद तीन प्रकारचे आहेत. **मूळरूप भेद, प्रयोजक रूपभेद,** आणि **शक्य भेद;** जसें— 'मीं करितों' हा कर धातूचा **मूळरूप भेद;** 'मीं करवितों' हा **प्रयोजक भेद,** 'माझ्यानें अ० मला करवतें' हा **शक्य भेद.**

## प्रकरण २.

## रूपविचार.

३९८ कोणत्याहि धातूस विधिरूपानें अथवा निषेधरूपानें, ह्मणजे होय अथवा नाहीं या अर्थानें चालविलें असतां जें त्याचें रूपांतर होतें त्यास **रूप** असें ह्मणावें. हीं रूपें दोन प्रकारचीं आहेत; एक **करणरूप,** आणि एक **अकरणरूप;** उदाहरण— मीं आहें, मीं होतों, म्यां केलें, तो होईल, तो करील; हीं अस, हो, आणि कर, या धातूंचीं **करणरूपें.** आणि—मीं नाहीं, मीं नव्हतों, म्यां केलें नाहीं, तो होणार नाहीं, तो करणार नाहीं; हीं अस, हो, आणि कर, या धातूंचीं **अकरणरूपें.**

## प्रकरण ३.

## प्रयोगविचार.

३९९ वाक्यां मध्यें कर्तृप्रधान, कर्मप्रधान, आणि भाव-

प्रधान, या भेदांहींकरून क्रियापदाच्या ठायीं कर्ता, कर्म, आणि भाव, यांच्या अनुरोधानें विकार होऊन जो वाक्यरचनेचा प्रकार होतो त्यास, अथवा या प्रमाणें विकार पावलेलें जें क्रियापद त्यास, **प्रयोग** अशी संज्ञा आहे. हे प्रयोग चार आहेत— **कर्तरि, कर्मणि, भावी**, आणि **भावकर्तरि**.*

४०० जेथें कर्त्या वरून क्रियापद फिरतें, ह्मणजे कर्त्याच्या लिंगवचनास अनुसरून क्रियापदाचें रूप असतें, तेथें **कर्तरिप्रयोग** जाणावा; जसें—'रामा निजतो,' 'सावित्री पुस्तक वाचिते', 'पाखरूं उडालें', इ०.

४०१ जेथें कर्मा वरून क्रियापद फिरतें, ह्मणजे कर्माच्या लिंगवचनास अनुसरून क्रियापदाचें रूप असतें, तेथें **कर्मणिप्रयोग** जाणावा; जसें—'त्याणें घोडा जुंपला', 'कृष्णानें मुरली वाजविली', 'वेणूनें सुंदर चित्र काढिलें, 'त्याणें गप्प उडविली', 'तिणें काल शृंगार केला होता', इ०.

४०२ जेथें कर्त्या वरून अथवा कर्मा वरून क्रियापद फिरत नाहीं, केवळ सामान्येंकरून त्याचें रूप नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें, तेथें **भावीप्रयोग** जाणावा; जसें—'म्यां त्यास मारिलें', 'तिणें तिला धरावें,' इ०.

---

* **कर्तरि** आणि **कर्मणि** हे शब्द मूळचे संस्कृतांत **कर्तृ** आणि **कर्मन्** या शब्दांचीं सप्तमीचीं रूपें होत; यांचा यद्यपि विशेषणासारिखा प्रयोग करणें प्रशस्त नाहीं, तथापि तशाच प्रयोगाची रूढि फार आहे, ह्मणोन यांच रूपांचें एथें ग्रहण केलें आहे. **भाव** शब्दाचें माव महाराष्ट्र नियमा प्रमाणें **भावी** असें विशेषण करून योजिलें आहे. **कर्तृरि** आणि **कर्मणि** याचा अंत्यस्वर दीर्घ करून विशेषणें करावीं परंतु तसें करण्यास कांहीं योग्य आधार दिसत नाहीं; म्हणोन हीं मूळचीं सप्तमीचीं रूपें तशींच ठेविलीं आहेत.

४०३ जेथें क्रियेचा जो केवल भाव तोच कर्ता दिसतो, आणि क्रियापद निरंतर नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें, तेथें **भावकर्तरिप्रयोग** जाणावा; जसें—'मला कळमळतें', 'त्यास नदी पलीकडे सांजावलें', 'त्यास चालवतें', 'तिच्यानें बोलवलें नाहीं', इ०.

४०४ हे प्रयोग वर्तमानकालवाचक व भूतकालवाचक धातुसाधिता वरून, अथवा त्यां वरून साधलेलीं जीं क्रियापदें त्यां वरून, अथवा विध्यर्थाच्या रूपां वरून होतात. त्यांत वर्तमान काळीं कर्तरिप्रयोग होतो; जसें—'लक्ष्मी चित्र काढिते', 'तें पोर रडून आपल्या आईस फार त्रास देतें', 'या काळीं तो तेथें असावा', 'ह्मटलें असतां दोन वर्षांत ही मुलगी चालूं लागावी', 'अशा हालांत तें केव्हांच मरावें', इ०.

४०५ भूतकाळ असतां अकर्मक धातूं वरून कर्तरिप्रयोग होतो; जसें—'विठू गेला', 'ठकी धांवली', 'वांसरूं हंबरलें', इ०.

४०६ भूतकाळ असतां—पढणें, जेवणें, पिणें, बोलणें, ह्मणणें, विणें, भिणें, शिकणें, इ० पढधातूचा गण वर्ज्य करून सकर्मक धातूं वरून कर्मणिप्रयोग होतो; जसें—'त्याणें तें अक्षर लिहिलें,' 'तिणें तो चमत्कार दाखविला', 'या पाखरानें ती चिमणी मारिली', 'त्याणें ही गोष्ट त्यास सांगितली असावी', 'म्यां अनेक दुःखें सोसिलीं', इ०.

पढधातूचा गण वर्ज्य करून ह्मटलें या वरून त्या गणांतील सकर्मक क्रियापदां वरून भूतकाळीं कर्तरिप्रयोग होतो; जसें—'तो शास्त्र पढला', 'तो तेथें

भाजीभाकर जेवला', 'ती हा सारा ग्रंथ शिकली', मीं दूध प्यालों, 'ते गंगा न्हाले', इ०.

४०७ भूतकाळ असतां जर कर्म द्वितीयान्त असलें, तर भावीप्रयोग होतो; आणि विध्यर्थी भूतकाळीं अकर्मक धातूं वरूनहि भावीप्रयोग होतो; जसें—'वाघानें गाईस मारिलें', 'तिणें त्यास सांगितलें', 'म्यां तेथें उभें राहावें', 'तिणें नित्य तेथें गावें', इ०

४०८ भावकर्तृक धातू वरून आणि शक्यभेद असतां अकर्मक धातू वरून नित्य भावकर्तरिप्रयोग होतो; जसें—'मला कळमळतें', 'त्यांस सांजावलें', 'तिला तेथें करमलें नाहीं', 'माझ्यानें चालवतें', 'आतां मला धांववत नाहीं', इ०.

४०९ कर्तरिप्रयोगांत **सकर्मकर्तरि** आणि **अकर्मकर्तरि** असे दोन भेद आहेत.

४१० जेथें सकर्मक क्रियापदांचा योग असून कर्त्याच्या अनुरोधानें क्रियापद असतें, तेथें सकर्मकर्तरिप्रयोग जाणावा; जसें—'रामा काम करितो', 'गंगा भाजी चिरिते', इ०.

४११ जेथें अकर्मक क्रियापदांचा योग असून कर्त्याच्या अनुरोधानें क्रियापद असतें, तेथें अकर्मकर्तरिप्रयोग जाणावा; जसें—'तें मुलगें निजतें', 'गाय हंबरते', 'वाघ गर्जतो', इ०.

## प्रकरण ४.

## अर्थविचार.

४१२ अर्थ ह्मणजे एकादी क्रिया अथवा व्यापार करण्या विषयींचा जो बोलणाराच्या मनांत भाव असतो तो जेणेंकरून कळतो असें जें क्रियापदाचें रूप तो. हे अर्थ

पांच आहेत ;—**स्वार्थ**, **आज्ञार्थ**, **विध्यर्थ**, **संकेतार्थ**, आणि **संशयार्थ**.

४१३ **स्वार्थ** ह्मणजे बोलणारा एकाद्या गोष्टीचें विधान करितो, ह्मणजे एकादी गोष्ट आहे किंवा नाहीं इतकेंच सांगतो, असा जो बोध क्रियापदाच्या रूपा पासून होतो तो. अथवा तेथें तें क्रियापद **स्वार्थी** आहे असें ह्मणावें. उदाह०—मीं करितों, त्याणें सांगितलें नाहीं, इ०.

४१४ **आज्ञार्थ** ह्मणजे बोलणारा आज्ञा, उपदेश, किंवा प्रार्थना करितो, असा जो बोध क्रियापदाच्या रूपा पासून होतो तो. अथवा त्या वाक्यांत तें क्रियापद **आज्ञार्थी** आहे असें ह्मणावें. उदाह०—तूं कर, तुह्मीं सांगूं नका, तो जाऊ, ते नकरोत, इ०.

आपणा पेक्षां कमी योग्यतेच्या मनुष्यास, अथवा जो आपल्या ताबेदारींत असेल त्यास, कांहीं करावयास सांगितलें, तर त्या सांगण्यास आज्ञा म्हणतात. आपणा पेक्षां अधिक योग्यतेच्या मनुष्यास कांहीं करायास सांगितलें असतां त्या सांगण्यास प्रार्थना म्हणतात. हे दोन्ही अर्थ विवक्षित असतां क्रियापदाचीं रूपें कोठें सारखींच असतात ; परंतु बोलण्याची शैली भिन्न असत्ये;—'हे राजा, माझें संकट निवारण कर', आणि 'सख्या पाय धुवायास पाणी आण', या दोन वाक्यांत पहिल्यांत प्रार्थना आणि दुसऱ्यांत आज्ञा समजावी.

४१५ **विध्यर्थ**—आज्ञेचा अर्थ असून धर्म, शक्यता, योग्यता, सातत्य, इ० अर्थांचा जो बोध क्रियापदाच्या रूपा पासून होतो त्यास विध्यर्थ ह्मणावें; जसें— 'त्यां करावें', 'तिणें जावें' इ०; एथें अज्ञार्थाची उपलब्धि असून शक्यताहि गम्यमान होत्ये.—'तिणें जावें', ह्मणजे तिला जावयास शक्ति आहे, मोकळीक आहे, दुसऱ्या कडून आडकाठी नाहीं, असा अर्थ होतो.

या विध्यर्थी पासून पुष्कळ अर्थ निष्पन्न होतातः—'आपण आतां जावें', 'आपण कृपा करून माझा पैका द्यावा', 'आपणास सुपुत्र व्हावा', या वाक्यांत आज्ञा, प्रार्थना, मनोरथ, हे अर्थ निष्पन्न होतात.'मी काशींत नित्य मनकर्णिकेच्या घांटा वर जावें', 'तूं लाहानपणीं नित्य रडावेंस', एथें रीति अथवा सातत्य अथवा गतकथास्मरण; 'आईबापानीं मुलांस शिकवावें', एथें धर्म; 'ह्मटलें असतां आज पाऊस पडावा', एथें संभावना; असे अनेक अर्थ होतात. परंतु या सर्वांत ते ते अर्थ असून आज्ञा आणि धर्म हे अर्थ मुख्य दिसतात, ह्मणोन हीं रूपें एका विध्यर्थी खालीं लिहिलीं आहेत. असें नकेलें, आणि एकच रूप भिन्न भिन्न अर्थी खालीं लिहिलें, तर गोंधळ मात्र पडेल; ह्मणोन तसें केलें नाहीं. शिकणारांनीं या रूपांचा प्रयोग भिन्न भिन्न अर्थीं होतो, इतकें मात्र जाणावें;परंतु व्याकरणपदच्छेद करिते समयीं गोंधळ नव्हावा ह्मणोन या रूपास **विध्यर्थी** ह्मणावें.

४१६ **संशयार्थ** ह्मणजे क्रियापदांच्या रूपां वरून जो संशयरूप अथवा संदेहरूप बोध निष्पन्न होतो तो. आणि असा बोध उत्पन्न करणारीं जीं रूपें तीं संशयार्थी आहेत असें ह्मणावें; जसें— 'तो गेला असेल', 'तो जाणार असला', इ॰.

४१७ **संकेतार्थ** ह्मणजे एका क्रियेची सिद्धि दुसऱ्या क्रिये वर आहे अशा अर्थाचा जो बोध क्रियापदाच्या रूपविशेषा वरून होतो तो; जसें— 'तो राहिला असता', 'तो तसें करिता तर मी असें करितों'. हा संकेतार्थ असतां जर, तर, ह्मणजे, इत्यादि कित्येक अव्ययांचा प्रयोग होतो, अथवा त्यांचा अध्याहार असतो.

## प्रकरण ५.

### काळ.

४१८ **काळ** ह्मणजे क्रियापदाच्या रूपविशेषा वरून ती क्रिया अमक्या काळीं घडली असा जो बोध होतो तो.

४१९ क्रियेस मुख्य काळ तीन आहेत— **वर्तमान, भूत,** आणि **भविष्य;** परंतु या प्रत्येका मध्यें आणखी भेद आहेत.

४२० **वर्तमान** काळ ह्मणजे विद्यमानीं जो चालत आहे तो; जसें—'मी पूजा करितों' यांत **करितों** या क्रियापदा पासून विद्यमान काळाचा बोध होतो; ह्मणजे ज्या काळीं कोणी एकादी क्रिया करितो त्याच काळीं सांगणारा तिचें विधान करितो असा अर्थ ज्या क्रियापदाच्या रूपा पासून उत्पन्न होतो, त्याचा वर्तमान काळ जाणावा; अथवा तें क्रियापद वर्तमान काळीं आहे असें जाणावें.

४२१ वर्तमान काळाचे प्रकार तीन आहेत.—एक **वर्तमान**, दुसरा **अपूर्णवर्तमान**, आणि तिसरा **रीतिवर्तमान**; यांचीं उदाहरणें सांगतों;—

| | |
|---|---|
| मी करितों. . ....... . | वर्तमान. |
| मी करित आहें, मी करितों आहे. | अपूर्ण वर्तमान. |
| मी करित असतों ........ | रीतिवर्तमान. |

वर्तमान काळाच्या रूपांत आणखीहि अर्थभेद असतात; कोठें निश्चयपूर्वक एकादी गोष्ट सांगायाची असतां वर्तमान काळाच्या रूपाचा प्रयोग करितात; जसें — 'मी उद्यां खचित येतों', 'मी तुह्मास खचित सांगतों पुढल्या वर्षी दुष्काळ पडतो', इ०.

**अपूर्णवर्तमान.**—या काळाच्या ठायीं अर्थभेद इतका

आहे कीं याचा प्रयोग असतां कर्त्याची त्या त्या क्रियेच्या ठायीं तात्कालिक जी निमग्नता तिचा बोध होतो. उदाह०—मी जेवित आहें, ह्मणजे जेवण्याचा व्यापार करित आहें.

**रीतिवर्तमान.**—या काळीं कर्ता जो आहे त्याची ती ती क्रिया करण्याची रीति अथवा संवई असती, असा अर्थ होतो; जसें— 'मीं करित असतों', 'तो तेथें खेळत असतो', ह्मणजे माझी करण्याची आणि त्याची खेळण्याची रीति आहे अथवा संवई आहे असा अर्थ होतो.

४२२ **भूत** काळ ह्मणजे वर्तमान क्षणा पूर्वी गेलेला जो काळ तो; जसें— 'गोपाळानें पोथी वाचिली', एथें **वाचिली** या क्रियापदानें मागला काळ सुचविला; ह्मणोन हा भूतकाळ ह्मणावा.

४२३ भूतकाळाचे प्रकार सात आहेत; —**भूत**, **अपूर्णभूत**, **रीतिभूत**, **पूर्णभूत**, **भूतभूत**, **वर्तमानभूत**, आणि **भविष्यभूत**; हें आतां उदाहरणांनीं सांगतों.—

मीं अ० म्यां केलें ...... भूत.
मीं करित होतों ...... अपूर्णभूत.
मीं करीं, अ० करित असें... रीतिभूत.
मीं करिता झालों ...... पूर्णभूत.
मीं अ० म्यां केलें होतें ... भूतभूत.
मीं अ० म्यां केलें आहे ... वर्तमानभूत.
मीं करणार होतों........ भविष्यभूत.

४२४ **अपूर्णभूत**— या काळाच्या ठायीं क्रियेची अपूर्णता दर्शविली जात्ये; जसें—'मीं करित होतों' ह्मणजे तो

क्रिया करण्याच्या उद्योगांत होतों, परंतु तीं त्या काळीं समाप्तीस नेलो नव्हतों, इतका अर्थ हा काळ सुचवितो.

४२५ **रीतिभूत**— या काळाच्या अर्था पासून कांहीं कालमर्याद क्रियेच्या सतत चलनाचा अथवा रीतीचा बोध होतो; जसें— 'मीं करीं, अथवा करित असें', यांत करण्याचा व्यापार कांहीं कालमर्याद अविच्छिन्न चालत होता असा अर्थ निष्पन्न होतो.

प्राकृत ग्रंथांत या रीतिभूत काळाचा प्रयोग शुद्ध भूतकाळीं अथवा पूर्णभूत काळींहि होतो;—

'पृथ पाहतां हर्षला तो सुदामा ॥ ह्मणे जाणिजे लाभ हा थोर आह्मां'
'रुक्मिणी पुढें मुख्य नायिका ॥ आरती करी द्विजवर्यका'.

'मीं करिते समयीं', 'जेविते वेळीं', इत्यादि स्थळींहि हेंच रूपें जाणावीं.— 'मीं करिते समयीं' ह्मणजे मीं करीं त्या समयीं, 'तो जेविते वेळीं' ह्मणजे तो जेवी त्या वेळीं, असा अर्थ. व्याकरण करते समयींहि असाच पदच्छेद करून निर्वाह करावा. दुसरा उपाय नाहीं.

४२६ **पूर्णभूत**— या काळीं क्रियेची केवळ पूर्णता ह्मणजे परिसमाप्ति दर्शविली जाये; जसें— 'मीं करिता झालों', ह्मणजे तीं क्रिया करून राहिलों असा अर्थ.

४२७ **भूतभूत**— भूत काळीं व्यापार होऊन संपला असा ज्या क्रियापदाच्या रूपा पासून बोध होतो त्याचा भूतभूत काळ जाणावा; जसें—'रामा गेला होता', यांत रामाचें जाणें भूतकाळीं संपलें असा अर्थ होतो.

४२८ **वर्तमानभूत**- भूतकाळीं आरंभलेली क्रिया वर्तमान काळा पर्यंत चालत आहे, किंवा भूतकाळीं केलेल्या क्रियेचें फळ वर्तमानकाळीं सिद्ध असावें, असा अर्थ या काळा

15

पासून उत्पन्न होतो;—जसें 'मी चाललों आहें', एथें मागील काळा पासून चलनव्यापारास आरंभ होऊन सांप्रत काळीं तो व्यापार नुकताच संपला आहे, अथवा त्या व्यापाराचें सिद्ध जें फळ तें सांप्रत उपलब्ध आहे, असा अर्थ होतो.

मागील झालेली कथा आतां सांगायाची असतां कधीं कधीं या वर्तमानभूत काळाच्या रूपाचा प्रयोग करितात; जसें— 'भोजराजा सभेंत बसला आहे, व तेथें एक ब्राह्मण त्यास आशीर्वाद देत आहे, इतक्यांत असें झालें'.

४२९ **भविष्यभूत**— काहीं एक व्यापार भूतकाळीं करायाचा होता, परंतु तो काहीं व्यत्यया मुळें सिद्धीस गेला नाहीं, असा अर्थ भविष्यभूत काळाच्या ठायीं उद्बोधित होतो; जसें—'मी करणार होतो', ह्मणजे माझा करायाचा बेत होता; परंतु त्या क्रियेस आरंभ झाला नाहीं.

कोठें हें भविष्यभूत काळाचें रूप असतां केवळ भविष्यकाळा प्रमाणें अर्थ होतो; जसें 'इतक्यानें तुझें काय होणार होतें', 'यांत त्याचें काय पोट भरणार होतें', 'दोन आण्यांनीं काय मी श्रीमंत होणार होतों', इत्यादि. कोठें शुद्ध भूत काळाचाहि अर्थ निष्पन्न होतो; जसें—'तुह्मीं काल त्यास सामान दिलें, परंतु नितक्यानें तो काय करणार होता.'

४३० **भविष्य** काळ ह्मणजे वर्तमान क्षणा पुढें येणारा जो काळ तो; यांत क्रियापदाच्या ठायीं पुढल्या काळाचा बोध होतो; जसें—'मी लिहीन', 'तो जाईल', एथें **लिहीन**, **जाईल**, या क्रियापदांहीं करून पुढला काळ सुचविला जातो.

४३१ भविष्य काळाचे प्रकार पांच आहेत; —**भविष्य**, **अपूर्णभविष्य**, **वर्तमानभविष्य**, **भूतभविष्य** आणि **भविष्यभविष्य**.

मीं करीन ......... भविष्य.

मीं करित असेन ...... अपूर्णभविष्य.

मीं करणार आहें ...... वर्तमानभविष्य.

म्यां केलें असेल ..... भूतभविष्य.

मी करणार असेन..... .. भविष्यभविष्य.

४३२ **अपूर्णभविष्य**—एकाद्या क्रियेस आरंभ होऊन तिचा व्यापार त्या काळीं चालत असेल, असा बोध ज्या क्रियापदा पासून होतो त्याचा अपूर्णभविष्य काळ जाणावा; जसें—'मीं करित असेन', 'तूं जात असशील', इ० 'तूं उद्यां येशील म्हणजे त्या वेळेस मी तें काम करित असेन', 'तो शेत कापित असेल त्या वेळीं तूं त्याज जवळ जा'.

४३३ **वर्तमानभविष्य**—कर्त्याच्या मनात व्यापार करयाचा आहे, परंतु त्याणें अद्यापि त्या क्रियेस आरंभ केला नाहीं, असा बोध ज्या क्रियापदा पासून होतो त्याचा वर्तमानभविष्य काळ जाणावा; जसें—'मीं जाणार आहें', 'तो येणार आहे'.

४३४ **भूतभविष्य**—भविष्यकाळीं एकाद्या क्रियेचा व्यापार होऊन राहिला असा अर्थ ज्या क्रियापदाच्या रूपा पासून निष्पन्न होतो त्याचा भूतभविष्य काळ जाणावा; जसें 'ज्या वेळेस मीं **जेवलों असेन** त्या वेळेस तुह्मीं तें काम मज जवळ घेऊन या', 'मीं तुज कडे येईन तेव्हां त्वां कितों पत्रें **लिहिलीं असतील**'?

४३५ **भविष्यभविष्य**—विवक्षित भविष्य काळाच्या पुढल्या काळीं एकाद्या क्रियेचा व्यापार व्हावयाचा आहे, असा अर्थ ज्या क्रियापदांच्या रूपां पासून निष्पन्न होतो, त्यांचा भविष्यभविष्य काळ जाणावा; जसें—'तूं जर उद्या

नऊ वाजतां आलास तर मीं **जेवणार असेन**, परंतु बारा वाजतां आलास तर जेवलों असेन'.

४३६ क्रियापदांच्या रूपांस पुरुष, वचनें, आणि लिंगें, असतात.

### पुल्लिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं सोडितों. | आह्मीं सोडितों. |
| द्वि० | तूं सोडितोस. | तुह्मीं सोडितां. |
| तृ० | तो सोडितो. | ते सोडितात. |

### स्त्रीलिंग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं सोडित्यें. | आह्मीं सोडितों. |
| द्वि० | तूं सोडित्येस—तीस. | तुह्मीं सोडितां. |
| तृ० | ती सोडित्ये—ती. | त्या सोडितात. |

### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मीं सोडितें—तों | आह्मीं सोडितों. |
| द्वि० | तूं सोडितेस. | तुह्मीं सोडितां. |
| तृ० | तें सोडितें. | तीं सोडितात. |

यांत तिन्हीं लिंगीं अनेकवचनाचीं रूपें सारखीं.

४३७ ३८१ व्या नियमांत सांगितलें आहे कीं ज्या धातूंच्या योगानें क्रियापदाचीं रूपें, काळ, आणि अर्थ, फिरतात त्यांस **सहाय धातु** ह्मणतात. ते सहाय धातु—**अस, नस, हो, जा, ये, दे, लाग, बस, पाहिजे, नको, नये, नलगे.**

४३८ यांत काळ फिरवायास **अस, नस,** आणि **हो,** या धातूंचें साहाय्य लागतें.

४३९ नियमित धातुसाधितां पुढें **जा, ये, दे, लाग, बस, पाहिजे, नको, नये,** आणि **नलगे,** हे सहाय धातु बहुधा सर्व काळीं लागतात.

याचा विस्तार या विभागांत शेवटीं 'अवशिष्ट सहाय धातूं विषयीं विचार' या वर्गांत केला आहे.

## वर्ग ८.

### धातुसाधितशब्दविचार.

४४० धातूं वरून साधलेले जे शब्द त्यास **धातुसाधित** शब्द म्हणतात. यांत नाम, विशेषण, आणि अव्यय, असे भेद आहेत.

धातुसाधित अव्यय हा चांगला प्रशस्त शब्द नाहीं, कारण अव्यय या शब्दानें केवळ विभक्तीचा मात्र निषेध सुचविला जातो; परंतु ज्या शब्दाचा कर्तृकर्मरूप शब्दावर अधिकार असतो त्यास अव्यय मानणें हें योग्य दिसत नाहीं; अशा शब्दांस संस्कृत व्याकरणांत **कृदंत** म्हटलें आहे. परंतु तेथें **कृत** म्हणतात अधिकार म्हणजे प्रत्ययाचा समुच्चय आहे तो ज्याच्या अंतीं आहे त्यास कृदंत म्हटलें आहे. परंतु तसा काहीं एथें अधिकार नसता तो शब्द मराठी शब्दसाधितास देणें हेंहि योग्य दिसत नाहीं. तथापि **कृदंत** हा केवळ सांकेतिक शब्द मानून या प्रसंगीं योजिला असता विशेष बाध येईल असें मला वाटत नाहीं. परंतु ज्या पक्षीं आज पावेतों मराठी व्याकरणांत धातुसाधित अव्यय म्हणायाचा परिपाठ पडला आहे, आणि **अव्यय** हा शब्द एथें धातुसाधित या विशेषणानें विशिष्ट आहे, त्या पक्षीं अर्थात या शब्दाचा पूर्वोक्त अर्थ राहून धातूचा जो वाक्यांत

कर्तृकर्मवाचक शब्दां वर अधिकार त्याच्याहि व्याप्तीचा संग्रह होतो. म्हणोन **करित, करितां, करितांनां, करून,** इत्यादि शब्दांस धातुसाधित अव्ययें म्हणायाची जी रूढि पडली आहे, तीस एथें अनुसरलें असतां विशेष दोष येईल असें मला वाटत नाहीं.

## धातुसाधित नामें आणि विशेषणें.

४ ४ १ धातुसाधित शब्दांत ज्यांच्या ठायीं नामाचे धर्म असतात, ह्मणजे ज्यांस लिंगवचनविभक्त्यादि कार्यें होतात, तीं धातुसाधित नामें; व ज्यांचीं रूपें विशेष्याच्या अनुरोधानें फिरतात तीं विशेषणें. यांत जें नाम असतें तें प्रयोगानुसंधानानें विशेषणहि होतें.

| | |
|---|---|
| करणें. . . . . . . . . | क्रियावाचक. |
| करता, करणारा, करणार. | कर्तृवाचक. |
| केला, केलेला . . . . . . | कर्मवाचक. |

४ ४ २ यांत **कर्ता, भर्ता, हर्ता, शास्ता,** इ० जीं धातुसाधितांचीं रूपें आढळतात तीं मूळचीं संस्कृत धातूं वरून साधलेलीं धातुसाधितें जाणावीं. शुद्ध प्राकृत नियमास अनुसरून कर, भर, हर, इ० धातूं वरून साधलीं असतां **करता, भरता, हरता, शासता,** अशीं रूपें लिहिलीं पाहिजेत.

४ ४ ३ यांत कर्तृवाचक आणि कर्मवाचक या धातुसाधितांचा विशेषणा सारिखा प्रयोग होतो तो सांगतों,-'हंसतें लेंकरूं', 'रडती मुलगी', 'धांवणारा घोडा', 'बांधली गाय', 'केलेली क्रिया', इ० परंतु, 'मारयाचा हात धरवतो पण

बोलण्याचें तोंड धरवत नाहीं, 'धर्म करणारास आड येऊं नये', 'मेलेल्यास मारून फळ काय', इ० वाक्यांत त्या त्या धातुसाधिताचे नामा प्रमाणे प्रयोग जाणावे.

४४४ **णार**प्रत्ययान्त कर्तृवाचक धातुसाधिताचा प्रयोग बहुधा विशेषणीं होत नाहीं, त्याचा प्रायः नामा सारिखाच प्रयोग होतो; जसें—'देणार थोडे आणि मागणार फार झाले', 'करणार मनुष्य थोडे हंसणार मनुष्य फार', अशा ठिकाणीं 'करणारे मनुष्य थोडे हंसणारे मनुष्य फार', हें व्याकरणरीतीनें अधिक शुद्ध होय.

४४५ परंतु या भाषेंत अकर्मक धातू वरून लेलाप्रत्यय झाला असतां त्याच्या ठायीं कर्माचा अर्थ राहत नाहीं, कर्त्याचाच अर्थ असतो.

४४६ **ता**प्रत्ययान्त कर्तृवाचकांत अर्थविशेष इतकाच कीं **ता**प्रत्ययान्त कर्तृवाचकाच्या ठायीं वर्तमान काळाचा बोध होतो, ह्मणजे ती क्रिया चालत आहे, संपली नाहीं, असा अर्थ होतो; जसें—'जळतें लांकूड' ह्मटलें ह्मणजे तें लांकूड जळत आहे, जळण्याचा व्यापार संपला नाहीं, असा अर्थ होतो.

**ला** किंवा **लेला** एतत्प्रत्ययान्त कर्तृवाचकाच्या ठायीं भूतकाळाचा बोध होतो; म्हणजे ती क्रिया संपली परंतु तिचें कार्य राहिलें आहे असा अर्थ होतो; जसें—'जळालें किंवा जळालेलें लांकूड' म्हटलें ह्मणजे तें लांकूड जळून त्याज वर त्या क्रियेचें जें कार्य तें दृष्टिगोचर आहे, आणखी त्या कार्या वरूनच त्या क्रियेचें अनुमान झालें, असा अर्थ होतो.

आतां **ला** आणि **लेला** या दोन प्रत्ययांत भेद मिळून इतकाच कीं, **ला** प्रत्ययान्त जीं धातुसाधितें असतात, त्यांच्याच पुढें

इतर सहाय धातूंचा प्रयोग होऊन भूतवर्तमान, भूतभूत, इत्यादि काळ घडतात. **लेला**प्रत्ययान्त धातुसाधिता पुढें त्या सहाय धातूंचा प्रयोग प्रशस्त रीतीनें होत नाहीं.

आतां जेथें कर्ता अथवा करण नाहीं, अशा ठिकाणीं कधीं कधीं **लेला**प्रत्ययान्त धातुसाधित कर्मवाचक विशेषणा पुढें सहाय धातूंचा प्रयोग करितात; जसें- 'तें घोडें तेथें बांधलेलें होतें, 'ही गाडी रंगलेली आहे', इ०. परंतु एथें 'बांधलेलें', 'रंगलेली', यांस धातुसाधित विशेषणें करून 'होतें', 'आहे', हीं क्रियापदें मानावीं हें बरें.

यांत **लेला**त्यप्रयान्त कर्मवाचक धातुसाधित विशेषणाच्या ठायीं नुसत्या कर्माचाच बोध होतो असें नाहीं', परंतु पंचमी आणि षष्ठी शिवाय (असें मला वाटतें) इतर सर्व विभक्तींचे अर्थ याच्या ठायीं संभवतात.

४४७ अकर्मक धातू वरून हें विशेषण झालें असतां तेथें कर्त्याचा उद्बोध होतो.—'बसलेला मनुष्य', 'निजलेली मांजर', 'मेलेलें कुत्रें', इ०.

४४८ सकर्मक धातू वरून हें विशेषण झालें असतां कर्म, करण, संप्रदान; आणि अकर्मक धातू वरून अधिकरण, असे अर्थ निष्पन्न होतात.

**कर्ता** .. जळालेलें लांकूड, हरवलेला घोडा.

**कर्म** .. पाजविलेला चाकू, बांधलेली गाय.

**करण** .. लिहिलेली लेखणी, बांधलेली दोरी. यांत पहिल्या उदाहरणांत लिहिलेली लेखणी ह्मणजे ज्या लेखणीनें लिहिलें गेलें ती, असा करणी तृतीयेचा अर्थ होतो.

**संप्रदान** ...'दिलेला ब्राह्मण', ह्मणजे ज्या ब्राह्मणास दिलें तो.

**अधिकरण.** 'राहिलेलें घर', ह्मणजे ज्या घरांत लोक राहिले तें घर. 'चाललेला रस्ता', ह्मणजे ज्या रस्त्यावरून लोक चालले तो.

४४९ या धातुसाधित नामांस आणि विशेषणांस नामांप्रमाणें लिंगवचनविभक्त्यादि कार्यें होतात; तीं सांगतों.

**करणें.**

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | करणें. | करणीं. |
| द्वि० | करण्यास—ला. | करण्यांस—ला. |
| तृ० | करण्यानें—शीं. | करण्यांनीं—शीं. |
| इ० | इ० | इ० |

**रडता.**

| विभ० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | रडता. | रडते. |
| द्वि० | रडत्यास—ला. | रडत्यांस—नां—ला. |
| तृ० | रडत्यानें—शीं. | रडत्यांनीं—हीं—शीं. |
| इ० | इ० | इ० |

**करणारा** आणि **करणार** या दोहोंचीं रूपें अनुक्रमें **आंबा** आणि **वाघ** या शब्दां सारिखीं चालतात; जसें—करणाऱ्यास, करणाऱ्यानें; करणारास, करणारानें; इ०.

**गेलें.**

| विभ० | एकव० |
|---|---|
| प्र० | गेलें. |
| द्वि० | गेल्यास—ला. |
| तृ० | गेल्यानें—शीं. |
| इ० | इ० |

४५० आतां धातुसाधित अव्ययें सांगतों.

**धातुसाधित अव्ययें.**

| | |
|---|---|
| करित, करितां, करितांनां, करित असतां, करित असतांनां. | वर्तमानकालवाचक. |
| करून................ | पूर्वकालवाचक. |
| करूं................ | निमित्तवाचक. |
| करावें.. ............ | विधिवाचक. |

४५१ आतां हीं धातुसाधितें मूळ धातू वरून कशीं साधतात, या विषयीं नियम सांगतों; कांकि या धातुसाधितां वरून पुढें क्रियापदांचीं रूपें सिद्ध होतात, ह्मणोन हे नियम लक्षांत ठेवणें फार आवश्यक आहे.

४५२ मूळ धातू वरून **णें** प्रत्यय लागून क्रियावाचक धातुसाधित नामें होतात; जसें—करणें, उठणें, चालणें, इ०.

४५३ मूळ धातू वरून **ता** प्रत्यय लाविला असतां वर्तमानकालबोधक कर्तृवाचक धातुसाधित नामें सिद्ध होतात; उदाह०—नेता, देता, घेता, खाता, करता, पाहता, रांगता, चालता, इ०.

४५४ जर **हो** धातूच्या भूतकाळाच्या रूपांचा प्रयोग कर्तव्य असला, तर अकारान्त सकर्मक धातूस **इ** आगम होऊन हा **ता** प्रत्यय लागतो; जसें—करिता झाला, पूजिता झाला; इ०.

परंतु असा प्रयोग प्राकृत ग्रंथांत येतो तेव्हां कोठें कोठें वर सांगितल्या सकर्मकाकर्मकाच्या भेद राहत नाहीं.

४५५ परंतु यांत पढ, शिक, सांग, बोल, भज, भाज, वांच इ०, आणि **ह**कारान्त धातु यांस हा **इ** आगम होत नाहीं. हा **पढ**धातूचा गण जाणावा.

४५६ प्रयोजक धातूवरून ता प्रत्यय होत असतां इ आगम केला पाहिजे; जसें—'करविता—चालविता—बोलविता—झाला,' 'हंसविता झाला'.

४५७ णार आणि णारा एतत्प्रत्ययान्त जीं कर्तृवाचक धातुसाधितें तीं मूळ धातूस हे प्रत्यय लाविल्यानें होतात; जसें—करणार, हंसणार, घेणार, देणार; बोलणारा, करणारा, जाणारा, येणारा, इ०.

४५८ मूळ धातूस ला आणि लेला हे प्रत्यय लाविले असतां कर्मवाचक धातुसाधितें होतात; परंतु त्यांत पढधातूचा गण वर्ज्य करून हे प्रत्यय लाविते समयीं सकर्मकधातूस इ आगम होतो; जसें—ठेविला, ठेविलेला; अर्पिला, अर्पिलेला; आकर्षिला, आकर्षिलेला; इ०.

अर्थात् अकर्मक धातूस हा इ आगम होत नाहीं; जसें—उठला, उठलेला; बसला, बसलेला; निजला, निजलेला; इ०.

हकारान्त धातूस हा आगम अवश्य केला पाहिजे. जसें—लिहिलें, लिहिलेलें; पाहिलेला, पाहिलेलें; इ०.

४५९ मूळ धातूस आवें प्रत्यय लाविला असतां विधिवाचक धातुसाधितें होतात. हा प्रत्यय प्रयोगविशेषीं कर्ता, कर्म यांच्या लिंगवचनां प्रमाणें फिरतो; जसें—करावें, धरावा, फिरवावी, चाराव्या, मारावे, आठवावीं, पाहावां, इ०.

४६० मूळ धातूस त, तां, तांना, हे प्रत्यय लाविले असतां वर्तमानकाळवाचक धातुसाधित अव्ययें होतात. परंतु पढधातूच्या गण वर्जून अकारान्त सकर्मक धातूंस हा प्रत्यय लावावयाच्या पूर्वी इ आगम केला पाहिजे; जसें—कारित, धरित, ठेवित, बोलवित; शिंपितां, ठेवितांना, इ०.

४६१ मूळ धातूस **ऊन** प्रत्यय लाविला असतां पूर्वकालवाचक अव्यय सिद्ध होतें; जसें—करून, बोलून, जाऊन, ठेवून, इ०.

एथें शिकणारानें लक्षांत ठेवावें कीं कोणीं—**नेवून, जावून, घेवून,** अशीं जीं रूपें लिहितात तीं अशुद्ध; **नेऊन, जाऊन, घेऊन;** अशीं रूपें लिहिलीं पाहिजेत.

४६२ मूळ धातूस **ऊं** लाविला असतां निमित्तवाचक धातुसाधित अव्यय सिद्ध होतें; जसें—बोलूं, घेऊं, नेऊं, खाऊं, इ०.

नेवूं, खावूं, घेवूं, इ० रूपें अशुद्ध.

४६३ मूळ धातूस **आवा** प्रत्यय लागून विधिवाचक धातुसाधितें होतात; प्रयोगभेदेंकरून लिंगवचनानुरूप एतत्प्रत्ययान्त रूपें फिरतात.

कोणी **करावें, जावें,** इ० विधिवाचक धातुसाधितें यांस नामें करून त्या वरून चतुर्थी आणि षष्ठी या दोन विभक्ति मात्र मानितात; जसें-**करावयास, करावयाला;** अ० **करायास, करायाला; करावयाचें,** अ० **करायाचें;** अशीं चतुर्थीचीं आणि षष्ठीचीं रूपें मानितात; परंतु मला असें वाटतें कीं **करायास** अ० **करावयास, करायाचें** अ० **करावयाचें;** हीं **करावें** या विधिवाचक धातुसाधिताचीं विभक्तिरूपें नव्हत. हीं मुळीं **करा** आणि **करावें** या शब्दां पुढें **यास** आणि **याचें** हे दोन शब्द लागून **करायास, करायाचें; करावयास, करावयाचें;** अशीं रूपें बोलण्यांत संक्षेप होऊन झालीं असावीं असें अनुमान होतें.

प्राकृत ग्रंथांत बहुधा अशीच लिहिण्याची रीति आढळती. 'तो करावयास गेला,' म्हणजे करावें यास गेला, 'तें नेसावयाचें वस्त्र'; म्हणजे नेसावें याचें वस्त्र; 'बसायाचें घोडें', म्हणजे अर्थात् तुम्हीं बसा या कामाचें असा मूळचा अर्थ.

माझ्यानें अ० मला देववलें नव्हतें . . भूतभूत.
———— देववणार नव्हतें . . भविष्यभूत.
———— देववणार नाहीं . . . भविष्य.
———— देववत नसेल . . . अपूर्णभविष्य.
———— देववलें नसेल . . . भूतभविष्य.

### आज्ञार्थ.

माझ्यानें अ० मला नदेववो . . . . वर्तमानकाळ.

### विध्यर्थ.

माझ्यानें अ० मला देववूं नये . . . वर्तमानकाळ.
———— देववत नसावें, अ० देववत असूं नये. } अपूर्णवर्तमान.
———— देववावें नव्हतें, अ० देववायाचें नव्हतें. } भूत.
———— देववलें नसावें . . . वर्तमानभूत.
———— देववणार नसावें . . भविष्य.

### संशयार्थ.

माझ्यानें अ० मला देववत नसलें . वर्तमानकाळ.
———— देववलें नसलें . . . भूत.
———— देववणार नसलें . . भविष्य.
———— देववत नसेल . . . वर्तमानभविष्य.
———— देववलें नसेल . . . भूतभविष्य.
———— देववणार नसेल . . भविष्यभविष्य.

### संकेतार्थ.

माझ्यानें अ० मला नदेववतें, अ० देववतेंना. } भूतकाळ.

माझ्यानें अ० मला देववत नसतें . . . अपूर्णभूत.

———————— देववलें नसतें . . . भूतभूत.

### धातुसाधितें.

#### नामें आणि विशेषणें.

नदेववणें. . . . . . . . . क्रियावाचक.

नदेववलें, नदेववलेलें. . . . कर्मवाचक.

#### अव्ययें.

नदेववत, नदेववतां, नदेववतांनां, इ०. } वर्तमानकालवाचक.

नदेववलें असतां इ०. . . भूतकालवाचक.

## वर्ग १०.

### अवशिष्ट सहाय धातूं विषयीं विस्तार.

४८१ **जा, ये, दे, लाग, बस,** आणि **पाह,** हे सहाय धातु बहुधा सर्व अर्थीं सर्व काळीं चालतात. परंतु यांत **दे** धातूचीं प्रयोगविशेषेंकरून अधिक रूपें होतात; इतरांचीं तितकीं होत नाहींत.

### प्रकरण १.

#### गौण अ० सिद्ध क्रियापदें.

४८२ या सहाय धातूंतून ज्यांचीं रूपें सर्वव्यापक नसतां केवळ नियमित अर्थीं, नियमित काळीं, नियमित

**पुरुषीं मात्र साधतात, यांस गौण** अथवा **सिद्ध** क्रियापदें ह्मणतात. तीं गौण क्रियापदें—**पाहिजे, नको, नये,** आणि **नलगे,** हीं होत.

या गौण क्रियापदांचीं रूपें ज्या अर्थीं, ज्या काळीं, ज्या पुरुषीं होतात, त्या त्या अर्थीं, त्या त्या काळीं, त्या त्या पुरुषीं, सर्व सांगितलीं पाहिजेत.

४८३ **पाहिजे***—याचा अर्थ— 'अपेक्षित आहे' असा होतो; उ०—'मला आंबा पाहिजे', ह्मणजे मला आंबा अपेक्षित आहे. या वाक्यांत **आंबा** हा कर्त्ता होय, आणि **मला** ही चतुर्थी. हें गौण क्रियापद वर्तमान काळीं चालवून दाखवितों.

कर्तरिप्रयोग.

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं पाहिजे. | आह्मीं पाहिजे. |
| द्वि० | तूं पाहिजे, अ० पाहिजेस. | तुह्मीं पाहिजे, अ० पाहिजेत. |
| तृ० | तो—ती—तें पाहिजे. | ते—त्या—तीं पाहिजेत. |

याचें भविष्य काळीं क्वचित् **पाहिजेल** असें रूप होतें. आणि याचें वर्तमानकालवाचक धातुसाधित **पाहिजत**

*असें अनुमान होतें कीं **पाहिजे** हें प्राचीन मराठी भाषेंतलें **पाह** धातूचें विध्यर्थीं वर्तमान काळाचें रूप होय; जसें-**आइजे, बोलिजे, करिजे,** तसें **पाहिजे. पाहिजे** ह्मणजे **पाहावें,** अथवा **पाहायास योग्य,** अर्थात् जें पाहायास योग्य तें इच्छायासहि योग्य असतें, ह्मणजे अपेक्षित असतें, असा अर्थ.

असें होतें. आतां या धातुसाधिता पुढें **हो** आणि **अस** या सहाय धातूंचीं रूपें लाविलीं असतां त्या त्या अर्थी त्या त्या काळीं त्याचीं रूपें साधतात; जसें—**पाहिजत होतें, पाहिजत होतीं, पाहिजत असतें, पाहिजत असेल**, इ०. **पाहिजत होतें, पाहिजत असावें**, इ० स्थळीं—**पाहिजे होतें, पाहिजे असावें**, असाहि प्रयोग आढळतो.

हा धातु इतर धातूंच्या कर्मवाचक धातुसाधिता पुढें लाविला असतां त्या त्या क्रियेची आवश्यकता दर्शविली जाते; उ०—'मला गेलें पाहिजे', 'त्याला खेळविलें पाहिजे', 'त्यास लिहिलें पाहिजत होतें', 'तुला बसलें पाहिजेल', या ठिकाणीं **गेलें, खेळविलें, लिहिलें, बसलें**, हीं कर्मवाचक धातुसाधित नामें **पाहिजे** या क्रियापदाचे कर्त्ते होत.

४८४ **नको**—हें **पाहिजे** याचें प्रतिपक्षी होय; याचा अर्थ 'अपेक्षित नाहीं' असा होतो; जसें—'मला द्रव्य नको', ह्मणजे मला द्रव्य अपेक्षित नाहीं. या वाक्यांत **द्रव्य** हा कर्त्ता, **नको** हें क्रियापद, आणि **मला** ही चतुर्थी जाणावी.

याचीं रूपें वर्तमान काळीं चालवून दाखवितों.

**कर्तरिप्रयोग.**

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| प्र० | मीं नको. | आह्मीं नको. |
| द्वि० | तूं नको. | तुह्मीं नको. |
| तृ० | तो—ती—तें नको. | ते—त्या—तीं नकात. |

हें सहाय क्रियापद असतां याचा प्रयोग आज्ञार्थीं मात्र

होतो; तेव्हां हें निमित्तवाचक धातुसाधित अव्यया पुढें लाविलें जातें; आणि अनेकवचनीं याचें रूप **नका** असें होतें; उदाह०—'तूं करूं नको', 'तुह्मीं करूं नका'.

४८९ **नये**—याचा प्रयोग अकरणरूपीं विध्यर्थी होतो, तेव्हां हें मुख्य धातूच्या निमित्तवाचक धातुसाधित अव्यया पुढें योजितात; उदाह०—

| पुरु० | एकव० | अनेकव० |
|---|---|---|
| **प्र०** | मीं अ० म्यां करूं नये. | आह्मीं करूं नये. |
| **द्वि०** | तूं अ० त्वां करूं नये. | तुह्मीं करूं नये. |
| **तृ०** | त्याणें—तिणें करूं नये. | त्यांहीं करूं नये. |

एकादा व्यापार करायास 'येत नाहीं', 'शक्य नाहीं'. अथवा 'योग्य नाहीं', असा अर्थ असतां हें गौण क्रियापद केव्हां केव्हां **तां**प्रत्ययान्त धातुसाधितां पुढें योजितात; जसें— 'मला तेथें जातां नये', 'तुला हें काम करितां नये'.

असा अर्थ असतां व्याकरणपदच्छेद करितांनां जो **ये** या सहाय धातू विषयीं कर्तृकर्माचा नियम सांगितला तोच एथें जाणावा; ह्मणजे, अकर्मक धातुसाधिता पुढें **नये** हें सहाय क्रियापद असल्यास तेथें भावकर्त्तरिप्रयोग जाणावा, आणि सकर्मक धातुसाधिता पुढें हें क्रियापद असून त्या सकर्मक धातुसाधिताचें जें कर्म तें जर प्रथमान्त आहे तर त्यास **नये** या सहाय क्रियापदाचा कर्त्ता मानावें; जसें—'मला तेथें जातां नये', या वाक्यांत भावकर्त्तरिप्रयोग मानावा; आणि 'तुला तें काम करितां नये' यांत **काम** हें **नये** या क्रियापदाचा कर्त्ता मानावा. आणि 'तुला त्यास धरितां नये', हाहि भावकर्त्तरिप्रयोग जाणावा; कारण, एथें 'त्यास धरणें' हा जो क्रियेचा भाव तो कर्त्ता होय.

४८६ **नलगे*** या गौण क्रियापदाचा अर्थ आवश्यकता नाहीं', 'गरज नाहीं', असा होतो; उ०—'मला तुझी दक्षणा नलगे', 'तिला तुझें वस्त्र नलगे', एथें **दक्षणा, वस्त्र**, हे शब्द **नलगे** या क्रियापदाचे कर्त्ते होते.

॥ नलगे व्याकरणाची न्यायादि घटपटादि खटपट ती ॥ मोरोपंत.

तो तो व्यापार करण्याची आवश्यकता नाहीं अशा अर्थाची विवक्षा असतां त्या त्या धातूचीं जीं विधिवाचक आणि क्रियावाचक धातुसाधितें, त्यां पुढें याचा प्रयोग होतो; जसें—'त्यास हिंडावें नलगे,' 'मला जावें नलगे,' 'तीस बोध करणें नलगे', 'त्यांस इतका आग्रह करणें नलगे,' इ०.

अशा वाक्यांत **जावें, करणें**, इ० धातुसाधितें **नलगे** या क्रियापदाचे कर्त्ते मानिले पाहिजेत. 'त्यांस इतका आग्रह करावा नलगे,' इ० वाक्यांत 'त्यांस इतका आग्रह करावा' हें वाक्य अथवा वाक्यांश **नलगे** याचा कर्त्ता मानिल्या शिवाय दुसरा उपाय नाहीं.

४८७ **जा**—जेव्हां कर्मासच कर्त्ता मानणें आहे, ह्मणजे पूर्वीं जे एकाद्या क्रियेचें कर्म होतें त्यासच तोच अर्थ ठेवून त्या वाक्यांत कर्त्ता करणें आहे, तेव्हां बहुधा **जा** या धातूचा प्रयोग कर्मवाचक धातुसाधित विशेषणा पुढें करितात; जसें—'तो मारिला जातो,' 'ती धरिली गेली,' 'तें केलें जाईल,' इ०

[अ] ह्या **जा** धातूचा प्रयोग बहुधा मराठी भाषेंत दरबारी

*हें क्रियापद **न** आणि **लागणें** या शब्दां पासून उत्पन्न झालें असावें; प्रथम **नलागे** होऊन मग **नलगे** असा शब्द झाला असावा.

बोलण्यांत व लेखांत आढळतो; प्रौढ भाषणांत याचा प्रयोग नीट दिसत नाहीं.

[आ] या **जा**धातूच्या योगानें इतकाच अर्थविशेष होतो कीं जें पूर्वीं एकाद्या सकर्मक क्रियापदाचें कर्म होतें तेंच याच्या योगानें त्याच क्रियेचा कर्त्ता होतें; उदाह०—'तो वाघ मारितो', या वाक्यांत **वाघ** हें कर्म आहे. परंतु 'वाघ मारिला जातो', एथें अर्थ तसाच, ह्मणजे मारणें या क्रियेच्या फळाचा अनुभविता **वाघ**च आहे, परंतु या प्रयोगांत पूर्वींच्या वाक्यांतलें कर्म जो **वाघ**, तो एथें **मारिला जातो**, या क्रियेचा कर्त्ता होतो.

[इ] मराठी भाषेंत सर्व सकर्मक धातू वरून हा **जा** धातू प्रयोजून कर्मकर्तरिप्रयोग होत नाहीं; आणि कित्येक स्थळीं बलात्कारानें केला असतां तो प्रशस्त दिसत नाहीं; जसें— 'हा रथ त्याज कडून हांकला जातो', 'ही पोळी तिज कडून भाजली जात्ये'; या प्रमाणें बोलण्याचा परिपाठ नाहीं. 'ही गोष्ट सरकारांत लिहिली गेली असल्यास फार कठीण', 'जिल्हाजडज्या कडून सदरेस अपील केलें जावें', 'या प्रमाणें हुकूम मंजूर नकेल्यास त्याचा हक्क काढिला जाईल', इ०.—असा दरबारी बोलण्यांत व लिहिण्यांत याचा परिपाठ पडला आहे, ह्मणोन त्याच प्रकारच्या लिहिण्यांत **जा** धातूच्या योगानें जो कर्मकर्तरिप्रयोग होतो तो शोभतो.

परंतु मराठी भाषेंत सकर्मक क्रियापदाचें कर्मकर्तरि ह्मणून एक स्वतंत्र सर्वव्यापी असें रूप होत नाहीं, यामुळें एकादे समयीं मोठी अडचण पडत्ये. या रूपाची भाषेंत फार आवश्यकता आहे, ह्मणोन, ज्या भाषेंत धातू वरून स्वतंत्र कर्मकर्तरि रूप होत नसतें, तींत कोठें कोठें **जा** आदिकरून सहाय धातू-

च्या योगानें हें रूप साधण्याचें अगत्य पडतें; अथवा, कोठें क्रियापदांच्या रूपांच्या अंतर्गत हा कर्मकर्तरि अर्थ असतो; असें— 'आंबा ह्मटला ह्मणजे सर्वांच्या जिभे वर पाणी सुटतें,' 'लेंकरूं पाहिलें ह्मणजे आईस हर्ष होतो', 'काम केलें तर पैसे मिळतात', इत्यादि स्थळीं **ह्मटला, पाहिलें, केलें**, यांहींकरून तसा कर्मकर्तरि अर्थ ध्वनित होतो. 'चंद्र पाहिला असतां सर्वांस हर्ष होतो', या वाक्याचा अर्थ असा आहे कीं— चंद्र पाहिला गेला असतां सर्वांस हर्ष होतो. या प्रमाणें माझा अभिप्राय आहे. परंतु अशा ठिकाणीं—**कोणीं, लोकांनीं**, या बाहेरच्या कर्त्याचा अध्याहार मानणें कोणांस बरें दिसल्यास त्यांनीं असा अध्याहार मानून निर्वाह करावा.

[ई] अशा अर्थानें बोलायाची जेव्हां अपेक्षा असते, तेव्हां शुद्ध सकर्मक क्रियापदाचा अकर्मक क्रियापदा प्रमाणें प्रयोग करितात; जसें— 'या जात्यानें हे हरबरे चांगले दळणार नाहींत, ह्मणजे—'दळले जाणार नाहींत' असा अर्थ. 'या चाकूनें हें खर्बूज चांगलें कापत नाहीं', ह्मणजे कापिलें जात नाहीं.

[उ] प्राकृत ग्रंथांत मूळ धातूस **इजेणे** प्रत्यय लागून कर्मकर्तरि क्रियापद होतें, मग त्याचीं इतर धातू प्रमाणें काळ, वचन, लिंग, पुरुष, यांच्या परत्वें रूपें साधतात; जसें—**करिजेतो, बोलिजेतो, करिजेल, खाइजेल,** इ० परंतु हीं रूपें बहुधा तीन काळीं होतात असें दिसतें.*

---

*एथें मला असी अटकळ होत्ये कीं,-- **करिजेतो, कथिजेतो, खाइजेतो,** इ० हीं मूळचीं संस्कृतांत-**क्रियते, कथ्यते, खाद्यते,** इ० जीं कर्मकर्तरि अर्थ असतां रूपें होतात, त्या वरूनच साधलीं असावीं.

४८८ रीति, किंवा त्या त्या व्यापाराचा अभ्यास, असा अर्थ विवक्षित असतां जा आणि कधीं ये या धातूंचा योग वर्तमानकालवाचक तप्रत्ययान्त धातुसाधित अव्यया पुढें करितात; उदाह०—'मीं करित येतों', 'मीं लिहित जाईन', 'तूं बोलत जा', मुलांनीं विद्ये कडेस चित्त देत जावें', 'तूं हें काम पुष्कळ वर्षें करित आलास ह्मणून तूं आज त्यांत इतका कुशल झालास', इ०.

४८९ वर्तमानकालवाचक तांप्रत्ययान्त धातुसाधित अव्यया पुढें ये या धातूचा योग केला असतां त्या पासून शक्ति, ज्ञान, यांचा बोध होतो; उदाह०—'मला चालतां येतें', 'तुला पाहतां येईल', 'मला वाचतां यावें', 'तिला मांडा करितां आला असता', इ०.

४९० ये—अकर्मक धातू वरून, अथवा कर्माची अपेक्षा नधरितां सकर्मक धातू वरून, या सहाय धातूचा प्रयोग केला असतां भावकर्तरिप्रयोग होतो; जसें—'मला चालतां येतें', 'तुला धांवतां येईल', 'तिला लिहितां येतें तर बरें होतें', इ०. या वाक्यांत क्रियेचा जो भाव तोच कर्ता होय. 'मला चालतां येतें' ह्मणजे चालणें अथवा चलनरूप जो व्यापार तो मला अवगत आहे असा अर्थ.

४९१ करणरूप अथवा अकरणरूप असतां या सहाय धातू वरून सविकरणतृतीयान्त कर्ता होतो; जसें—'मला अथवा माझ्यानें तेथें जातां येतें', 'तुला अ० तुझ्यानें तसें होतां येत नाहीं', इ०. असें बहुतांचें मत आहे, परंतु मला वाटतें अशा ठिकाणींहि भावकर्तरि प्रयोग मानावा हें बरें.

इतर ठिकाणीं कर्त्याचा अर्थ असतां कोठेंहि सविकरण तृतीयान्त कर्ता असत नाहीं असा नियम असतां ज्या पेक्षां अशाच

ठिकाणीं सविकरण तृतीयेच्या रूपांचा प्रयोग होतो. त्या पेक्षां तींच अपवादक रूपें **ये** या सहाय क्रियापदाचे कर्त्ते नव्हत या विधानास दृढ प्रमाणभूत होतात.

४९२ परंतु जर हा सहाय धातु विवक्षित कर्मा सहवर्तमान सकर्मक धातूं वरून प्रयोजिला, तर त्या कर्माच्या लिंगवचनानुरूप या सहाय क्रियेचें रूप फिरतें; जसें— 'मला **ग्रंथ** लिहितां **येतो**, **पुतळी** करितां **येत्ये**, आणि **चित्र** काढितां **येतें**'; या वाक्यांत **ग्रंथ**, **पुतळी**, आणि **चित्र**, यांस त्या त्या सकर्मक धातुसाधितांचीं कर्में करून **येतो**, **येत्ये**, आणि **येतें** या क्रियापदांचे कर्त्ते मानावे.

कदाचित् एथें कोणीं पूर्वपक्ष केला किं जर पूर्वोक्त वाक्यांत **ग्रंथ**, **पुतळी**, आणि **चित्र**, हे त्या त्या क्रियेचे कर्त्ते मानून त्या त्या सकर्मक धातुसाधितांचीं कर्में मानिलीं, तर एका क्रियेचें कर्तृत्व आणि दुसऱ्या क्रियेचें कर्मत्व एकच पदार्था वर येऊं लागतें, ह्मणजे जें एकदां कर्म होतें तेंच त्या वाक्यांत कर्त्ता होऊं लागतें; हा मोठा दोष येतो; त्यास ही आशंका खरी आहे, परंतु असें झाल्यास कांहीं विशेष बाध आहे असें मला वाटत नाहीं. एकदां तीं तीं नामें त्या त्या सकर्मक धातुसाधितांचीं कर्में करून त्यांस **ये** या सहाय क्रियापदांचे कर्त्ते मानावे. असें नकरावें तर **ये** या क्रियेस भावकर्तरि मानून आणखी ती त्या त्या सकर्मक धातुसाधिताच्या कर्माची लिंगवचनानुरोधी अशी मानली पाहिजे, हें अधिक अप्रशस्त दिसतें; कारण, भावकर्तरि क्रियापद निरंतर तृतीय पुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें, या नियमास मोठा दोष येतो; तेव्हां मला वाटतें कीं सकर्मक धातुसाधिता पुढें **ये** या सहाय धातूचा योग असतां जें त्या धातुसाधिताचें कर्म तेंच त्या वाक्यांत **ये** या क्रियेचा कर्त्ता असतें. धातुसाधितास निरंतर गौणत्वं असतें ह्मणोन व्याकरणपदच्छेद करिते समयीं त्याचें कर्म सांगायाची कोणी गरज ठेवित नाहींत. तथापि हें स्थळ कांहींसें वादास्पद आहे.

४९३ **दे**—कोणताहि व्यापार करायास मोकळीक देणें असा अर्थ विवक्षित असतां निमित्तवाचक धातुसाधित अव्यया पुढें दे या धातूचा योग करितात; जसें—'मीं करूं देतों', 'त्याणें तिला जाऊं दिलें', 'तूं त्यास बोलूं दे', 'रामानें गोपाळास तें पत्र वाचूं दिलें असतें तर बरें होतें'.

४९४ **लाग**— या धातूचा योग निमित्तवाचक धातुसाधित अव्यया पुढें केला असतां व्यापारारंभ बोधित होतो; जसें— 'तो बोलूं लागला', 'ती करूं लागेल', 'तीं खाऊं लागतील', इ०.

४९५ **बस**—कोणताहि व्यापार कोणीं दीर्घकालपर्यंत सतत चालवितो, अथवा, तो व्यापार करित असतां दुसऱ्या व्यापाराकडेस लक्ष देत नाहीं, असा अर्थ विवक्षित असतां तप्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधिता पुढें **बस** या धातूचा प्रयोग करितात; जसें— 'मीं काल केढोळपर्यंत तुमची वाट पाहत बसलों परंतु तुह्मीं आलां नाहीं', 'तो सारा दिवस लिहित बसतो', 'मीं उद्यां सारा दिवस झोंप घेत बसेन', इ०.

[अ] परंतु एथें एक गोष्ट शिकणारांनीं पक्की लक्षांत ठेवावी कीं धातुसाधितें, आणि त्यां पुढें योजिलेले सहाय धातु, यांच्या अर्थाच्या सामानाधिकरण्याचा संभव असला पाहिजे तरच त्यांचा योग होतो, नाहींतर अर्थाचें सामानाधिकरण्य नसल्यास हा योग होत नाहीं; सांगावयास तात्पर्य सर्व धातुसाधितां पुढें सर्व सहाय धातूंचा योग होतो असें नाहीं; जसें—'मीं लिहित बसतों', असें होतें, परंतु 'मीं निजत बसतों', असें होत नाहीं.

४९६ **पाह**— कोणताहि व्यापार करण्या विषयीं कर्ता आपली इच्छा प्रकट करितो, अथवा त्या विषयीं प्रयत्न करितो, असा अर्थ विवक्षित असतां निमित्तवाचक धातुसाधिता पुढें **पाह**धातूंचीं (विशेषेंकरून) वर्तमान काळाचीं रूपें योजितात; जसें—'तो लिहूं पाहतो', 'ते निघूं पाहतात','रामराव जर हें काम घेऊं पाहते तर त्यांस तें सहज मिळतें'.

४९७ अशा ठिकाणीं व्याकरणपदच्छेद करिते समयीं गोंधळ होऊं नये ह्मणोन या धातुसाधितांस निराळें करून पुढलें क्रियापद निराळें मानावें, हा मार्ग सुलभ व सरळ दिसतो.

## वर्ग ११.

### क्रियापदांचीं रूपें साधण्याचा प्रकार.

४९८ अकर्मक मूळधातूस **त** हा प्रत्यय लाविला असतां वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्यय सिद्ध होतें; जसें— उठत, बसत, जात, येत, निजत, हंसत, रडत, करवत, खाववत, उठवत, दळत, कापत, इ०.

४९९ **पढ**धातूचा गण वर्जून सकर्मक मूळधातूस हा **त** प्रत्यय लागत असतां त्याच्या मागें **इ** आगम विकल्पें होतो; जसें—करित, बांधित, तोडित, जेवित, वेढित, ताडित, रोंवित, करावित, खाववित, उठवित, दळित, कापित, इ०.

[अ] **पढ**धातूचा गण वर्जून ह्मटलें ह्मणोन—पढत, शिकत, बोलत, ह्मणत, इ० अशींच रूपें होतात.

[आ] हा आगम विकल्पें होतो असें ह्मटलें यावरून करत, बांधत, तोडत, जेवत, वेढत, ताडत, रोंपत, करवत,

उठवत, इ०. अशींहि रूपें लिहण्याचा परिपाठ आहे असें समजावें.

परंतु यांत शिकणारांनीं लक्षांत ठेवावें कीं वर्तमानकालवाचक सकर्मक धातुसाधितास हा आगम करावा हा उत्तम पक्ष होय. या नियमास अनुसरलें असतां पुष्कळ अडचणी व संशय दूर होतील. एकादे समयीं कर्मकर्तरि अर्थ असतां सकर्मक क्रियापदाचा अकर्मक क्रियापदा प्रमाणें प्रयोग करितात तेव्हां हा तारतम्यभाव लक्षांत ठेवणें फार आवश्यक होतें. पहा पृ० १५२ ले० ३७८.

५०० **लिह** धातू वर्जून हकारान्त धातूस हा आगम होत नाहीं; जसें—पाहत, साहत, चाहत, नाहत, वाहत, पोहत, इ०.

**लिह** वर्जून ह्मटलें ह्मणोन **लिहित** असेंच बहुधा रूप होतें. देशस्थां मध्यें **लिहत** असें ह्मणण्याचा प्रकार क्वचित् आढळतो तो या नियमास अनुसरून आहे.

५०१ एकाक्षरी धातूवरून हा आगम होत नाहीं; जसें—देत, घेत, नेत, भित, खात, गात, इ०.

५०२ **च, ज, झ, स,** या वर्णांत हा आगम होत असतां अनुक्रमें **च, ज, झ, श,** हे आदेश होतात; जसें—खोचित, रचित, गांजित, भाजित, सोशित, वाशित, इ०.

५०३ इकाराच्या स्थानीं कोणी ईकारहि आगम करितात; जसें—करीत, बांधीत, ठेवीत, भरीत, इ०.

एकापक्षीं पाहिलें असतां या दीर्घ ईकाराचा आगम करण्यासहि कांहींसें निमित्त आहे; कांकिं मराठी भाषेंत शब्दाचे उपान्त्य वर्ण **इ उ** असल्यास ते निरंतर दीर्घ असतात; परंतु हा नियम बहुधा पूर्णार्थान्वित शब्दां विषयीं जाणावा; धातुसाधित अव्य-

यांस तो लावितां येत नाहीं. दुसरें, जेथें ऱ्हस्व इकाराचें सहन होत नाहीं, ह्मणोनच त्याचीहि अपेक्षा न ठेवितां कित्येक— **करवत, ठेवत, बांधत**, अशीं रूपें लिहितात, तेथें दीर्घ ईकाराचें सहन होणें दुर्घट. आणखी सूक्ष्म विचारानें पाहिलें असतां अशी एक अटकळ होत्ये कीं हा जो मराठींत **इ** आगम होतो तो संस्कृतांत जो धातुसाधितांस अथवा क्रियापदांच्या रूपांस मध्यें इडागम होतो, त्याचेंच अनुकरण होय. अशा कारणां वरून मला वाटतें ऱ्हस्व इकार आगम करणें अधिक प्रशस्त होय.

५०४ पूर्वोक्त नियमां प्रमाणें हें वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्यय सिद्ध झालें ह्मणजे त्या वरून, अथवा त्याच नियमास अनुसरून,—**ता**प्रत्ययान्त—**तांना**प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययें,- मूलरूप भेदीं, प्रयोजक भेदीं, स्वार्थीं, वर्तमान आणि पूर्णभूत काळीं, आणि संकेतार्थीं भूतकाळीं,— क्रियापदांचीं रूपें, सिद्ध होतात.

५०५ मूळधातूस पुढें **ला, ली, लें**, इ० हे प्रत्यय प्रयोगानुसंधानानें लाविले असतां **ला**प्रत्ययान्त धातुसाधित नाम अथवा विशेषण सिद्ध होतें; जसें—धांवला, उठली, बसलें, हंसले, खेळल्या, जेवलीं, इ०.

५०६ **त**प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययाच्या साधनांत **इ** आगमा विषयीं वर जे नियम सांगितले, तेच बहुधा **ला**प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणाच्या साधनांत **इ** आगमा विषयीं जाणावे.

५०७ **ला**प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणा वरून मराठींत भूतकाळाचीं रूपें साधतात; जसें—निजलें, बांधिलें, शृंगारिली, करविला, घेवविले, नेशिल्या, रचिलीं, इ०.

५०८ जसा त्या धातुसाधितांच्या ठायीं तसा या धातुसाधिताच्या ठायींहि हा आगम इकारान्त धातु वर्जून वैकल्पिक आहे, ह्मणोन—निजलें, बांधलें, शृंगारली, करवला, घेववलें, नेसल्या, रचलीं, पाहिलें, लिहिलें, इ० अशींहि रूपें लिहण्याचा प्रघात आहे. या विषयीं पहा पृ० २४३, ले० ४९९, [आ].

५०९ कित्येक धातूंच्या भूतकाळाचीं रूपें नियमा प्रमाणें होत नाहींत, ते धातु व त्यांचीं तीं रूपें खालीं लिहिलीं आहेत.

| | धातु. | भूतकाल. | | धातु. | भूतकाल. |
|---|---|---|---|---|---|
| २ | उडणें | उडाला | २ | निवणें | निवाला |
| ३ | उभणें | उभाला | | पळणें | पळाला |
| ३ | खिजणें | खिजाला | ३ | बुजणें | बुजाला |
| ३ | गळणें | गळाला | ३ | बुझणें | बुझाला |
| ३ | जळणें | जळाला | २ | बुडणें | बुडाला |
| १ | जिरणें | जिराला | १ | भिजणें | भिजाला |
| ३ | झिजणें | झिजाला | २ | मिळणें | मिळाला |
| १ | टळणें | टळाला | १ | मुरणें | मुराला |
| १ | तडणें | तडाला | | ह्मणणें | ह्मणाला |
| २ | दडणें | दडाला | | रिघणें | रिघाला |
| ३ | दबणें | दबाला | ३ | रिझणें | रिझाला |
| ३ | दिपणें | दिपाला | ३ | लपणें | लपाला |
| | निघणें | निघाला | ३ | विझणें | विझाला |
| १ | निभणें | निभाला | २ | विरणें | विराला |
| २ | निमणें | निमाला | | हिंवणें | हिंवाला |

यांत ज्यांच्या मागें अंक मांडिला नाहीं, त्यांचें भूतकाळाचें रूप एकप्रकारचें मात्र होतें; ज्यांच्या मागें १ हा अंक आहे, त्यांचें रीतीनें जें रूप होतें त्यांची प्रवृत्ति अधिक आहे. ज्यांच्या मागें २ हा अंक आहे, त्यांच्या वर लिहिलेल्या रूपांची प्रवृत्ति अधिक आहे. आणि ज्यांच्या मागें ३ हा अंक आहे, त्यांच्या दोन्हीं रूपांचीं सारिखी प्रवृत्ति आहे असें जाणावें.

५१० खालीं लिहिलेल्या धातूंच्या भूत काळाचीं रूपें पूर्वोक्त नियमांत नाहींत.

| धातु. | भूतकाळ. | धातु. | भूतकाळ. |
|---|---|---|---|
| करणें | केलें | बघणें | बघितलें |
| मरणें | मेलें | मागणें | मागितलें |
| जाणें | गेलें | सांगणें | सांगितलें |
| येणें | आलें | खणणें | खणलें, खंटलें |
| होणें | झालें | ह्मणणें | ह्मटलें |
| गाणें | गाइलें, (कों० गालें) | हणणें | हंटलें |
| ध्याणें | ध्याइलें, (कों० ध्यालें) | पिणें | प्यालें |
| माणें | माइलें, (कों० मालें) | भिणें | भ्यालें |
| घेणें | घेतलें | विणें | व्यालें |
| घालणें | घातलें | लेलें | ल्यालें |
| धुणें | धुतलें | देणें | दिलें |

भावीप्रयोग असतां **ह्मण** याचें भूतकाळाचें रूप **ह्मटलें** असें होतें.

**झालें** हें रूप लिहिण्याचे दोन तीन प्रकार आढळतात-**झालें**, **जहालें**, **जाहलें**, **जाहालें**, जसें—

कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य जाहली आहे ॥ मोरोपंत.

परंतु मला वाटतें **ह** आणि **झ** यांचें एका पक्षीं सावर्ण्य आहे, ह्मणोन **झालें** हेंच रूप लिहावें हा उत्तम पक्ष. अथवा संस्कृत भाषेच्या नियमा प्रमाणें **ह स ज** हा अभ्यास करून **जहालें** असेंहि होण्याचा संभव दिसतो.

## वर्ग.१२.

### क्रियापदां विषयीं आणखी स्फुट विचार.

५११ हकारान्त जितके धातु आहेत, त्यांच्या आज्ञार्थीं, द्वितीय पुरुषीं, एकवचनीं, बहुधा शेवटीं **आ**कारादेश करायाचा परिपाठ पडला आहे, व तो आकारादेश करित असतां विकल्पें पहिल्या **आ**कारास **अ** आदेश करितात; जसें—पाहा, पहा; साहा, सहा; राहा, रहा; चाहा, चहा; बाहा, बहा; इ०.

माझा या बाळचें स्मरण करुनि तूं मनीं पहा शील
अथवा रथवाजिद्विपभटकोटिप्रमथनीं पहाशील.—मोरोपंत.

परंतु विचारपूर्वक पाहिलें असतां असा नियम आढळतो कि मराठी भाषेंत द्व्यक्षरी धातु अकारान्ता शिवाय नाहींत. तेव्हां हे **ह**कारान्त धातुहि मूळचे **अ**कारान्त खरे यांत संशय नाहीं; परंतु शब्दाच्या शेवटीं व मध्यें **ह** असतां त्यांस दीर्घ केल्यानें त्याच शब्दांच्या उच्चारणांत फारसें अंतर समजण्यांत येत नाहीं, ह्मणोन यांस प्रमादानें पूर्वीपासून कोणी आकारान्त करून—**पहातो**, **रहातो**, **पहा**, **राहाशील**, **रहावेल**, अशीं रूपें लिहितात. परंतु मला वाटतें **पहा** असें रूप लिहणें व्याकरणदृष्ट्या प्रशस्त नाहीं. एकवचनीं—**पाह**, **साह**, **राह**, अशीं

रूपें, आणि अनेकवचनीं—**पाहा, साहा, राहा**, अशीं रूपें लि·हणें व्याकरणदृष्ट्या अधिक शुद्ध होय.

५१२ अथापि पूर्वींपासून पूर्वोक्त रीतीनें लिहिण्याचा प्रघात पडला आहे ह्मणोन या अकारान्त धातूंचीं विकल्पें आज्ञार्थीं एकवचनीं **पहा, रहा,** अशींहि रूपें लिहिलीं असतां चिंता नाहीं.

पुढला हकार दीर्घ झाला असतां विकल्पें मागल्या **आ**कारास अकारादेश होतो; जसें—पहातों, रहातों, लहान, सहान, तहान, पहाड, इ०.

५१३ कित्येक धातुसाधितांच्या योगानें अथवा इतर शब्दांच्या योगानें क्रियेचे अर्थ भिन्न होतात, अथवा ज्या क्रियेशीं त्या धातुसाधितांचा संबंध असतो, त्यां पासून तीं धातुसाधितें निराळीं काढिलीं असतां अर्थच बसत नाहीं, अथवा कित्येक स्थळीं अर्थांत वैषम्यहि येतें, असें असल्यास व्याकरण करिते समयीं त्या धातुसाधितांचा अथवा शब्दांचा निरनिराळा व्याकरणपदच्छेद नकरितां त्या त्या धातुसाधितां सहित तीं तीं **संयुक्त** क्रियापदें ह्मणावीं ह्मणजे बरें; जसें—**विकत घेणें, जेऊं घालणें, तोंडीं लावणें**, इ०. 'त्याणें घोडा विकत घेतला', 'तो ब्राह्मणास जेऊं घालील', 'तीं भाताशीं पापड तोंडीं लाविले', यांस—'**विकत घेतला**,' '**जेऊं घालील**', '**तोंडीं लाविले**', हीं **संयुक्त** क्रियापदें ह्मणावीं.

हा मार्ग उघडिल्यानें मला भरंवसा आहे कीं पुष्कळ संशय आणि वादविवाद दूर होतील.

५१४ कोणत्याहि क्रियेचा अथवा व्यापाराचा अतिश-

यार्थ अथवा पौन:पुन्यार्थ दाखविणें इष्ट असल्यास मूळ धातूस द्विवार अभ्यास करून एक नवें क्रियापद सिद्ध करितात, मग त्याचीं इतर धातूं प्रमाणें भेद, अर्थ, काळ, प्रयोग, यांच्या अनुरोधानें रूपें साधितात ; जसें— **करकरकरणें, लिहलिहलिहिणें, वाचवाचवाचणें, निजनिजनिजणें, जाजाजाणें, चालचालचालणें,** इ०. उदाहरणें*— 'त्यास एकदां कोणीं सांगितलें ह्मणजे तो करकरकरितो', 'त्यास लिह ह्मण ह्मणजे तो लिहलिहलिहील', 'त्याणें मुकाम सोडिला ह्मणजे चालचालचालावें', इ०.

५१५ आज्ञार्थीं वर्तमान काळीं तृतीय पुरुषीं जो ऊकार आणि ओकार होतो त्यां विषयीं आणखी दुसरा नियम असा आढळण्यांत येतो कीं एकाक्षरी धातु असल्यास त्यास ऊकार, आणि अनेकाक्षरी असल्यास ओकार विशेषें करून होत असतो.

मराठींत हा क्रियापदविचार फार मोठा आणि अतिशय गुंतलेला आहे, त्याचें एथें संक्षेपेंकरून विवेचन केलें आहे; त्यांत मराठी क्रियापदांची जी ही गूत सोडवून कांहींशी उकलण्याच्या धोरणांत आणिली आहे, तें हें काम केवळ नूतन होय, ह्मणोन तें पूर्ण व पक्कें नसलें तरीं ग्रंथकर्त्यास क्षमा मागायास मोठा अवकाश आहे.

## भाग ९.

## अविभक्तिक किं० अव्ययें यां विषयीं विचार.

५१६ अविभक्तिक शब्द किंवा अव्ययें ह्मणजे ज्यांस कांहीं कार्यविशेष होत नाहीं, व मूळचें जसें त्यांचें स्वरूप असतें तसेंच निरंतर अविकृत राहतें, व ज्यांचा वाक्यरच-

नेंत फार उपयोग पडतो, असे जे शब्द तीं; जसें—आणि, परंतु, किंवा, जर, तर, लौकर, तेव्हां, मग, नंतर, छिः, इ०. अव्ययांत **क्रियाविशेषण**, **उभयान्वयी**, **शब्दयोगी**, **उद्गारवाची**, अथवा **केवलप्रयोगी** हे भेद आहेत.

## विभाग १.

### क्रियाविशेषण अव्यय.

५१७ ज्या शब्दांहींकरून क्रियेच्या गुणाचा अथवा प्रकाराचा अथवा अमुक अवस्थेंत ती क्रिया घडली अशा अर्थाचा बोध होतो, ते शब्द क्रियाविशेषणें होत; उदाह०— 'हळू चालतो', 'फार बोलतो', 'खेळत जातो'; या वाक्यांत **हळू**, **फार**, आणि **खेळत**, या शब्दांहींकरून त्या त्या क्रियेच्या प्रकाराचा किंवा गुणाचा बोध होतो.

५१८ मराठी भाषेंत क्रियाविशेषण अव्ययें चार प्रकारचीं होतात.

प्रथम—शुद्ध अव्ययें असून जीं निरंतर क्रियाविशेषणें असतात तीं; जसें— हळू, लौकर, पुनः, वारंवार, इ०.

दुसरीं-धातुसाधितें असून ज्यांचा क्रियाविशेषणां प्रमाणें प्रयोग होतो तीं; जसें— खेळत, हंसत, खेळतां, हंसतां, खेळतांनां, हंसतांनां, खेळत असतां, हंसत असतांनां, इ०.

तिसरीं—शुद्ध विशेषणें असून ज्यांचा क्रिये कडेस संबंध असतो, ह्मणजे क्रियेच्या प्रकाराचीं अथवा गुणाचीं दर्शकें असतात, तीं. यांचा भरणा या भाषेंत फार आहे; किंबहुना जितकीं गुणविशेषणें तितकीं या भाषेंत क्रियाविशेषणें होतात असें ह्मटल्यासहि चिंता नाहीं; जसें—'तो चांगलें लिहितो', 'ती गोड बोलत्ये', 'त्या मधुर गातात', इ०.

५१९ या भाषेंत गुणविशेषणांचीं क्रियाविशेषणें होत असतां त्यांस क्रियाविशेषणनिमित्तक कांहीं विशेष कार्य होत नाहीं, ह्मणून ज्या विशेषणांचीं रूपें विशेष्याच्या योगानें फिरत नाहींत तीं क्रियाविशेषणें असतांहि त्यांस कांहीं विकार होत नाहीं ; परंतु, ज्यांचीं रूपें विशेष्याच्या लिंगवचनां वरून फिरतात, तीं क्रियाविशेषणें असतां त्यांचीं रूपें कचित् क्रियेच्या भावा वरून, कचित् कर्त्या वरून, आणि कचित् कर्मा वरून, फिरतात;जसें—'तो चांगलें लिहितो', 'त्या उग्या राहिल्या', 'त्यांणीं आपलीं घरें तांबडीं रंगविलीं असतां तुह्मीं आपलीं हिरवीं रंगवा', इ०. तेव्हां या विषयीं कांहीं नियम करणें इष्ट आहे.

५२० अकर्मक क्रियापद असतां, अथवा सकर्मक क्रियापद असून कर्माचा उल्लेख नसतां, जेथें क्रियाविशेषण पक्षीं कर्त्याच्या अनुरोधानें चालतें, अशा स्थळीं जों साधेल तों तें क्रियाविशेषण नपुंसकलिंगी करून क्रियेच्या भावाचें अनुरोधी करावें ह्मणजे बरें ; जसें -'ती **चांगली** नाचते,' 'तो **बरा** बोलतो', 'तीं **वांकडीं** चालतात'; अशा ठिकाणीं—'ती **चांगलें** नाचते', 'तो **बरें** बोलतो,' 'तीं **वांकडें** चालतात'; असें बोलण्याचा व लिहिण्याचा परिपाठ ठेविला असतां शुद्ध.

५२१ परंतु कित्येक क्रियाविशेषणें कर्त्याच्याच अनुरोधानें वागतात ; जसें—'ती **उगी** राहते', 'ते **उभे** राहतात', 'त्या खणांत या पोथ्या **आडव्या** मांडा', 'ही सळई या छिद्रांत **वांकडी** जात नाहीं, उभी जाते'; इ०.

यांत असा नियम आहे कीं जीं शुद्ध क्रियाविशेषणें असून **आ**कारान्त असतात तीं कर्त्याच्याच अनुरोधानें वागतात.

५२२ सकर्मक क्रियापद असून जेथें क्रियाविशेषणें करून कर्मासहित क्रियेच्या प्रकाराचें विधान केलें असतें, तेथें तें क्रियाविशेषण कर्माच्या अनुरोधानें वागतें; जसें—'त्याणें तो ग्रंथ **मोकळा** केला', 'तिणें आपली चोळी **उलटी** शिवली', 'त्याणें कालच्या आर्या **चांगल्या** लाविल्या', इ०. या उदाहरणांत— ग्रंथाचें मोकळें करणें, चोळीचें उलटें शिवणें, आणि आर्यांचें चांगलें लावणें, यांचें विधान आहे असें जाणावें.

'तो चांगल्या आर्या लावितो', आणि 'तो आर्या चांगल्या लावितो', यांत अर्थभेद आहे; पहिल्या उदाहरणांत शुद्ध आर्यांचाच गुण प्रदर्शविला जातो, परंतु दुसऱ्या उदाहरणांत त्या आर्या लावण्याचा जो प्रकार त्याचें विधान केलें जातें.

५२३ हीं क्रियाविशेषणें क्वचित् दुसऱ्याहि क्रियाविशेषणाच्या अथवा विशेषणाच्या प्रकारचा बोध करितात; जसें—'तो फार त्वरित बोलतो', 'तो उत्कृष्ट ठक आहे', या वाक्यांत **फार** हें क्रियाविशेषण **त्वरित** या क्रियाविशेषणाचा प्रकार दर्शवितें, आणि **उत्कृष्ट** हें **ठक** या विशेषणाचा प्रकार दर्शवितें.

५२४ मराठी भाषेंत व्यापारादिकांचें अनुकरण कर्तव्य असतां तो अनुकार्य जो व्यापारादि त्याच्या स्थानीं कांहींएक ध्वनितार्थवाचक शब्द कल्पून त्या पुढें—**कन, कर, दिनीं, दिशीं,** हे प्रत्यय लावून जे शब्द साधतात, अथवा द्विरुक्तीनें जे या प्रकारचे शब्द सिद्ध होतात, तीं सारीं

क्रियाविशेषणें होत; जसें—फटकन, फटकर, फटदिनीं, फटदिशीं; गटकन, गटकर, गटदिनीं, गटदिशीं; गपगप, धसधस; बदबद, झटझट; फटफटां, बदबदां; फटाफट, बदाबद, कडाकड, धडाधड; इ०.

या अशा अनुकरणरूप शब्दांचा या महाराष्ट्र भाषेंत जितका भरणा असेल तितका मला वाटतें आणखी कोणतेंयेहि भाषेंत नसेल; आणि तो या भाषेचा केवळ असाधारण जिव्हाळा होऊन राहिला आहे. गति, वेग, मांजुल्य, कार्कश्य, सौंदर्य, परिमिति, इत्यादि क्रियेचे शतावधि प्रकार दाखवायाचे असतां त्या त्या अनुकरणरूप शब्दाचा प्रयोग होतो; जसें **झटझट** चालतो; **चमचम** लवत्ये; **टकमक** पाहत्ये; **झणझण** वाजतें; **बदबद** पडतें; **टपटप** झरतें; **भडभड** ओकतो; **तडतड** बोलतो; **तोंडोतोंड** भरतो; **कांठोकांठ** चालतो; छडी वाजे **छमछम**, विद्या ये **घमघम**.

५२५ आणखी नामा पुढें **पूर्वक** हें अव्यय लागलें असतांहि तीं स्थलविशेषीं क्रियाविशेषण अव्ययें होतात; जसें—प्रीतिपूर्वक, स्नेहपूर्वक, लोभपूर्वक, इ०. 'कोणास प्रीतिपूर्वक दिलें असतां तें विशेष ग्राह्य होतें', 'मी तुह्मांस स्नेहपूर्वक सांगतों', इ०.

परंतु—'प्रीतिपूर्वक जें दान तें अधिक ग्राह्य', 'स्नेहपूर्वक जो सत्कार', 'भावपूर्वक पूजा', इ० वाक्यांत—**प्रीतिपूर्वक**, **स्नेहपूर्वक**, इ० **दान**, **सत्कार**, यांचीं विशेषणें होत. परंतु मात्र्यान-'स्नेहपूर्वक केलेला सत्कार' इ० प्रकारच्या वाक्यांत पुनः हीं **केलाला**, इ० धातुसाधितांचीं क्रियाविशेषणेंहि होतात.

५२६ कित्येक शब्दांस विभक्ति असतां त्यांचा प्रयोग शुद्ध अव्यया प्रमाणें होतो; ह्मणून त्यांस अव्ययेंच मानिलें असतां चिंता नाहीं; जसें—इतक्यांत, सकाळला, दिवसास, रात्रीस, तशांत, वस्तुतः, वस्तुदृष्ट्या, इ०. उदाह०-'इतक्यांत

तो नाहींसा झाला', 'तूं उद्यां सकाळला ये', 'तशांत मी गेलों असतों', 'वस्तुदृष्ट्या पाहिलें असतां', इ०; याच प्रमाणें— **मोठ्यानें, अनशेपोटीं, अनवाणीं**, इ० आणखी उदाहरणें.

५२७ एकाद्या समयीं अनेक अव्ययें एकत्र होऊन, अथवा अव्ययां वरून विभक्ति अथवा शब्दयोगी अव्ययें लागूनहि क्रियाविशेषण अव्ययें सिद्ध होतात ; परंतु असें होत असतां एकारान्त अव्ययास अंतीं अ आदेश होतो ; जसें—**जेथपर्यंत, तेथपावेतों, एढोळपर्यंत, तेव्हांपासून, केव्हांचा, एथपासून**, इ०.

५२८ **प्रतिगांवास, प्रतिदेशास**, इ०. अशा अर्थी त्या त्या शब्दाची द्विरुक्ति करून पहिल्या पदास ओकारान्त केलें असतां एक जातीचीं स्थलवाचक क्रियाविशेषण अव्ययें होतात; जसें—**गांवोगांव, देशोदेश, रानोरान, वेळोवेळ** इ०.

परंतु हीं नामें मूळचीं अकारान्त असलीं पाहिजेत.

५२९ कित्येक क्रियाविशेषण अव्ययें त्यांच्या अर्था सहित सांगतों.

स्थलवाचक ...तेथें, एथें, जेथें, इकडे, तिकडे, इ०.

कालवाचक ...तेव्हां, एव्हां, जेव्हां, केव्हां, उद्यां, काल, परवां, एरवां, शेवटीं, वारंवार, दरसाल, यंदां, गतसालीं, इ०.

संख्यावाचक...एकदां, दोनदां, तीनदां, शंभरदां, इ०.

क्रमवाचक. ...पहिल्यानें, दुसऱ्यानें, तिसऱ्यानें, इ०.

निश्चयार्थक ...खचित, निःसंशय, निभ्रांत, इ०.

अनुकरणवाचक.फटकन्, गपकन्, चटदिशीं, टपकन्, टपदिनीं, गटगटां, गपागप, भडाभड, झटझट, टपटप, झणझण, इ०.

## विभाग २.

### उभयान्वयी अव्यय.

५३० ज्या अव्ययाचा संबंध दोन शब्दांच्या अथवा दोन वाक्यांच्या अन्वया कडेस असतो, त्यास उभयान्वयी अव्यय ह्मणावें ; जसें—**आणि**, **जर**, **तर**, **परंतु**, **यद्यपि**, **तथापि**, **कांकीं**, **कांजर**, इ०. 'रामा आणि कृष्णा तेथें गेले आहेत', या वाक्यांत **आणि** या शब्दानें **रामा** आणि **कृष्णा** या उभयतांचा गमनक्रिये कडेस अन्वय करून दिला आहे, ह्मणजे रामा गेला, आणि कृष्णाहि गेला, असा अर्थ. तसेंच, 'त्याणें दहा हजार फौज घेतली, आणि दौलताबाद वेढिली'.

या उभयान्वयी अव्ययाचे कित्येक अर्थ सांगतों.

समुच्चयवाचक. . आणि, व, आणखी, इ०.

न्यूनत्वबोधक . . कदाचित्, क्वचित्, प्रायः, प्रायशः, बहुतकरून, इ०.

पक्षांतरबोधक. . परंतु, पण, अथवा, किंवा, नाहींतर, पक्षीं, किंबहुना, इ०.

कारणोभयान्वयी. कारण, कांकीं, कांजर, त्यास, इ०.

संकेतोभयान्वयी. जर, तर, जरीं, तरीं, यद्यपि, तथापि, इ०.

## विभाग ३.

### शब्दयोगी अव्यय.

५३१ ज्या अव्यया पासून दिग्रूप अथवा कालरूप अधिकरणाचा उद्बोध होतो, आणि ज्या शब्दाशीं याचा

योग होतो त्याचें याच्या योगानें सामान्यरूप होतें असा जो शब्द तें शब्दयोगी अव्यय होय ; जसें— **वर, खालीं, पुढें, मागें, नंतर, पूर्वी, कडे, समोर, मध्यें, सभोंवतां,** इ०.

हीं अव्ययें ओळखायाची मुख्य खूण हीच आहे कीं ज्या नामांशीं यांचा योग होतो त्यांचीं यांच्या योगानें सामान्यरूपें होत असतात.

वर लिहिलेल्या शिवाय आणखी कित्येक शब्दयोगी अव्ययें सांगतों.

बाहेर, मध्यें, आंत, ठायीं, कडे, मुळें, करून, कडून, करवीं, पासून, प्रत, करितां, जवळ, पाशीं, अलिकडे, पलिकडे, पावेतों, पर्यंत, बद्दल, ऐवजीं, प्रमाणें, सन्निध, सन्निकृष्ट, साठीं, स्तव, सह, सहवर्तमान, इ०.

५३२ यांत **पावेतों, पर्यंत,** इ० कित्येक शब्दयोगी अव्ययांच्या योगानें ज्या शब्दांशीं यांचा योग असतो त्यांचीं सामान्य रूपें निरंतर होत नाहींत ; जसें—'दोन महिने पावेतों', 'चार दिवस पर्यंत', 'सकाळ पर्यंत', इ०.

५३३ यांतून स्थलवाचकां वरून **ऊन** प्रत्यय लाविला ह्मणजे अपादानपूर्वक गत्यर्थवाचक शब्दयोगी अव्ययें होतात; जसें—**वरून, खालून, इकडून, तिकडून,** इ०.

५३४ या शब्दयोगी अव्ययां वरून **चा** आणि **ला** हे लिंगभेदेंकरून प्रत्यय लागले असतां 'तदधिकरणसंबंधी' अशा अर्थीं विशेषणें होतात ; जसें—**वरचा, पुढला, पलिकडची, अलिकडली, मागचे, समोरलें,** इ०.

५३५ विकल्पें या शब्दयोगी अव्यया वरून **ईल** प्रत्यय होऊनहि अशा अर्थीं विशेषणें होतात; जसें—**पुढील**

22*

धोरण, **मागील** वहिवाट, **आंतील** वर्तणूक, **बाहेरील** डौल, इ०.

परंतु हा प्रत्यय प्राकृत शब्दां वरूनच होतो; **समीप, सन्निध, सन्मुख,** आदिकरून संस्कृत शब्दां वरून होत नाहीं.

५३६ या शब्दयोगी अव्ययां मध्यें **शुद्ध शब्दयोगी** अव्यय ह्मणून एक आणखी उपभेद आहे. या शुद्ध शब्दयोगी अव्ययांचा प्रयोग शब्दां वांचून नुसता कधींच होत नाहीं, व तीं नुसतीं उच्चारिलीं असतां केवळ निरर्थक होतात; परंतु कोणत्याहि शब्दा पुढें योजिलीं असतां त्यां पासून कोठें व्यावृति, कोठें संग्रह, कोठें अवधारण, इत्यादि अर्थ गम्यमान होतात ; आणखी या शुद्ध शब्दयोगी अव्ययांच्या योगानें ज्या शब्दाशीं यांचा योग होतो त्याचें सामान्यरूप होत नाहीं. हीं अव्ययें—**च, हि, ना, देखील, देखीत, पण, मात्र,** इ०. उ०—'तूंच ये', अ० 'तूं मात्र ये', ह्मणजे तुझ्या बद्दल अ० तुझ्या बराबर इतरांस आणूं नको; एथें इतरांची व्यावृति होत्ये. 'तूंहि ये', ह्मणजे आणखी येतील त्यांत तूं पण ये, एथें संग्रह उपलब्ध होतो ; यांत **च, मात्र,** यांचा प्रयोग सर्व जातींच्या शब्दांशीं होतो ; जसें—'तूं जाच', 'तो हळूच चालत्ये', 'तो गोळा वाटोळाच आहे', 'तूं इतकें मात्र बोल', इ०. 'तूं जातोसना'? ह्म० तूं जातोस कीं नाहीं? असा प्रश्न; 'तूंना जातोस'? ह्म० तूं जातोस किंवा आणखी कोणी जातो?

यांत **च** वर्जून अर्थास अनुकूल पडल्यास इतरांस क्रियाविशेषणें मानिलें तरी चिंता नाहीं असें मला वाटतें.

## विभाग ४.

### केवलप्रयोगी अ० उद्गारवाची अव्यय.

५३७ जीं अव्ययें वाक्यांत असतां ज्यां वरून वक्त्याचे अथवा सांगणाराचे हर्षशोकादि जे मानसिक विकार अथवा उद्गार यांचा उद्बोध होतो, त्यास **केवलप्रयोगी** अ० **उद्गारवाची** अव्ययें ह्मणतात.

यांत—धिक्कार, दुःख, हर्ष, उत्कर्ष, इत्यादि मानसिक विकार दाखविणारीं अव्ययें सांगतों.

### उद्गारवाचीं अव्ययें.

धिक्कार ............छिः, थू, उंः, अंः, इ०
दुःख ............ उंः अंः, आईआई, इ०
हर्ष..............आहा, वाः, काय मौज! इ०
धन्यता............ वाहवा, शाबास, भले, इ०
आर्जव............ जी.

संबोधनीं जीं उद्गारवाचीं अव्ययें तीं लिंगवचनानुसंधानानें असतात.

| लिंग | एकव | अनेकव |
|---|---|---|
| पुल्लिंग | अरे, रे, अगा, अजि. | अहो, हो, अगा, अजि. |
| स्त्रीलिंग | अगे, गे, अगो, गो, ग. | |

एकाद्या समयीं सर्व वाक्याचें वाक्य उद्गाराच्या अर्थी येतें, तऱ्हां संक्षेपानें व्याकरण करणें झाल्यास त्या सर्व वाक्यास या अव्ययांत टाकिलें तरीं चिंता नाहीं; उ०—'**विष्णवेनमः** तुह्मीं त्याची गोष्ट मज जवळ बोलूं नका', '**तथास्तु** महाराज, आतां आपण यावें'.

५३८ कधीं कधीं या अव्ययाचा प्रयोग नामा सारिखाहि करितात ; उदाह०—'काल शाळेंत रामाची वाहवा झाली', 'गोपाळाची छीथू तुह्मीं ऐकिली असाल', इ०.

केव्हां केव्हां संबोधनीं नामाचीं रूपें असतां त्यांचा या केवलप्रयोगी अव्यया प्रमाणें प्रयोग करितात; जसें--हरहर! शिवशिव! नारायण!

५३९ या शिवाय आणखी कित्येक शब्दांचा प्रयोग शुद्ध वाक्यालंकारार्थ अथवा पादपूरणार्थ होतो, असे शब्द या भाषेंत बरेच आहेत ; ते असे कीं—**आपला**, **बेटा**, **बेटें** **परता**, **मग**, इ०. उदाह०—'तो आपला कांहीं तरीं बोलतो', 'मग बेटें असें झालें', 'तूं जाईसना परता'.

## खंड ४.

## साधितशब्दविचार.

५४० एथपर्यंत, मूळ प्रकृतीस अथवा साधितांस विभक्त्यादि प्रत्यय लागून जीं जीं शब्दसिद्धिरूप कार्यें होतात, तद्विषयक प्रकरणाचें विवेचन झालें. आतां मूळच्या सिद्धशब्दां वरून साधित जे इतर शब्द त्यांचा व्युत्पत्ति प्रकार एथें संक्षेपरूपानें वर्णन करितों.

५४१ साधितें दोन प्रकारचीं आहेत; एक धातूं वरून अथवा क्रियापदां वरून साधलेले जे शब्द तीं, यांस संस्कृतांत **कृदंत** ह्मटलें आहे, परंतु एथें **धातुसाधित** ह्मटलें आहे ; आणि एक धातुव्यतिरिक्त शब्दां वरून साधलेले जे शब्द तीं ; यांस संस्कृतांत **तद्धित**, परंतु एथें **शब्द** **साधितें** ह्मटलें आहे.

# भाग १.

## धातुसाधितें.

५४२ धातूं वरून अथवा क्रियापदा वरून साधलेले जे शब्द त्यांत मुख्य तीन भेद आहेत ;—नामें, विशेषणें, आणि अव्ययें. हीं त्यांच्या त्यांच्या प्रत्ययांच्या अनुक्रमानें एथें सांगतों.

क्रियापदांचे जे मूलधातु तींच केव्हां केव्हां धातुसाधित नामें होतात; जसें—**मार**, **तोड**, **रड**, **धांव**, **आदळ**, **उकड**, **उघड**, **खुरखूर**, इत्यादि. उदाह०—'त्याचा **मार** कठीण', 'त्या गोष्टीची कांहीं तरी **तोड** करायाची होती', 'ही **रड** माझ्यानें ऐकवत नाहीं'; इ०.

**आ**——क्रियेक धातूं वरून कर्मार्थी व भावार्थी हा आप्रत्यय लागतो ; ह्मणजे मूलधातुरूप जे शब्द त्यांस आकारान्त केल्यानें जीं धातुसाधित नामें होतात, त्या पासून कर्म, भाव, हे अर्थ निष्पन्न होतात; जसें— **ठेवा**, **ठेंचा**, **भरडा**, **भरणा**, **लेखा**, **वेढा**, **झगडा**, **झिडकारा**, इ०.

**आऊ**——तीं तीं क्रिया करायास योग्य अथवा शक्य, अशा अर्थी त्या त्या धातू वरून हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात; जसें— **पाळाऊ**, **जळाऊ**, **टाकाऊ**, **विकाऊ**, **शिकाऊ**, इ० **पाळाऊ** ह्म० पाळायास योग्य, **जळाऊ**, ह्मणजे जळायास योग्य अथवा शक्य इ०.

इ ——— कोठें मूलधातुरूप जे शब्द त्यांस ईकारान्त केल्यानें धातुसाधित नामें होतात; जसें—**उडी, बुडी, खाई, थुंकी, थापी, थापटी**, इ०.

ईव ——— तीं तीं क्रिया ज्यां वर घडली आहे ते पदार्थ विवक्षित असतां मूलधातू वरून हा प्रत्यय होतो ; जसें—**सोलींव, कोरींव, घोटींव, कांतींव, पेरींव, भरडींव**, इ०.

ऊ ——— **खा, गा**, इ० कित्येक आकारान्त धातूं वरून हा प्रत्यय होऊन धातुसाधित नामें होतात ; जसें—**खाऊ, गाऊ**, * इ०.

मूळ धातू वरून कर्त्रर्थी हा प्रत्यय केला असतां धातुसाधित विशेषणें होतात; जसें—**भरू, काढू, मारू, खाऊ**, इ० ; परंतु हीं धातुसाधित विशेषणें बहुधा निरंतर तत्तत्कर्मवाचक नामांशीं जोडलीं असतात ; जसें—**पोटभरू, गरजकाढू, मनमारू, भाजीखाऊ**, इ०. क्वचित् या ऊकारान्त धातुसाधितांस पुढें आणखी विनोदार्थ **बा, जी**, हे शब्द लाऊन धातुसाधित नामें करितात ; जसें— **देऊबा, घेऊबा, घेऊजी, देऊजी**, इ०.

ऊं ——— भावार्थी हा प्रत्यय कित्येक धातूं वरून होऊन धातुसाधित नामें होतात ; जसें—**हंसूं, रडूं**. इ०.उदाह०—‘त्यास हंसूं आटोपेना’, ‘या काळीं तिला रडूं आलें’, इ०, परंतु या

*तान्ह्या मुलांस पाळणा हालवितांनां जें गाणें गातात तें.

धातुसाधितनामांस प्रथमे शिवाय इतर विभक्ति लागत नाहींत.

सर्व धातूं वरून निमित्तार्थी हा प्रत्यय होऊन धातूसाधित अव्ययें होतात; जसें—**करूं**, **बोलूं**, **सांचवूं**, **देववूं**, **हंसवूं**, इ०.

**ऊन**——— एक क्रिया घडून दुसऱ्या क्रियेची विवक्षा असतां ज्या क्रियेस अन्य क्रियेची अपेक्षा आहे तिच्या मूलधातू वरून हा प्रत्यय होऊन पूर्वकालवाचक धातुसाधित अव्यय होतें; जसें—**मारून**, **बोलून**, **चालून**, **ह्मणून**, इ०. उदाह०— 'तो मला मारून गेला,' एथें मारणें ही क्रिया पहिली घडून तदनंतर जाणें ही क्रिया घडली असा अर्थ.

या धातुसाधितां पासून कार्यकारणभावाचाहि बोध होतो; जसें—'तो खाऊन माजला', 'पिऊन मस्त झाला', इ०. एथें **खाऊन**, **पिऊन**, ह्मणजे खाण्या मुळें, पिण्या मुळें, असा अर्थ.

क्रियेस अवधि करून तेव्हां पासून काळगणना कर्तव्य असतांहि या **ऊन**प्रत्ययान्त धातुसाधितांचा प्रयोग करितात; उ०—'मला ही पोथी लिहून दहा वर्षें झालीं', 'त्याला मरून एक युग गेलें', इ०.

रड, हंस, इ० कित्येक धातूं वरून भावार्थी हा प्रत्यय होऊन नामें होतात; जसें—**रडें**, **हंसें**, इ०.

**का** ——— मार, रड, फाट, इ० कित्येक धातूं वरून कर्त्रर्थी अतिशयार्थी हा प्रत्यय होऊन विशेषणें व नामें होतात; जसें—**मारका, रडका, फाटका,** इ०. उदाह०— 'ही मोठी मारकी पोरगी आहे', 'या मारक्याच्या वाटेस जाऊं नको', इ० **फाटका; तुटका, मोडका** ह्मणजे फाटलेला, तुटलेला, मोडलेला.

**ण** ——— बहुतेक धातूं वरून भाव, कर्म, करण, अधिकरण, योग्यता, इत्याद्यर्थी हा प्रत्यय होऊन धातुसाधित नामें सिद्ध होतात; जसें—**तारण, पोषण, भांडण,** इ० भावार्थ; **दळण, नेसण, चाटण,** इ० कर्मार्थ; **चाळण, झाडण, कालवण,** इ० करणार्थ; **दडण, लवण, चढण,** इ० अधिकरणार्थ. समयविशेषीं एका शब्दाच्या ठायीं हे अनेक अर्थ संभवतात; जसें—दळण, कांडण, घुसळण, इ०. उदाह०— 'सखूचें दळण चांगलें', एथें दळण ह्मणजे दळण्याचा व्यापार; 'आज तुझें दळण जाड आलें', एथें दळण ह्मणजे दळलेलें जें तें; 'इतकें दळण आज कोण दळील', एथें दळण ह्मणजे दळायाचें अथवा दळायास योग्य जें तें.

**णा** ——— कित्येक धातूं वरून भावार्थी अथवा कर्मार्थी अथवा करणार्थी हा प्रत्यय होतो; जसें—**भरणा, नितळणा**; जसें—'या गोसांव्या पाशीं आर्यांचा भरणा फार आहे', 'याणें सर-

कारांत ऐवजाचा भरणा केला', इ० कित्येक मूळ संस्कृत धातूं वरून जो स्त्रीलिंग प्रत्यय लागून **ना** होतो त्याच्या ठिकाणीं मराठींत पूर्वोक्त अर्थी **णा** प्रत्यय होतो; जसें— **हेळणा, छळणा, तुळणा**, इ०.

**णाऊ**—— हा प्रत्यय बहुधा ती ती क्रिया करायास योग्य अथवा शक्य जो पदार्थ त्याच्या अर्थी होतो; जसें—**ठेवणाऊ, खाणाऊ**, इ०.

**णार**—— सर्व धातूं वरून भविष्यार्थी हा प्रत्यय होऊन कोठें क्रियापदें होतात, व कोठें नामें होतात; जसें—**जाणार, येणार, निजणार**, इ०. उदाह०—'मीं उद्यां तेथें जाणार', 'तुह्मीं आलेत तर तोहि तेथें येणार', इ० वाक्यांत **जाणार, येणार**, हीं भविष्य काळाचीं क्रियापदें जाणावीं. परंतु 'तुह्मीं पानें वाढिलींत परंतु जेवणार कोठें आहेत?' 'एक जोडणार आणि पन्नास खाणार', 'मारणाराचा हात धरवेल परंतु बोलणाराचें तोंड धरितां येत नाहीं', इत्यादि वाक्यांत हीं **णार**प्रत्ययान्त नामें जाणावीं.

**णारा** —— सर्व धातूं वरून कर्त्रर्थी हा प्रत्यय होऊन बहुधा धातुसाधित विशेषणें होतात; जसें—**बोलणारा, हंसणारा, खाणारा, घेणारा देणारा**, इ० विशेषणें होत. उ०—'मासे खाणारीं माणसें', 'फिरणाऱ्या गाई', 'या गलब्या

वर चढणारे उतारू कोठे आहेत', इत्यादि वाक्यांत णाराप्रत्ययान्त जे शब्द ते विशेषणें जाणावीं.

**णी**——— बहुतेक धातूं वरून—भाव, कर्म, करण, इत्याद्यर्थीं हा प्रत्यय होऊन धातुसाधित नामें होतात; जसें—**करणी**, **पाहणी**, **राखणी**, **पेरणी**, **पुरवणी**, **लाटणी**, **लेखणी**, **चाळणी**, **लावणी**, **तासणी**, इ०.

**णूक**——— कित्येक धातूं वरून—भाव, कर्म, इत्याद्यर्थीं हा प्रत्यय होऊन धातुसाधित नामें होतात; जसें—**नाचणूक**, **वर्तणूक**, **नांदणूक**, **ठेवणूक**, **नेमणूक**, इ०.

**णें**——— सर्व धातूं वरून धात्वर्थसूचक हा प्रत्यय होतो ; जसें—**बोलणें**, **हंसणें**, **बसणें**, **उठणें**, इ०. तसेंच भाव, कर्म, करण, इत्याद्यर्थींहि हा प्रत्यय होतो; जसें—**नाचणें**, **बोलणें**, **लिहिणें**, **खेळणें**, **बाधणें**, इ०.

**त**——— सर्व धातूं वरून हा प्रत्यय होऊन वर्तमानकालवाचक धातुसाधित अव्ययें होतात ; जसें—**जात**, **नाचत**, **ठेवित**, **करित**, इ०.

**पढ**धातूचा गण वर्जून अकारान्त सकर्मक धातूंस हा प्रत्यय लागतांना मध्यें **इ** आगम होतो ; जसें-**करित**, **मारित**, **ठेवित**. (पाहा पृ० २४३, ले० ४९९.)

**ता**——— सर्व धातूं वरून कर्त्रर्थीं हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात ; जसें—**रडता**, **हंसता**, **जाता**, **येता**; 'रडती पोरगी',

'करता मनुष्य', 'रांगतें मूल', 'अडपती नाहीं सासू दडपता नाहीं भावा', इ०.

प्रयोजक धातू वरून हा प्रत्यय होत असतां मध्यें इ आगम होतो; जसें—**करविता, ठेवविता** इ०.

> शाळुंकी ते कैशी बोले मंजुळवाणी
> शिकविता धणी वेगळाची—तुकाराम.

**तां**—— अन्यक्रियासापेक्षत्व असतां सर्व धातू वरून हा प्रत्यय होऊन धातुसाधित अव्यय होतें; (एथेंहि तप्रत्ययान्त धातुसाधिता प्रमाणें इ आगमाचा नियम जाणावा.) जसें— **जातां, येतां, घेतां, अंगीकारितां, ठेववितां,** इ०.

**तांनां**—— सर्व धातू वरून **तां**प्रत्ययार्थी हाहि त्याच नियमानें प्रत्यय होतो; जसें—**खातांनां, जातांनां, सांगतांनां, भरवितांनां,** इ०.

या शिवाय आणखी कित्येक धातू वरून पूर्वोक्त व इतर अर्थी असाधारण असे अनेक प्रत्यय होऊन अनेक शब्द सिद्ध होतात, त्यांची गणना एथें कोठवर करावी; परंतु हीं जी एक दिशा दाखविली इज वरून बुद्धिमानांनीं धातू वरून शब्द कसकसे व्युत्पन्न होतात हें जाणावें.

## भाग २.

### शब्दसाधितें.

५४३ धातु अथवा क्रियापद यां व्यतिरिक्त जे शब्दाचे प्रकार त्यांस **शब्द** असें एथें संज्ञार्थ ह्मटलें आहे.

होतो ; जसें—**दर्शनीय**, **प्रेषणीय**, **रक्षणीय**, **भक्षणीय**, इ०.

हा मूळचा संस्कृतांतील भविष्यकालवाचक आणि कर्त्रर्थवाचक **अनीयर्** प्रत्यय जाणावा. या खेरीज आणखी-**महेंद्रीय**, **वत्सीय**, **पर्वतीय**, इ०. 'तत्संबंधी' अशा अर्थीं प्रत्यय लागून जीं रूपें होतात, तीं मूळचीं संस्कृतांत छप्रत्ययान्त जाणावीं.

**ईल**——— शब्दयोगी अव्ययां वरून 'तत्प्रदेशसंबंधी' या अर्थीं हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात ; जसें—**वरील**, **पुढील**, **मागील**, **तेथील**, इ०.

**क**——— 'तें करितो तो' अशा अर्थीं संस्कृत शब्दां वरून हा प्रत्यय होतो ; जसें—**गुणक**, **बाधक**, **रोचक**, **मोहक**, इ०.

**कर** ——— 'तें करितो तो' या अर्थीं हा प्रत्यय होतो ; जसें—**खोडकर**, **विणकर**, इ०. 'त्या त्या गांवचा राहणारा' अशा अर्थीं ग्रामवाचक नामां वरून हा प्रत्यय होतो ; जसें—**पंढरपूरकर**, **काशीकर**, **पुणेकर**, **बडोदेकर**, इ०

**करी**——— 'तो तो व्यापार करणारा,' अथवा 'त्या त्या स्थळीं राहणारा,' अशा अर्थीं कित्येक शब्दां वरून हा प्रत्यय होतो ; जसें—**मारेकरी**, **भाडेकरी**, **साठेकरी**, **गांवढेकरी**, इ०.

अकारान्ता शिवाय इतर शब्दां पुढें हा प्रत्यय होत असतां अंत्यस्वरास ए आदेश होतो.

**की**——— कित्येक शब्दां वरून 'भाव, अथवा

धंदा' या अर्थीं हा प्रत्यय होतो; जसें—
**पाटीलकी, सोनारकी, झारकी**, इ०.

**खोर**——— 'ती ती खोड अ० व्यसन ज्यास आहे' अशा अर्थी त्या त्या शब्दां वरून हा प्रत्यय होतो; जसें **दारूखोर, भांडखोर, कज्ज्याखोर**, इ०.

हा मूळचा फारशी **खुर्दन** (खाणें) या धातू वरून व्युत्पन्न झालेला प्रत्यय होय; याचा अर्थ **खाणारा**.

**गिरी** — कित्येक शब्दां वरून भावार्थी हा प्रत्यय होतो; जसें—**गुलामगिरी, लुच्चेगिरी**, इ०

**चा ची चें.** शब्दयोगी अव्यया वरून, आणि स्थलवाचक व कालवाचक क्रियाविशेषण अव्यया वरून हे प्रत्यय 'तत्प्रदेशसंबंधी', अथवा 'तत्कालभूत' अशा अर्थी लिंगवचन परत्वें होतात; जसें—**वरचा, खालचा, तेथचा, एथचा, परवांचे, आजची, उद्यांचें**, इ०.

आतां एथें अंगांगीभावसंबंध नसतां नामां वरून हे प्रत्यय होऊन जीं रूपें साधतात तींहि याच प्रमाणें विशेषणें होतात; जसें—**हातचा, मूळची, पोटचें, दोन वर्षांचा, पांच हातांचा** इ०. परंतु या प्रकारचीं विशेषणें आणि षष्ठ्यन्त नामें यांचा भेद कोंठें कोंठें अर्था वरून जाणावा लागतो.

आणखी जेथें षष्ठी विभक्ति होऊन तिज वरून इतर विभक्तिप्रत्यय होतात, तेथेंहि ते षष्ठ्यन्त शब्द शब्दसाधितें मानावीं; जसें—**त्याच्या** पासून, **तुमच्यांत**, '**घरच्यांनीं** उपाशीं मरावें आणि **दारच्यांनीं** मौजा माराव्या', इ०

स्थळीं, **त्याचा, तुमचे, घरचीं, दारचीं,** हीं शब्दसाधितें जाणावीं.

परंतु एथें शिकणारांनीं एक गोष्ट पक्केपणी लक्षांत ठेवावी कीं सर्वनामां वरून जेथें स्वार्थी अशीं रूपें होतात, तेथें त्यांस शब्दसाधितें मानूं नये.—**माझ्याहून, तुझ्याशीं, त्यांच्यांत**, इ० रूपें जेव्हां **मजहून, तुझ्याशीं, त्यांत**, अशा अर्थी असतात, तेव्हां हीं त्या त्या सर्वनामाचीं त्या त्या विभक्तीचीं रूपें मानावीं. परंतु जेथें **माझ्याहून, तुझ्याशीं, त्यांच्यांत**, यांचा 'मदीय जो कोणी त्या हून', 'त्वदीय जो कोणी त्याशीं', 'तदीय जे कोणी त्यांच्या ठायीं', अशां अर्थाची उपलब्धि असल्ये तेव्हां यांस शब्दसाधितें मानून त्यां वरून ती ती विभक्ति मानावी.

**ट** —— कित्येक प्राकृत शब्दां वरून ईषदर्थी हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात ; परंतु हा प्रत्यय होत असतां अंत्यस्वरास **अ** आदेश होतो ; जसें—**पिंवळट, हिरवट, कडवट, खारट, मळकट**, इ०.

**डा** —— धंदा अथवा व्यवहार करणारे जे त्यांचे वाचक जे शब्द त्यां वरून कुत्सितार्थी हा प्रत्यय होतो ; जसें—**म्हारडा, न्हावडा, सुतारडा, सोनारडा**, इ०.

**भट** आणि **शिंपी** यांचे कुत्सितार्थी **भटोरा, भटुरडा, शिंपुरडा**, असे शब्द होतात.

**त्व** —— संस्कृत शब्दां वरून भावार्थी हा प्रत्यय होतो ; जसें—**ब्राह्मणत्व, गुरुत्व, लघुत्व, द्विजत्व, मनुष्यत्व**, इ०.

**ता** —— पूर्वोक्त अर्थी संस्कृत शब्दां वरून हाहि

प्रत्यय होतो; जसें—**लघुता, मधुरता, आम्लता, कटुता,** इ०.

**दां**——— 'अमुक वेळां' असा अर्थ विवक्षित असतां तत्तत्संख्यावाचकां वरून हा प्रत्यय होतो; जसें—**एकदां, दोनदां, शंभरदां,** इ०.

**दार**——— 'तें राखतो तो' या अर्थीं कित्येक प्राकृत व फारशी शब्दां वरून **हा** प्रत्यय होतो; जसें—**चोबदार, पोतदार, दुकानदार, हावलदार,** इ०.

हा मूळचा **दश्तन्** (राखणें) या फारशी धातू वरून व्युत्पन्न झालेला प्रत्यय होय; याचा अर्थ **राखणारा.**

**नीस, नवीस**— 'तें लिहिणारा' अथवा 'तो अधिकार चालविणारा', या अर्थीं कित्येक शब्दां वरून हा प्रत्यय होतो; जसें—**चिटनीस** अ० **चिटनवीस, फडनीस** अ० **फडनवीस, पोतनीस** अ० **पोतनवीस, दफतरनीस** अ० **दफ्तरनवीस,** इ०.

हा मूळचा **निविश्तन्** (लिहिणें) या फारशी धातू वरून व्युत्पन्न झालेला प्रत्यय होय; याचा अर्थ **लिहिणारा.**

**पट**——— संख्यावाचकां वरून गुणत्वार्थी हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात; जसें—**एकपट, दुप्पट, तिपट, चौपट,** इ०. (पहा पृ० १४७, ले० ३५९.)

**पण-पणा**— 'भावार्थी सर्व प्राकृत शब्दां वरून हा प्रत्यय होतो'; जसें—**बरेपण-णा, खरेपण-णा, माणूसपण-णा, बायकोपण-णा,** इ०.

**मंत-मान्**— 'तें ज्यास आहे' या अर्थी संस्कृत शब्दां वरून त्या भाषेच्या नियमा प्रमाणें हे प्रत्यय होऊन विशेषणें होतात ; यांत **मान्** हा शुद्ध संस्कृत प्रत्यय आणि त्याचाच प्राकृत **मंत**, जसें— **श्रीमंत**, **बुद्धिमंत**, **श्रीमान्**, **बुद्धिमान्**, इ०. संस्कृतांत स्त्रीलिंगी **मती** हा प्रत्यय होतो ; जसें—**बुद्धिमती**, **श्रीमती**, इ०. परंतु प्राकृतांत बुद्धिमान् स्त्री असेंच ह्मणतात.

**या** ——— 'तें ज्यास आहे' असा अर्थ असून कुत्सितार्थाची विवक्षा असतां, अथवा 'तो नाद अ० व्यसन ज्यास आहे', अशा अर्थाची विवक्षा असतां, नामावरून हा प्रत्यय होतो ; जसें—**दम्या**, **खोकल्या**, **धाप्या**, **बायक्या**, इ०

**भांग्या** याच्या इतर लिंगांचीं रूपें आकारान्त विशेषणाच्या रूपा प्रमाणें ईकारान्त आणि एकारान्त होतात; जसें—**भांग्या**, **भांगी**, **भांगें**, याचप्रमाणें—**धांदल्या**, **धादली**, **धांदलें**, इ० आणखी शब्द जाणावे.

**रा** ——— **लाज**, **खाज**, इ० कित्येक शब्दां वरून 'तें ज्यास अतिशय आहे' अशा अर्थी हा प्रत्यय होऊन साधित नामें आणि विशेषणें होतात ; जसें—**लाजरा**, **खाजरा**, इ०.

**ला** ——— स्थलवाचक क्रियाविशेषण अव्ययें व शब्दयोगी अव्ययें यां वरून 'तत्प्रदेश-

संबंधी' या अर्थी लिंगवचनपरत्वें हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात, परंतु अंत्यस्वरास अ आदेश होतो ; जसें—**तेथला**, **एथला**, **जेथला**, **वरली**, **खालली**, **पुढले**, **मागले**, इ०.

**वट**—— 'तत्संबंधी'या अर्थी, अथवा 'ईषदर्थी' कित्येक शब्दां वरून हा प्रत्यय होतो ; जसें—**रानवट**, **भोळवट**, **कडवट**, इ०.

**वंत–वान्**– अकारान्त संस्कृत शब्दां पुढें **मंत** आणि **मान्** प्रत्यय लागत असतां **म**च्या स्थानीं **व** आदेश होतो, असा बहुधा नियम आहे ; जसें—**यशवंत**, **जयवंत**, **द्रव्यवान्**, **धर्मवान्**, इ०. स्त्रीलिंगीं संस्कृतांत **वती** हा प्रत्यय होतो ; जसें—**पुत्रवती**, **सौभाग्यवती**, इ०. यांत **वान्** हा संस्कृत आणि **वंत** हा प्राकृत प्रत्यय जाणावा.

**वार**—— फारशी शब्दां वरून 'तें ज्यांत आहे', अशा अर्थी हा प्रत्यय होतो ; जसें—**सरफेवार**, **किफायतवार**, **बयादवार**, **तपसीलवार**, इ०.

**वाणा**—— स्वार्थी, सादृश्यार्थी, आणि कोठें 'ईषदर्थी', कित्येक शब्दां वरून हा प्रत्यय होतो ; तेव्हां **लाजरा**, इ० कित्येक शब्दांच्या उपांत्यास इ आदेश होतो ; जसें—**गरीबवाणा**, **बापुडवाणा**, **लाजिरवाणा**, **गोजिरवाणा**, इ०.

**वाला** —— 'तें ज्यास आहे', अथवा 'त्याचा जो धंदा करितो', अशा अर्थी हा प्रत्यय होऊन शब्दसाधित नामें होतात ; जसें— **दुकानवाला, घरवाला, लेंकुरवाला, आंबेवाला, तेलवाला, भाजीवाला,** इ०.

**सर** —— कित्येक शब्दां वरून ईषदर्थी हा प्रत्यय होतो ; जसें—**काळसर, लालसर, भोळसर,** इ०.

**सा** —— बहुधा सर्व विशेषणां वरून अथवा नामां वरून ईषदर्थी व समानार्थी हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात ; जसें—**ल्हानसा, पिंवळीशी, काळेंसें, ब्राह्मणसा, थोडेंसें** इ०.

**सा** हें प्रत्यय **असा** याचें संक्षिप्त रूप होय; हा प्रत्यय विशेष्याच्या लिंगवचनानुरूप होतो.

५४५ मराठींत कित्येक शब्दांशीं कित्येक शब्दांचा सामासिक योग होत असतां त्यांत उत्तर शब्दांच्या स्थानीं तत्तदर्थवाचक प्रत्यय होऊन एक जातीचे साधितशब्द सिद्ध होतात ; ते असे—

**पाणीं** या शब्दाच्या स्थानीं 'त्याचें जें पाणीं' या अर्थी कित्येक मराठी शब्दां वरून **वणीं** हा प्रत्यय होऊन शब्दसाधितें सिद्ध होतात ; जसें—**चिंचवणीं, सालवणीं, नाकवणीं, गुळवणीं,** इ०.

तेल या शब्दांच्या स्थानीं 'त्याचें जें तेल' या अर्थी ज्या पदार्थांतून तेल निघतें त्या पदार्थाचा वाचक अशा मराठी शब्दा वरून (अंत्यस्वराच्या स्थानीं )**एल** हा प्रत्यय

होऊन कित्येक शब्दसाधितें सिद्ध होतात; जसें—**धुपेल, तिळेल, खोबरेल, एरंडेल, मोगरेल,** इ०.

**घाण** या शब्दाच्या स्थानीं 'त्याची जी घाण' या अर्थीं कित्येक शब्दां वरून (अंत्यस्वराच्या स्थानीं) **आण** व कोठे कोठे मूळ शब्दास **टाण** हे प्रत्यय होऊन शब्द-साधितें सिद्ध होतात; जसें—**आंबटाण, करपटाण, कुजटाण, तेलटाण, आंबट्टाण, तेलट्टाण,** इ०.

५४६ या शिवाय आणखी एकदेशीय असे अनेक प्रकारचे प्रत्यय होऊन शब्दसिद्धी होत्ये, जसें—**डोळस, कानपिशा, गांवठी, खोलगट, पाणचट, धुपट, पाणवठा, दिवठाण,** इ०.

५४७ 'त्या त्या क्रियेचें अथवा व्यापाराचें मोल अ० मजुरी' या अर्थीं **ण**प्रत्ययान्त अथवा **णें**प्रत्ययान्त धातुसाधित नामां वरून **आवळ** प्रत्यय होऊन साधितशब्द होतात; जसें— **खाणावळ, दळणावळ, लिहिणावळ, घडणावळ,** इ०.

५४८ कित्येक शब्दां वरून 'ती ती क्रिया करितो' या अर्थीं धातुसाधित प्रत्यय होऊन एक जातीचीं साधित नामें होतात; जसें— **पोटभरू, भाडखाऊ, गरजकाढू, वाघमाऱ्या, भाजिविक्या, लांकूडतोड्या, कळलाव्या, मासरांध्या, धोतरबडव्या,** इ०.

५४९ या शिवाय आणखी मराठी मध्यें शब्दसाधितांचा मोठा भरणा संस्कृत शब्दां वरून संस्कृत प्रत्यय अथवा शब्द लागून होतो. या विषयीं जर यथाक्रम संपूर्ण व्याख्यान करूं लागलों तर बहुधा संस्कृत व्याकरणांतील सर्व तद्धितप्रकरण घेतलें पाहिजे; यास्तव संक्षेपरूपें करून

जितके व्यवहारप्रसिद्ध संस्कृत शब्द या भाषेंत मिश्र आहेत, अथवा केव्हां केव्हां प्रत्यय अथवा शब्द लावून साधावे लागतात, त्यांचेंच खालीं ग्रहण केलें आहे. 'तें ज्यास आहे', 'तेणेंकरून युक्त', अथवा 'तेणेंकरून पीडित', इत्याद्यर्थी संस्कृत शब्दांशीं—**अन्वित, आकुल, आक्रांत, आतुर, आपन्न, आवह, आविष्ट, ग्रस्त, शाली,** हे शब्द जोडून शब्दसाधितें होतात; जसें—**क्रोधान्वित, भयाकुल, तृषाक्रांत, कामातुर, दुःखापन्न, सुखावह, लोभाविष्ट, रोगग्रस्त, भाग्यशाली, दैवशाली,** इ०.

**गुण-गुणित**— सर्व संस्कृत संख्यावाचकां वरून आवृत्यर्थी हा प्रत्यय होऊन विशेषणें होतात; जसें-**एकगुण-गुणित, द्विगुण-गुणित त्रिगुण-गुणित, चतुर्गुण-गुणित,** इ०.

**युक्त**— 'तेणेंकरून युक्त' अशा अर्थी त्या त्या शब्दां पुढें हा शब्द लागून शिवेषणें होतात; जसें—**गुणयुक्त, भययुक्त, संशययुक्त, शर्करायुक्त,** इ०.

**रूप**— 'सादृश्यार्थी' अथवा 'स्वार्थी' कित्येक शब्दां पुढें हा शब्द लागून साधित विशेषणें होतात; जसें—**दोषरूप, संकटरूप, ब्रह्मरूप, भवरूप,** इ०.

**अतिरिक्त-रहित-विरहित-व्यतिरिक्त-शून्य-हीन.** तत्तदर्थाची व्यावृत्ति असतां त्या त्या शब्दांशीं या शब्दांचा योग होऊन विशेषणें व क्रियाविशेषणें होतात; जसें-**ज्ञानातिरिक्त, विद्यारहित, धर्मविरहित, कर्मव्यतिरिक्त, ज्ञानशून्य, बुद्धिहीन, मतिहीन,** इ०.

**स-सहित**- त्या त्या अर्थाचें साहचर्य विवक्षित असतां, अथवा 'तेणेंकरून युक्त' अथवा 'तें ज्यास आहे', अशा अर्थाची विवक्षा असतां, त्या त्या शब्दाच्या आरंभीं **स** या आगमाचा, अथवा त्याच्या शेवटीं **सहित** या शब्दाचा, योग होऊन विशेषणें अथवा क्रियाविशेषणें होतात ; जसें— **सकुटुंब, साश्रित, सदय, साकार, साकांक्ष, अलंकारसहित, व्याजरहित,** इ०.

५५० आणखी संस्कृत शब्दां वरून भावार्थीं **य** प्रत्यय होऊन भाववाचकें होतात, तेव्हां त्या त्या शब्दांतील प्रथम स्वरास वृद्धि होत्ये; जसें—मधुर—**माधुर्य**, सुंदर—**सौंदर्य**, कुरूप—**कौरूप**, ईश्वर— **ऐश्वर्य**, शीत—**शैत्य**, उदार—**औदार्य**, कृपण—**कार्पण्य**, दृढ—**दार्ढ्य**,एक—**ऐक्य**, चोर—**चौर्य**, गौण **गौण्य**, इ०.

आणखी संस्कृत शब्दां वरून 'तत्संबंधी', 'त्याचें अपत्य अ० वंश्य', 'त्या पासून उत्पन्न झालेलें', इत्याद्यनेकार्थीं ते ते प्रत्यय होऊन ते ते शब्द सिद्ध होतात; जसें—अश्वसंबंधी जें तें—**आश्व**, अरण्यसंबंधी जें तें—**आरण्य**, शरीर—**शारीर**,इंद्र—**ऐंद्र**, इंद्रिय—**ऐंद्रियक**, विष्णु—**वैष्णव**, शिव—**शैव**, शूद्र—**शौद्र**, शुंडा—**शौंड**, गृहपति— **गार्हपत्य**, केशिक—**कैशिक**, केदार—**कैदार**, गो—**गव्य**, नौ—**नाव्य** ; कुरूचा जो पुत्र तो—**कौरव**, मधु—**माधव**, गंगा—**गांगेय**, शंडिल—**शांडिल्य**, दिति—**दैत्य**, तित्तिरि—**तैत्तिरीय**, विनता—**वैनतेय**, द्रुपद—**द्रौपदी**, पुत्र—**पौत्र**, उत्स—**औत्स**, भृगु—**भार्गव**, पृथा—**पार्थ**, पृथु—**पार्थव**, पृथिवी—**पार्थिव**, केकय—

**कैकयी**, द्रोण—**द्रौणि**, व्यास—**वैयासिक**, व्याकरण—**वैयाकरण**, श्वापद—**शौवापद**, इ०.

या प्रमाणें शतावधि साधित नामें आणि विशेषणें संस्कृत व्याकरणाच्या नियमा प्रमाणें सिद्ध होतात, त्या सर्वांचा एथें विस्तार करवत नाहीं. तें सर्व यथास्थित समजायास त्या शास्त्राचें अध्ययन अपेक्षित आहे.

## भाग ३.

### सामासिकशब्दविचार.

५५१ **सामासिक** शब्द ह्मणजे दोन किंवा अधिक शब्द एकत्र जुळून त्यां पासून झाला जो एक शब्द तो; जसें—**विटीदांडू**, **साखरभात**, **देवाज्ञा**, **चक्रपाणि**, इ०. आतां पाहा कीं **विटीदांडू** एथें **विटी** आणि **दांडू** हे दोन शब्द मिळून **विटीदांडू** हा एक शब्द झाला आहे. या प्रमाणें दुसरीं उदाहरणें जाणावीं.

५५२ या मध्यें परस्परांचा जो संबंध त्यास **समास** ह्मणतात; जसें—**साखरभात**, याचा मध्यमपदलोपी समास होय.

५५३ हा समास करून दाखविण्याचा जो प्रकार त्यास **विग्रह** ह्मणतात; जसें—पूर्व उदाहरणांत—'साखरयुक्त जो भात' हा विग्रह, आणि मध्यमपदलोपी हा समास.

५५४ हे समास सात आहेत;—**द्वंद्व**, **तत्पुरुष**, **कर्मधारय**, **द्विगु**, **मध्यमपदलोपी**, **बहुव्रीहि**, आणि **अव्ययीभाव**, यांचीं लक्षणें उदाहरणां सुद्धां पृथक् पृथक् विभाग करून त्यांत दाखवितों.

## विभाग १.

### द्वंद्व.

५५५ दोन अथवा अधिक शब्दांचा संयोग होऊन मधल्या **आणि** या अव्ययाचा ज्यांत लोप होतो त्यास **द्वंद्व** समास ह्मणतात; जसें—**विटीदांडू** ह्मणजे विटी आणि दांडू तो', याच प्रमाणें-**बहीणभावंडें, बापलेक, हातपाय, ब्रह्माविष्णुमहेश, ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र,** इ० अणखी उदाहरणें.

५५६ यांत कधीं **आईबापें, दादलाबायलें,** असाहि एक प्रकार होतो, तेव्हां या शब्दाचें नपुंसक लिंग आणि अनेकवचन असतें.

५५७ मराठी भाषेंत आणखी एक द्वंद्वाचा प्रकार होतो, तो असा कीं, दोन शब्द जोडले असतां त्यां पासून तदंतर्गत आणखी तत्साधर्म्यवाचक अशा पुष्कळ शब्दांचा संग्रह होतो; यास **समाहारद्वंद्व** म्हणावें; जसें—**हातपाय** ह्मटलें ह्मणजे केवळ **हात** आणि **पाय** या दोन अवयवाचेंच ग्रहण होतें असें नाहीं, परंतु येणेंकरून इतर अवयवांचाहि संग्रह होतो. अशीं समाहारद्वंद्वघटित नामें या भाषेंत पुष्कळ आहेत, त्यांतून कांहीं सांगतों;— **भाजीपाला, कोळीमाळी, शेटसावकार, पानपत्रावळ, घरदार, देवब्राह्मण, शेतमळा, फंदफितूर, दिवानदरबार, मीठभाकर,** इ०.

[अ] पूर्व शब्दाचा अनुकरणवाचक आणखी एक शब्द कल्पून त्यास त्या शब्दाशीं जोडिलें असतां आणखी एक प्रकारचा समाहारद्वंद्व होतो; जसें—**भाकरीबिकरी, धोंडागिंडा, दगडगिगड, वाईटसाईट, लहानसहान,** इ०.

याचा आणखी एक सामान्य नियम असा आहे कीं कोणत्याहि शब्दाच्या आद्याक्षराच्या स्थानीं **बि** किंवा क्वचित् **गि** आदेश करून जो अनुकरणवाचक शब्द होतो त्याचा त्या शब्दा पुढें योग केला असतांहि या प्रकारचे सामासिक शब्द होतात; जसें—**घोडाबिडा, घरबीर***, **कागदबिगद, लेखणीबिखणी, दगडगिगड, तंटाबिंटा**, इ०. असे शब्द क्वचित् स्वार्थींहि होतात; जसें—**लेखणीबिखणी**, ह्मणजे लेखणी हाच अर्थ.

५५८ कित्येक द्वंद्वसमासघटित शब्दांमध्यें शब्दांची पूर्वापर योजना नियमित असत्ये; जो बहुमानार्थी दुसऱ्या पेक्षां अधिक मान्य तद्वाचक शब्दाची योजना प्रथम करावी लागत्ये; जसें— **आईबाप** या द्वंद्वसमासघटित शब्दांत **आई** शब्दाची योजना पूर्वीं आणि **बाप** शब्दाची योजना मागून असें बहुधा असतें; **बापआई** ह्मणायाची रूढि नाहीं. तसेंच—**बहीणभाऊ, दादलाबायको, रामलक्ष्मण, ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र**, इ०.

## विभाग २.

### तत्पुरुष.

५५९ **तत्पुरुष**—ह्मणजे उत्तर शब्द मुख्य असून पूर्व शब्दाशीं त्याचा संबंध असतो, अथवा पूर्व शब्दाचा विभक्तिसंबंध उत्तर शब्दाशीं असून त्या विभक्तीचा ज्यांत लोप होतो तो; ह्मणूनच—**द्वितीयातत्पुरुष, तृतीयातत्पुरुष**, इ०.

---

***घरबीर** एथें उपांत्याच जें दीर्घत्व झालें आहे त्याज विषयींचा नियम पुढें येईल.

द्वितीयेपासून जितक्या विभक्ति तितके बहुधा या समासाचे प्रकार होतात.

[अ] जेथें द्वितीयेचा लोप होतो तेथें त्यास **द्वितीयातत्पुरुष** ह्मणतात; जसें—**द्विजदंड**, ह्मणजे द्विजास अ० द्विजा प्रत जो दंड तो, तसेंच—**विप्रताडण**, **आर्तविमोचन**, **परपीडा**, इ०.

[आ] जेथें तृतीयेचा लोप होतो तेथें त्यास **तृतीयातत्पुरुष** ह्मणतात; जसें—**कृपावलोकन**, ह्मणजे कृपेनें, अथवा कृपेंकरून, जें अवलोकन तें, तसेंच—**दयार्द्र**, **भक्तिवश्य**, **द्रव्यसाध्य**, इ०.

[इ] जेथें चतुर्थीचा लोप होतो तेथें त्यास **चतुर्थीतत्पुरुष** ह्मणतात; जसें—**कृष्णार्पण**, ह्मणजे कृष्णा कारणें जें अर्पण तें, तसेंच—**यज्ञस्तंभ**, **पूजाद्रव्य**, **बाजारवाडा**, **पोळपाट**, **जांवईआग्रह**, इ०.

[ई] जेथें पंचमीचा लोप होतो तेथें त्यास **पंचमीतत्पुरुष** ह्मणतात; जसें—**पापविमोचन**, ह्मणजे 'पापापासून जें विमोचन तें', तसेंच—**स्वर्गपतन**, **भवतारण**, इ०.

[उ] जेथें षष्ठीचा लोप होतो तेथें त्यास **षष्ठीतत्पुरुष**, ह्मणतात; जसें—**केळफूल**, ह्मणजे 'केळीचें जें फूल तें', तसेंच—**पिंपळपान**, **राजदरबार**, **देवभक्ति**, इ०.

[ऊ] जेथें सप्तमीचा लोप होतो तेथें त्यास **सप्तमीतत्पुरुष** ह्मणतात; जसें—**स्वर्गवास**, ह्मणजे 'स्वर्गांत अथवा स्वर्गाच्या ठायीं जो वास तो,' तसेंच—**गृहप्रवेश**, **कर्मकुशल**, **शास्त्रनिपुण**, **शिल्पपाटव**, इ०.

[ऋ] मराठींत आणखी एक तत्पुरुषसमासघटित

शब्दांचा मोठा भरणा आहे, तो असा कीं ज्यांत पूर्व शब्द पुढल्या धातुसाधिताशीं कर्मकरणसंप्रदानादिकारकसंबंधानें संयुक्त असतो ; जसें—**आगलाव्या**, ह्मणजे 'आगीतें लावणारा,' यांत **आग** हें पुढल्या **लाव्या** या धातुसाधिताचें कर्म होय ; **घृतपक्क**, ह्मणजे 'घृतानें जें पक्क तें', यांत **घृत** हें **पक्क** या धातुसाधिताचें कारण होय ; याचप्रमाणें—**कंबरमोड्या, पायमळ्या, मानमोड्या, मासखाऊ, व्याजखाऊ**, इ०.

५६० प्रौढ भाषणांत अथवा लेखनांत जेव्हां सर्वनामांशीं इतर संस्कृत शब्दांचा समास करण्याचा प्रसंग येतो, तेव्हां तीं सर्वनामें संस्कृत योजावीं लागतात ; नंतर तीं संधीच्या नियमां प्रमाणें पुढल्या शब्दांशीं जुळतात. तें असें—

| **मराठी स०.** | **संस्कृत स०.** | **उदाहरणें.** |
|---|---|---|
| मीं.. .. | मत्...... | मत्कार्य, मदुद्धरण, मज्जन्म, मट्टीका, मत्तात, मन्मंन, मच्छास्त्र, इ०. |
| तूं.... .. | त्वत् ...... | त्वत्सौंदर्य, त्वल्लीला, त्वद्गुण, इ०. |
| तो, ती, तें, ते, त्या, तीं, | तत्.... | तच्चरित्र, तद्गौरव, तच्छाखा, तद्रूप, इ०. |
| आह्मीं...... | अस्मत् .. | अस्मद्भाग्य, अस्मदपराध, अस्मच्छक्ति, इ०. |
| तुह्मीं .... | युष्मत्... | युष्मत्कीर्ति, युष्मदौदार्य, युष्मन्नाम, इ०. |

| | | |
|---|---|---|
| हा, ही, हें, हे, या, हीं. | . एतत्... | एतद्देशीय, एतन्मात्र, एतच्छाखीय, इ०. |

५६१ संस्कृत नियमां प्रमाणें नामास **इन्** प्रत्यय लागून जे **ईकारान्त** शब्द होतात त्यांशीं इतर शब्दांचा संयोग होऊन जर विग्रह होत असला तर संस्कृत भाषेच्या नियमा प्रमाणें त्या ईकारास र्‍हस्व होतो. जसें— **हस्तिदंत, प्राणिमत्सर**, इ०. एथें मूळचे **हस्ती** आणि **प्राणी** शब्द होत.

## विभाग ३.

## कर्मधारय.

५६२ **कर्मधारय** म्हणजे वक्त्याच्या मनांत उभय शब्दांचा भाव ज्यांत समान असतो, किंवा उभय शब्दांचा परस्पर उपमानोपमेयभावसंबंध ज्यांत असतो, असा जो समास तो होय; अथवा, विशेष्यविशेषणांचें सान्निध्य असून त्यांचा जो समास घडतो तो होय; जसें—**भक्तिमार्ग** याचा विग्रह 'भक्ति तोच मार्ग, किंवा भक्तिरूप जो मार्ग तो,' तसेंच—**भवसागर, संसाराटवि, नीलोत्पल, काळपुरुष, ब्रह्मराक्षस, तांबडमाती, काळमांजर**, इ०.

५६३ शरीरादिसंबंधवाचक जे शब्द ते कर्मधारयसमासघटित शब्दांत विशेषणरूप उपपद होत असतां जे त्यांस विकार होतात ते उदाहरणां सुद्धां सांगतों.

| शब्द. | विकार. | उदाहरणें. |
|---|---|---|
| चुलता | चुलत | चुलतभाऊ, चुलतबहीण, चुलतसासू, चुलतचुलता. |
| मामा | मामे | मामेभाऊ, मामेबहीण. मामेसासू, मामेसासरा, |

| शब्द. | विकार. | उदाहरणें. |
|---|---|---|
| मावशी | माऊस | माऊसभाऊ, माऊसबहीण, माऊससासू, माऊससासरा. |
| आत | आते | आतेभाऊ, आतेबहीण, आतेसासू, आतेसासरा, आतेगौरव, आतेचीर. |
| आजा | आजे | आजेसासरा, आजेसासू, आजेचीर, आजेगुरु. |
| नातू—नात | नात | नातजांवई, नातसून. |
| भाचा—भाची | भाचे अ० भाच | भाचेजांवई, भाचेसून, अ० भाचसून. |

## विभाग ४.

### द्विगु.

५६४ संख्यावाचक पूर्वपद असतां पूर्वोत्तर पदांचा जेथें समास होतो, आणि हा समास बहुधा समाहारार्थी असतो, त्यास **द्विगुसमास** ह्मणतात; जसें—**पंचपाळें**, ह्मणजे पांचा पाळ्यांचा समूह, **पंचारती**, **पंचखाजें**, **बारभाई**, **अठराबाबू**, **चतुर्युग**, **अष्टाध्यायी**, इ०.

## विभाग ५.

### मध्यमपदलोपी.

५६५ **मध्यमपदलोपी**, ह्मणजे दोन शब्दांच्या मधल्या पदाचा ज्यांत लोप होऊन त्यांचा समास होतो त्यास ह्मणतात; जसें—**साखरभात**. (याचा विग्रह पूर्वी करून दाखविला आहे.) तसेंच— **कर्वतकीस**, **लांकूडकाम**, **कातरविडा**, **घरजांवई**, इ०.

## विभाग ६.

### बहुव्रीहि.

५६६ जेणेंकरून दोन शब्दांचा संयोग असतां त्याजवरून तिसऱ्या पदार्थाची उपलब्धि होत्ये त्यास **बहुव्रीहि** समास म्हणतात; जसें– **चक्रपाणि,** याचा विग्रह–'चक्र आहे पाणीच्या ठायीं ह्मणजे हस्तीं ज्याच्या तो'–विष्णु; याच प्रमाणें–**चतुर्भुज, शशिशेखर, मृगनयना,** इ०. हे बहुव्रीहिसमासघटित शब्द बहुधा विशेषणें असतात.

कोणी **एकडोळ्या, बाबरझोंट्या, उंचमान्या, घोडतोंड्या,** इत्यादि शब्दांचा-'एक आहे डोळा ज्याचा तो' एकडोळ्या, असा विग्रह करून यांस बहुव्रीहिसमासघटित शब्द मानितात; परंतु मला हें प्रशस्त दिसत नाहीं; कारण या बहुव्रीहि समासाचें जें लक्षण कीं–दोन शब्दांचा संयोग असतां त्याजवरून तिसऱ्या पदार्थाची उपलब्धि होत्ये. त्याची पूर्ण पर्याप्ति होत नाहीं. हीं केवळ शब्दसाधितें होत; **एकडोळा** ज्यास आहे तो **एकडोळ्या, घोडतोंड** ज्यास आहे तो **घोडतोंड्या,** इ०. पाहा पृ० १७४. या—

५६७ जर उत्तरपद आकारान्त स्त्रीलिंग आहे, आणि त्याचा पूर्वपदाशीं बहुव्रीहि समास होऊन तें सारें पद पुल्लिंग शब्दाचें विशेषण होतें, तर संस्कृत नियमा प्रमाणें तें **आकारान्तपद अकारान्त** होतें; जसें–**लक्ष्मीभार्य, गौरीकांत,** इ०.

एथें 'लक्ष्मी आहे भार्या ज्याची तो', **लक्ष्मीभार्य,** 'गौरी आहे कांता ज्याची तो', **गौरीकांत,** असा विग्रह जाणावा.

## विभाग ७.

### अव्ययीभाव.

५६८ वर जे समास सांगितले त्यां शिवाय आणखी बहुतेक विद्वान् मराठी भाषेंत नामां पुढें शब्दयोगी अव्यय असतां त्याचा संस्कृता प्रमाणें अव्ययीभाव समास मानितात; जसें-**झाडावर**, झाडाच्या वर-**झाडावर**, असा **वर** या शब्दयोगी अव्ययाचा झाडाशीं समास करून **झाडावर** एथें अव्ययीभाव मानितात; परंतु माझ्या विचारास हें ठीक दिसत नाहीं. संस्कृता प्रमाणें मराठी भाषेंत हा समास अशा स्थळीं संभवत नाहीं; संस्कृतांत उपसर्ग पूर्वी येऊन त्यांशीं ज्या शब्दाचा योग असतो त्यास नपुंसकत्व होऊन अकारान्तांस पुढें **अम्** होतो ; आणि तें सर्व पद क्रियाविशेषण असतें; जसें—'सउ**पगंगं**प्राप्तः' ह्मणजे, 'तो गंगे जवळ आला', यांत **उपगंगं** एथें संकृत वैयाकरण अव्ययीभाव समास मानितात हें योग्यच आहे; कांकीं प्रथम तर त्या भाषेंत **उप** हा उपसर्ग पहिला येऊन त्याचा 'गंगायाः समीपं—उपगंगं', असा विग्रह होऊन तें सर्व विकृतरूप क्रियेचें विशेषण होतें. तेव्हां अशा ठिकाणीं त्यांस हा समास मानिल्या शिवाय गत्यंतर नाहीं. परंतु **गंगेजवळ** यांत कांहीं तसें विलक्षण रूप नाहीं, अथवा तशी अडचणहि नाहीं; **गंगे** हें **जवळ** या शब्दयोगी अव्ययाच्या योगानें **गंगा**शब्दाचें सामान्यरूप झालें आहे; कांकीं शब्दयोगी अव्यय आणि विकृत विशेष्य यांच्या योगानें नाम सर्वनाम आणि विशेषण यांचें सामान्यरूप होत असतें हा नियम मराठी भाषेंत सर्वव्यापक आहे. तेव्हां या नियमास न अनुसरतां जर **गंगेजवळ, घरावर, वाड्या-**

**समोर**, इ० पदांचा अव्ययीभाव समास मानिला तर या सर्व पदास क्रियाविशेषण अव्यय मानिलेंच पाहिजे; कारण हीं जीं अव्ययीभावसमासघटित पदें होतात त्यांस अव्ययें मानणें आवश्यक आहे, दुसरा निर्वाह नाहीं; तेव्हां **घरावर**, **गंगेजवळ**, **परमदेदिप्यमानविमानारूढदेवासह**, या सर्व पदास अव्यय मानणें मला केवळ अप्रशस्त दिसतें. ज्यांस असें दिसत नसेल त्यांहीं इष्ट असल्यास हीं अव्ययें मानावीं.

५६९ परंतु मराठी मध्यें **दर**, **हर**, **प्रति**, इ० कित्येक उपसर्गांचा नामाशीं अनुयोग असतां त्या तन्निमित्त त्या नामांस अव्ययत्व प्राप्त होऊन जर तें सारें पद अव्ययरूप होत असलें तर तेथें **अव्ययीभाव** समास मानिला असतां संभावनीय होय; उदाह०—**दरमजल**, **दरदिवस**, **हरघडी**, **हरवक्त**, **प्रतिरात्र**, **प्रतिवर्ष**, इ०. 'सरकार शिपायांस दरमजल अ० दरदिवस दोन आणे भातें देतें', इत्यादि वाक्यांत— **दरमजल**, **दरदिवस**, इ० शब्दांत अव्ययीभाव समासाची उपलब्धि होऊन तीं सारीं क्रियाविशेषण अव्ययें होतात असें माझें मत आहे.

## विभाग ८.

### समासां विषयीं स्फुट विचार.

५७० मराठी भाषेंत जर सामासिक नामांचें पूर्वपद अकारवर्जितस्वरान्त असलें तर त्यास अकारादेश किंवा एकारादेश होतो; जसें—**जितकाळसा**, **काळसांवळा**, **तोंडलेभात**, **घोडेराऊत**, **घोडेमात**, इ०.

५७१ एका सामासिक शब्दाचे दोन तीनहि समास होतात; परंतु त्यांतून कोणता समास ग्राह्य हें अर्थानुसंधाना वरून समजावें; जसें—'त्या राजाचा **सत्यव्रताचा** नियम मोठा आहे', ह्मणजे-'सत्यरूप जें व्रत' त्याचा नियम, असा कर्मधारय समास होतो; आणि 'तो राजा मोठा **सत्यव्रत** होता', ह्मणजे—'सत्य आहे व्रत ज्याचें' असा होता, एथें बहुव्रीहि समास होतो; 'तो राजा **सत्यव्रत** पाळण्याविषयीं मोठा दक्ष आहे', या वाक्यांत 'सत्याचें जें व्रत तें असा षष्ठीतत्पुरुष, अथवा 'सत्य पाळण्या विषयीं आणि व्रत पाळण्या विषयीं' दक्ष असा द्वंद्व समासहि संभवतो.

व्याकरण पदच्छेदकरिते समयीं अशी अडचण फार येत असत्ये; एकादे समयीं दोन तीन प्रकारचे विग्रह केले तरीं ते सर्व अर्थास अनुकूल असतात, अशा प्रसंगीं ज्यास जो नीट दिसेल, व ज्याची जशी अर्था विषयीं रूचि असेल, तदनुरूप त्याणें तो समास मानावा. हीं व्याकरणांत निरंतर वादाचीं स्थळें असतात.

संस्कृतकाव्यांत, व मोरोपंतवामनादिकृत जीं मोठमोठीं प्राकृत काव्यें त्यांत, हि बहुधा अनेक शब्द अनेक प्रकारच्या समासानीं युक्त असून तें सर्व पद सामासिक असतें, व असें सामासिक पद इतर शब्दांचें विशेषणहि असतें; उदाह०– 'त्या कालीं श्रीमद्रघुवंशभूषणकोदंडपाणि राम भ्रातृशुश्रूषिकानिष्ठ लक्ष्मणा सह पंपासरतटीं आगमन करिता झाला', या वाक्यांत - **श्रीमत्**, आणि 'रघूचा जो वंश तो' **रघुवंश** (षष्ठीतत्पुरुष), 'रघुवंशाचें जें भूषण तें' **रघुवंशभूषण** (षष्ठीतत्पुरुष), अथवा, 'रघुवंशास आहे भूषण ज्याणें करून असा बहुव्रीहि समास करून- **रघुवंशभूषण**, आणि 'कोदंड आहे पाणीच्या ठायीं ह्मणजे हस्तीं ज्याच्या' तो- **कोदंडपाणि** (बहुव्रीहि), या तिन्ही विशेषणांचा

पुनः द्वंद्व समास करून तें सारें **राम** याचें विशेषण करावें. यांत एक द्वंद्व, दोन तत्पुरुष, आणि एक बहुव्रीहि असे समास आहेत. तसेंच 'भ्रात्याची जी शुश्रूषा ती' **भ्रातृशुश्रूषा** (षष्ठीतत्पुरुष), 'एक अशी जी निष्ठा ती' **एकनिष्ठा** (कर्मधारय). 'भ्रातृशुश्रूषा आहे एकनिष्ठा ज्याची तो' **भ्रातृशुश्रूषैकनिष्ठ** असा शेवटीं बहुव्रीहि समास करून तें सर्व पद लक्ष्मणाचें विशेषण करावें.

५७२ 'त्याचा अभाव,' 'त्यापासून भिन्न', अथवा 'तदभावविशिष्ट', असा अर्थ विवक्षित असतां संस्कृत शब्दांच्या मागें **अ** या वर्णाचा योग होऊन जो एक प्रकारचा समास होतो, त्यास संस्कृत व्याकरणांत **नञ्समास** ह्मणतात. उदाह०—नव्हे जो ब्राह्मण, अथवा ब्राम्हणापासून जो भिन्न तो—**अब्राह्मण**, ज्ञानाचा जो अभाव तें-**अज्ञान**, अथवा ज्ञानाभावविशिष्ट जो तो—**अज्ञान.**

शब्दाचा प्रथम वर्ण जर स्वर असला तर हा **अवर्ण** आणि पुढला शब्द यां मध्यें **न्** विकरण होतें; जसें—अ+आदर=**अनादर**,अ+ईश्वरवादी=**अनीश्वरवादी**, अ+उपपत्ति=**अनुपपत्ति**,अ+एक= **अनेक**, इ०.

---

## खंड ५.

### कारकविचार.

५७३ क्रियेच्या अन्वयें जो विभक्तीचा अर्थ त्यास **कारक** असें ह्मणतात. हीं कारकें सहा आहेत;—**कर्त्ता**, **कर्म**, **करण**, **संप्रदान**, **अपादान**, आणि **अधिकरण**.

## भाग १.

### प्रथमा.

५ १४ ही विभक्ति कोणत्याहि शब्दास असतां क्रियेच्या अन्वयें तिचे मराठी भाषेंत दोन अर्थ असतात ;—**कर्ता** आणि **कर्म.**

[अ] प्रथमाविभक्त्यंत जितके शब्द तितक्यांतून कित्येकांच्या ठायीं क्रियाजनकत्वधर्म संभवतो, ह्मणजे ज्यां पासून क्रिया उत्पन्न होत्ये, असा अर्थ असतो, तेव्हां त्यास त्या क्रियांचे कर्ते ह्मणावें; जसें--'**रामा मारितो**', यांत **मारितो** या क्रियेचा उत्पन्न कर्ता रामा, ह्मणजे रामा पासून ही क्रिया उत्पन्न होत्ये असा अर्थ, ह्मणोन **रामा** हा प्रथमान्त शब्द **मारितो** या क्रियेचा कर्ता होय ; सांगायास तात्पर्य कोणत्याहि क्रियेचें कर्तृत्व प्रथमाविभक्त्यन्त अथवा तृतीयाविभक्त्यन्त* शब्दा वर असतें, मग ती क्रिया स्पष्ट त्या वाक्यांत उक्त असो, अथवा अध्याहृत असो; जसें—'**सूर्य उगवतो**', या वाक्यांत **सूर्य** ही प्रथमा विभक्ति होय, आणि **उगवतो** या क्रियेचा कर्ता होय; तसेंच 'काय चांगला मुलगा', यांत **मुलगा** हें प्रथमान्त नाम, **आहे** इत्यादि अध्याहृत क्रियेचा कर्ता होय.

[**आ**] अथवा, ज्या वर एकाद्या क्रियेचा व्यापार घडतो, असा ज्याच्या विभक्तीचा त्या क्रियेशीं संबंध असतो, आणि ज्यास त्या क्रियेचें **कर्म** असें ह्मणतात, अशा अर्थाचे दर्शक-

---

*हा भेद पुढें वाक्यरचनेंत कर्तृक्रियासंबंधा विषयीं जे नियम दाखविले आहेत त्यांत स्पष्ट केला आहे.

हि कित्येक शब्द प्रथमान्त असतात; जसें—**पारधी वाघ मारितो'**, यांत **मारणें** या क्रियेचा व्यापार पारध्या पासून उत्पन्न होऊन वाघा वर घडतो, ह्मणोन **वाघ** ही जी प्रथमा विभक्ति आहे तिचा अर्थ **कर्म** जाणावें.

क्रियाजनकत्वधर्माचा संभव नसतां केवळ त्या त्या क्रियेचा व्यापार ज्या पदार्था वर होतो तद्वाचक जो प्रथमान्त शब्द तो त्या क्रियेचें कर्म जाणावें; जसें—पूर्व उदाहरणांत **पारधी** हें प्रथमान्त नाम कर्ता, आणि **वाघ** हें प्रथमान्त नाम कर्म होय. हा प्रथम विभक्तीचा कर्तृकर्मरूपभेद केवळ अर्था व-रून जाणावा.

[इ] जर वाक्या मध्यें एक कर्त्ता आहे, आणि दुसरे तत्पर्यायवाचक शब्द प्रथमान्त आहेत, तर क्रियाजनकत्व ज्याच्या ठायीं संभवतें, त्यास कर्त्ता मानून वरकड प्रथमा-विभक्तींचाहि कर्त्रर्थ मानावा, परंतु त्यांत जर एकाद्या अर्थाचें विधान आहे तर त्या विधेयार्थवाचक शब्दाच्या प्रथमेस **विधानार्थी** अथवा **विधेयार्थी** प्रथमा मानावी; आणि त्या विधेयाचें उद्देश्य असेल त्याची तत्संबंधानें **उद्देश्यार्थी** प्रथमा मानावी; उदाह०--'तो गृहस्थ ब्राह्मण आहे', एथें **गृहस्थ** हा **आहे** या क्रियेचा कर्त्ता होय, **तो** या पर्यायवाचक शब्दाचीहि प्रथमा कर्तरि होय, परंतु एथें गृहस्थास उद्देशून ब्राह्मणत्वाचें विधान आहे, ह्मणोन **ब्राह्मण** ही **विधानार्थी** अथवा **विधेयार्थी** प्रथमा ह्मणावी, आणि **गृहस्थ** ही **उद्देश्यार्थी** प्रथमा ह्मणावी.

[ई] या शिवाय आणखी जेथें कोणत्याहि द्रव्याच्या परिमाणाचें विधान असतें, तेथें परिमाणवाचक शब्दा वरून जी प्रथमा होते ती **परिमाणार्थी** प्रथमा जाणावी; जसें—

एक पायली मोठ, दोन तोळे सोनें, पांच चाहूर जमीन, पन्नास हात पागोटें; इ०. यांत—**पायली**, **तोळे**, **चाहूर**, **हात**, या शब्दांची परिमाणार्थी प्रथमा जाणावी.

### भाग २.

### द्वितीया.

५७५ पूर्वोक्त कर्मरूप अर्थ द्वितीयेच्या ठायींहि संभवतो; जसें— 'पारधी ससास पळवितो', एथें **ससास** या द्वितीयेचा अर्थ कर्म होय; तसेंच—'बाप मुलांस पोशितो', 'आई मुलीस सासरीं पाठविते', 'कावळे कबुतरांस चोंचितात'; या वाक्यांत जितकीं द्वितीयान्त नामें तितकीं सारीं कर्मे होत. कर्मार्थव्यतिरिक्त इतर अर्थ संभवत असतां ती चतुर्थी मानावी. पाहा, पृ० ६१, ले० १७६, टीप.

### भाग ३.

### तृतीया.

५७६ तृतीयेचे मुख्य अर्थ पांच आहेत;— **कर्त्ता**, **करण**, **हेतु**, **अंगविकार**, आणि **साहित्य**.

[अ] **कर्ता**— पूर्वोक्त कर्त्रर्थी तृतीया होते; उदाह०— 'गोपाळानें गाय बांधिली', 'विनायकानें आपली पोथी लिहिली', इ०. एथें **गोपाळानें**, **विनायकानें**, हे तृतीयान्त शब्द अनुक्रमेंकरून **बांधिली**, **लिहिली**, या क्रियापदांचे कर्ते होत.

[आ] **करण**—कोणतीहि क्रिया करावयास जें साधन त्यास त्या क्रियेच्या अन्वयें **करण** असें ह्मणतात; जसें— **'रामानें बाणानें रावण मारिला'**, यांत **मारणें** या क्रियेचें

साधन **बाण** आहे, असा अर्थ **बाणानें** या तृतीयान्त शब्दानें दर्शविला, ह्मणोन **बाणानें** ही करणी तृतीया होय. तसेंच—'गोपाळानें दाव्यानें गाय बांधिली', 'विनायकानें लेखणीनें पोथी लिहिली', 'भक्तीनें ईश्वर प्राप्त होतो', 'द्रव्यानें सर्व मिळतें', इ०.

[इ] **हेतु**—कोणतीहि क्रिया व्हावयास अथवा करावयास जें निमित्त अथवा कारण असतें, तद्वाचक जे शब्द त्यांवरून तृतीया होये; उदाह०—'पैक्यानें महाग', 'वयानें वडील', 'तो गांव दुकाळानें ओस पडला', 'तुह्मां आल्यानें माझें कार्य झालें'; इ०. यांत **पैक्यानें, वयानें, दुकाळानें, आल्यानें,** इ० हेत्वर्थी तृतीया होत.

[ई] **अंगविकार**—कोठें अंगविकाराची विवक्षा असतां विकृतांगवाचक शब्दां वरूनहि तृतीया होये; ईस **अंगविकारी** तृतीया ह्मणतात; उदाह०—'अंगानें पुष्ट', 'पायानें लंगडा', 'मुखानें जड', 'रंगानें गोरा', 'डोळ्यांनीं आंधळा', इ०.

[उ] **साहित्य**—कर्ता कोणतीहि क्रिया करित असतां त्याच्या साहचर्यानें राहणारा जो पदार्थ तद्वाचक शब्दा वरून तृतीया होये; उदाह०—'भिकंभट एका अंगवस्त्रानें आले', यांत **अंगवस्त्रानें** ह्मणजे अंगवस्त्रा सहित. तसेंच—'अशा मळक्या पागोट्यानें तूं तेथें जाऊं नको', 'त्या काळीं बारा हजार स्वारांनीं शिवाजी मुसलमानां वर पडला', इ०. यांत— **अंगवस्त्रानें, पागोट्यानें, स्वारांनीं**, इ० साहित्यार्थी तृतीया होत.

[ऊ] तृतीयेचा अर्थ **कर्त्ता** आणि **करण** असतां बहुधा

**नें**, एं, हे प्रत्यय होतात, आणि **सन्निधान** अ० **बरोबरी** असा अर्थ असतां **शीं** प्रत्यय होतो, असा बहुधा या भाषेंत नियम आढळतो. 'पारध्यानें बंदुकीनें वाघ मारिला', त्या उंदरास त्याणें सांपळ्यानें धरिलें', 'रामें दिलें तिस उपद्रव कोण देता', या उदाहरणांत तृतीयेचा अर्थ कर्त्ता आणि करण होय. 'त्याणें त्यांशीं मारामारी केली', 'तूं मजशीं कांहीं बोलूं नको', एथें **त्याशीं, मजशीं**, या तृतीयेनें **सन्निधान, संघट्टन**, अशा अर्थाची उपलब्धि होत्ये.

कोठें **करण** अर्थ असतांहि **शीं** या प्रत्ययाचा प्रयोग करितात ; जसें—'त्याणें चोरास काठीशीं मारिलें', 'इंग्रेज लोक तरवारीशीं लढत नाहींत', इ०. परंतु असा प्रयोग बहुधा मुंबई प्रांतीं आढळतो, अशा ठिकाणीं **नें** याचा प्रयोग करणें हाच उत्तम पक्ष.

कोठें **करण** अथवा **साहित्य** अर्थ असतां **नीं*** आणि **शीं** हे तृतीयेचे दोन्ही प्रत्यय एकत्र जोडून लावितात ;जसें—'मग त्या पंवारानें एक हजार स्वारांनिशीं तो किल्ला घेतला';'महमूद वीस हजार घोड्यांनिशीं पंजाबांत शिरला',इ०.

## भाग ४.

### चतुर्थी.

५७७ विभक्तिप्रकरणीं सांगितलेंच आहे कीं मराठींत द्वितीयेचीं आणि चतुर्थीचीं रूपें सारिखींच होतात ; ह्मणोन हा विभक्तिभेद अर्था वरून जाणावा. त्यांत जेथें **कर्म** अर्थ असेल तीं द्वितीया, आणि एतद्व्यतिरिक्त जे अर्थ ते असतां चतुर्थी मानावी.

---

* या ठिकाणीं **नीं**च्या स्थानीं **नि** होतो.

संप्रदान ह्मणजे ज्या अर्थी, अथवा ज्या कारणें, अथवा ज्यास उद्देशून, एकादी क्रिया घडत्ये असा जो त्या क्रियेशीं विभक्तीचा संबंध तें; जसें—'रावजी ब्राम्हणाला दक्षिणा देतात', 'ती मुलांनां भात जेऊं घालित्ये', या वाक्यांत **ब्राह्मणाला** आणि **मुलांनां** ही चतुर्थी जाणावी.

कित्येक ठिकाणीं देशकालवाचक शब्दां वरून अधिकरणार्थी चतुर्थी होत्ये; जसें—'तो पुण्यास गेला', 'त्याचें लश्कर दिल्हीला जाऊन पोंहचलें', 'तो दिवसास निजतो, आणि रात्रीस जागतो', इ०. तसेंच—'डोक्यास पागोटें', 'अंगास अंगरखा', अशा ठिकाणींहि अधिकरणीं चतुर्थी जाणावी; उदाह०—'तो आला त्या वेळेस त्याच्या डोक्यास पागोटें होतें', इ०.

### भाग ५.

### पंचमी.

५७८ एकाद्या क्रियेशीं विभक्तीचा संबंध असतां जेणेंकरून अवधीचा अथवा वियोगाचा अथवा न्यूनाधिक्याचा बोध होतो, त्यास **अपादान** ह्मणावें. पंचमी विभक्ती वरून अशा अर्थाचा उपलब्धि होत्ये; जसें—'मुंबईहून पुणें साठ कोश आहे', एथें **मुंबईहून** या पंचमी पासून **मुंबई** आणि **पुणें** यांतील अवधीचा बोध होतो; तसेंच—'तो घरून आला', 'काशीहून कलकत्ता दूर आहे', 'गोपाळाहून रावोबा अधिक देखणा आहे', इ०.

### भाग ६.

### सप्तमी.

५७९ ज्या स्थळीं किंवा ज्या वर एकादी क्रिया घडत असत्ये त्यास **अधिकरण** ह्मणावें.

सप्तमीचा अर्थ **अधिकरण** असतो ; जसें—'तो घरांत जेवित नाहीं', एथें **घरांत** हें अधिकरण होय; तसेंच—'तो देशांत फिरतो', 'लोकांत वागतो', 'त्या पुरुषांत चातुर्य फार आहे', इ०.

मन रामीं रंगलें अवघें मनचि राम झालें.—एकनाथ.

५८० जीं वस्त्रालंकारादिक त्यांचा आधाराधेयभाव संबंध असतां या भाषेत जनरूढी प्रमाणें आधेया वरून सप्तमी होत्ये; जसें— 'जोड्यांत पाय' असा अर्थ असतां 'पायांत जोडा' असें बोलण्याची रूढि पडली आहे; तसेंच— 'अंगांत अंगरखा', 'डोकींत पागोटें', 'बोटांत आंगठी', इ०.

अकारान्त शब्दां वरून क्वचित् करणार्थींहि सप्तमी होत्ये; जसें—'हें काम त्याणें आपल्या **हातीं** केलें', 'तो आपल्या **तोंडीं** बोलला', 'तो **पायीं** आला', इ०.

कोठें सप्तमीचाहि साहित्यार्थीं तृतीये सारिखा अर्थ होतो; जसें—'रिकाम्या **हातीं** बाजारांत जाऊं नये', 'उघड्या **पायीं** रानांत फिरूं नये', इ०.

## भाग ७.

### षष्ठी.

५८१ संस्कृत वैयाकरण षष्ठीचा अर्थ जो **संबंध** तो कारकांत लेखित नाहींत हें सयुक्तिक आहे; कारण, **षष्ठी** कांहीं साक्षात् क्रियेशीं संबंध ठेवित नाहीं; षष्ठीचा संबंध इतर शब्दांशीं होऊन त्या शब्दांचा संबंध क्रियेशीं राहतो; जसें—'गोपाळाच्या बापानें एक दुकान घातलें', यांत **घातलें** या क्रियेशीं जो कर्त्रन्वयें संबंध तो **बाप** या शब्दांशीं

होय; **गोपाळ** या शब्दाशीं **घातलें** याचा कांहीं संबंध नाहीं; ह्मणोन **षष्ठी** कारकांत नाहीं.

आतां हा षष्ठीचा संबंध अनेक प्रकारचा असतो, त्याचा विस्तार केला असतां ग्रंथ वाढेल, ह्मणोन त्यांतील केवळ मुख्य प्रकार एथें सांगतों.

| | | |
|---|---|---|
| **अंगांगिभावसंबंध** | जसें— | हाताचें बोट. |
| **स्वस्वामिभावसंबंध.** | जसें— | बाजीरावाचा वाडा. |
| **सेव्यसेवकभावसंबंध.** | जसें— | राजाचा दूत. |
| **आधाराधेयभावसंबंध.** | जसें— | नदीचा मासा, रात्रीचा अंधार. |
| **जन्यजनकभावसंबंध.** | जसें— | या बाईचें अपत्य. |
| इ०. | | इ०. |

५८२ क्वचित् अधिकरणार्थीहि षष्ठी होत्ये; जसें—'तो **दिवसाचा*** निजतो आणि **रात्रीचा** काम करितो', यांत **दिवसाचा** आणि **रात्रीचा** ह्मणजे दिवसाच्या ठायीं आणि रात्रीच्या ठायीं असा अर्थ; तसेंच—'तो **शिमग्याचा** बाहेर पडत नाहीं', 'तो **पाहांटेची** उठून ईश्वराचें स्मरण करित्ये'.

५८३ क्वचित् करणार्थीहि षष्ठी होत्ये; जसें—'माझ्या **बोलण्याचा** इला राग येतो', ह्मणजे माझ्या **बोलण्यानें** असा अर्थ.

५८४ क्वचित् कालवाचक अथवा स्थलवाचक कित्येक शब्दां वरून अपादानार्थीं षष्ठी होत्ये; जसें—'मीं **कालचा** त्यास सांगतों आहें परंतु तो ऐकत नाहीं', ह्मणजे कालपासून असा अर्थ.

---

* यां मधून कित्येक अव्ययें मानिलीं तरीं चालेल.

या प्रमाणें हें कारकप्रकरण संक्षेपरूपानें सांगितलें, यांत शिकणारांनीं लक्षांत ठेवावें कीं एका विभक्तीचे जे अनेक अर्थ होतात, ते त्या त्या प्रसंगीं जसे अर्थास अनुकूल दिसतील तसे मानावे.

## खंड ६.

### वाक्यरचना.

५८५ वाक्या मध्यें शब्दांची योजना कसकशी करावी, व कोणता शब्द कोणत्या शब्दांशीं संबंध ठेवितो, व जो त्याशीं संबंध ठेवितो तो त्या वाक्यांत तत्संबंधानें मागें पुढें कसा असावा, हा विचार या खंडांत केला आहे. वाक्यरचनेंत जे कित्येक नियम आहेत, त्यां विषयीं पुढें कित्येक रीति लिहिल्या आहेत, त्यां वर शिकणारांचें लक्ष अवश्य असावें.

**वाक्य** ह्मणजे, ज्यांस उद्देशून कांहीं एक विधान करितों ते उद्देश्य शब्द, आणि ज्यांचें विधाय करितों ते विधेय शब्द, यांचा समाहार; अर्थात्, उद्देश्य तो **कर्ता**, आणि विधेय तीं **क्रिया**, ह्मणजे कर्त्ता आणि क्रिया यांचा जो समाहार त्यास वाक्य ह्मणावें; जसें—‘रामा येतो’, यांत रामास उद्देशून **येतो** या शब्देंकरून त्याच्या येण्याचें विधान केलें आहे; ह्मणोन यांत **रामा** हा कर्त्ता, आणि **येतो** हीं क्रिया; हे दोन शब्द मिळून वाक्य झालें आहे.

या वरून कोणीं असें समजूं नये कीं वाक्यांत कर्त्ता आणि क्रियाच असत्ये; नाहीं, तर निदानपक्षीं कर्त्ता आणि क्रिया तरीं असलीं पाहिजे, या दोहीं शब्दां शिवाय वाक्याची पूर्णता होत नाहीं असें समजलें पाहिजे.

वाक्यांत जो शब्दांचा परस्पर संबंध त्यास **अन्वय** ह्मणतात; जसें—'दशरथाचा परम देदीप्यमान व अत्यंत पराक्रमी पुत्र जो राम', यांत **दशरथाचा** या शब्दाचा अन्वय **पुत्र** या शब्दा कडे आहे; तसेंच—'गोपाळानें केलेली जी काळ्या बोरूची लेखणी,' यांत **केलेली**, याचा **लेखणी** कडे अन्वय आहे.

एका शब्दाचा अन्वय दुसऱ्या शब्दा कडे असून त्या अन्वित शब्दाच्या रूपांत विकार करण्याचें जें त्याच्या ठायीं सामर्थ्य असतें त्यास **अधिकार** ह्मणतात; जसें—'गोविंदाच्या बापानें' यांत **बापानें** या शब्दाचा अधिकार **गोविंदाच्या** या शब्दा वर आहे; कारण, त्या वरून **गोविंदाचा** असा मूळचा शब्द असतां त्याचें **गोविंदाच्या** असें विकृत रूपांतर झालें आहे.

५८६ वाक्यें तीन प्रकारचीं आहेत—**पूर्ण**, **अपूर्ण**, आणि **संयुक्त**.

[अ] **पूर्ण** वाक्य ह्मणजे ज्या वाक्यांत कर्त्ता आणि क्रिया असून अर्थाची समाप्ति होत्ये तें; जसें—'रामा आला', 'गोपाळानें गाय बांधिली,' इ०.

[आ] **अपूर्ण** वाक्य ह्मणजे ज्या वाक्यांत अर्थाची समाप्ति होत नाहीं, आणि ती होण्यास इतर शब्दाची अपेक्षा असत्ये तें; जसें—'जो माणूस काल आला होता, त्याणें तें काम करून', यांत अर्थाची समाप्ति होत नाहीं.

[इ] **संयुक्त** वाक्य ह्मणजे अनेक वाक्यें एकत्र होऊन जें एक वाक्य होतें तें; जसें—'रामा तेथें आला, आणि तो

निरोप त्या गृहस्थांस सांगून, मग त्या गोष्टीच्या योजनेस लागून ती मसलत त्याणें सिद्धीस नेली'.

[ई] संयुक्त वाक्यांत मुख्यार्थाचें प्रतिपादक जें वाक्य त्यास **मुख्य** वाक्य ह्मणावें, आणि तदंतर्गत जीं अवांतर वाक्यें तीं **गौण** वाक्यें ह्मणावीं ; जसें—'त्याणें तें पत्र लिहून पुण्यास रवाना केलें,' यांत 'त्याणें रवाना केलें' हें मुख्य वाक्य, 'आणि पत्र लिहून' हें गौण वाक्य.

**नियम १.**

५८७ जर वाक्यांत एकच विशेष्य असलें, तर त्याचें लिंग, वचन, आणि विभक्ति, यां वरून तदन्वित विशेषण आणि विशेषणसर्वनाम, यांचीं रूपें फिरतात ; जसें—'त्या वर्गांत सर्व मुलां मध्यें तो मुलगा **चांगला** आहे', 'त्या घरांत रमा समजूत घेण्या **जोगी** आहे', '**तीं** फुलें पिवळीं आहेत'; **ही** पोरी दांडगी आहे'; इ०.

परंतु ज्या विशेषणादिकांचें रूपांतर लिंगादिभेदेंकरून होत नाहीं, त्यांस हा नियम लागत नाहीं ; जसें—**सुंदर** फूल, **नारंगी** रंग, **गुलाबी** जांब, **लुटारू** लोक, **कोरींव** धोंडा, इ०.

जर त्या वाक्यांत एका पेक्षां अधिक विशेष्यें असलीं, तर जें जवळचें विशेष्य असेल त्याशीं तीं विशेषणादि संबंध ठेवितात ; जसें—'त्या शिपायाची पगडी, डगलें, पट्टा, **तांबडा** आहे', 'माझी **लिहिलेली** पोथी, कागद, सर्व त्या जवळ आहेत', '**हा** अंगरखा, टोपी आणि धोतर, **कोणाचें**'?

**नियम २.**

५८८ जर एकलिंगी अनेक शब्द वाक्यांत उभयान्वयी अव्ययाच्या योगेंकरून संकलित असले, तर

त्यांच्या विशेषणादिकांचीं त्याच लिंगीं अनेकवचनाचीं रूपें योजितात. परंतु बहुधा त्या शब्दां पुढें **हा, असा,** या सर्वनामांचीं लिंगादिभेदेंकरून योजना करावी हें चांगलें; नुस्तें चांगलेंच नाहीं, परंतु कित्येक ठिकाणीं तर अवश्य केली पाहिजे; तसेंच आणखी जर ते शब्द भिन्न भिन्न जातींचे वाचक असले, तर ज्या शब्देंकरून त्या अवघ्या व्यक्तींचा संग्रह होतो, अशा शब्दाची योजना करावी लागते; जसें—'तूं आणि मीं फळ भक्षणारे', 'खोबरेल आणि तिळेल सस्तीं आहेत'; 'गौरी, मथुरा, आणि काशी, या मोठ्या शहाण्या आहेत', 'घोडा, बैल, उंट, हत्ती, आणि गाढव, हे मोठे उपयोगी पशु आहेत'.

[अ] मराठी भाषेंत **हा, असा,** या सर्वनामांचा या प्रमाणें योग असतो ह्मणून अशा वाक्यांत मधल्याउभयान्वयी अव्ययाची समयविशेषीं अपेक्षा ठेवित नाहींत; जसें —'घोडा, बैल, उंट, गाढव, हे मोठे उपयोगी पशु आहेत', 'कागद, लेखणी, शाई, चाकू, हीं लिहिण्याचीं साहित्यें होत'.

[आ] एकालिंगी अनेक शब्द या प्रमाणें एका पुढें एक जोडिले असतां त्यां पुढें त्याच्या जातिवाचकाचा प्रयोग करणें हें मराठी भाषेंत चांगलें दिसतें, व कित्येक ठिकाणीं नकेला असतां तें वाक्य केवळ पूर्ण वाटत नाहीं, जसें पूर्वोक्त उदाहरणांत—'गौरी, मथुरा, काशी, या शाहाण्या आहेत', हें वाक्य कांहींसें अपूर्ण दिसतें; यांत या शाहाण्या **मुली** अथवा **बाया** असा जातिवाचक शब्द असल्यास हें वाक्य चांगलें पूर्ण दिसतें.

## नियम ३.

५८९ जर तीं विशेष्यें भिन्नभिन्न लिंगीं असलीं, तर त्यांच्या विशेषणाचें रूप नपुंसकीं अनेकवचनीं असलें पाहिजे, परंतु एथेंहि दुसऱ्या रीती प्रमाणें **हा, असा**, या सर्वनामांचा प्रयोग केला पाहिजे; जसें—'त्याचा मुलगा, मुलगी, भाऊ, हीं सारीं चांगलीं आहेत', 'त्यांहीं घोडा, गाडी, घर, शेत, बाग, हीं सारीं विकून फडशा केला'.

**हा, असा**, यांचा मध्यें प्रयोग केला असतां त्यांचा संबंध बहुधा पुढल्या जातिवाचकाशीं असतो, असें असलें ह्मणजे वर सांगितला नियम राहत नाहीं. जर तें पुढलें जातिवाचक नसलें, आणि नुसतीं सर्वनामेंच असलीं, तर मात्र वर सांगितला नियम चालतो; उदाहरण—'तिणें शेला, पागोटें, धोत्रजोडा, आणि एक शालीचें फर्द, असा आपल्या जांवयास पोशाक दिला', या वाक्यांत **असा** या सर्वनामाचा अन्वय पुढला जातिवाचक शब्द जो **पोशाक** त्याशीं आहे, ह्मणोन त्याच्या लिंगवचनानुरूप त्या सर्वनामाचें व पुढल्या क्रियापदाचें रूप फिरतें.

## नियम ४.

५९० वाक्यांत विशेषण विशेष्याच्या **अगोदर** असलें पाहिजे; जसें—'चांगला मुलगा', 'शहाणी मुलगी', 'बढाईखोर प्रवासी', इ०.

[अ] परंतु जर त्या विशेष्याच्या गुणाचें विधान कर्तव्य आहे, तर तें विशेषण विशेष्याच्या पुढें येतें; जसें— 'तो घोडा पांढरा आहे', एथें घोड्यास उद्देशून त्याच्या पांढरेपणाचें विधान आहे.

[आ] क्वचित् भाषणांत विधिविशेषण विशेष्याच्या मागू-नहि येतें, तेथें पूर्वोक्त नियम राहात नाहीं; -'तो पांढरा घोडा आहे', या वाक्यांतहि घोड्यास उद्देशून त्याच्या पांढरेपणाचें विधान केलें आहे, परंतु जेथें स्वरस ठेवून दुसऱ्याच्या प्रतिज्ञेचा निषेध कर्तव्य आहे तेथें हें विधिविशेषण विशेष्याच्या पुढेंच असलें पाहिजे; जसें—'तुह्मीं सांगता तो कांहीं पढला नाहीं, परंतु मीं पाहिलें तो फार विद्वान आहे', 'ती मोठी शाहाणी आहे यांत संशय नाहीं'

## नियम ५.

५९१ संबंधी सर्वनामाचा ज्या नामा कडे अन्वय असतो, त्याच्या लिंग वचना प्रमाणें त्याचें रूप फिरतें; आणि तदन्वित जें दर्शक सर्वनाम तें पुढें त्या वाक्यांत याच्या लिंगवचनानुरूप असलें पाहिजे ; जसें— 'जो मनुष्य विद्या शिकेल तो प्रतिष्ठा मिळवील', 'जो चाकरी करील तो भाकरी खाईल'.

[अ] जर दोन तीन नामें एकत्र जोडलीं असलीं, तर जवळचें जें नाम त्याशीं या संबंधी सर्वनामाचा अन्वय असतो; जसें—'लिहायाच्या उपयोगी जो कागद, लेखणी, शाई, रेखाटणी, हीं निरंतर जवळ असावीं', 'शिकारीची जी कमाण, तीर, कुत्रीं, इ० सामान', इ०. परंतु अशीं अनेक नामें एकत्र जोडलेलीं असलीं ह्मणजे तें संबंधी सर्वनाम, व पुढलें जें दर्शक सर्वनाम, तें दुसऱ्या आणि तिसऱ्या नियमाप्रमाणें पुढल्या जातिवाचकाच्या लिंगवचनाशीं विशेषेंकरून संबंध ठेवितें; पूर्वोक्त वाक्य असें असावें,—'लिहायाच्या उपयोगी जें कागद, लेखणी, शाई, रेखाटणी, इत्यादि सामान

तें निरंतर जवळ असावें', 'शिकारीचें जें कमाण, तीर, कुत्रीं, वाघ्या, इत्यादि सामान तें'. 'श्रमपूर्वक साध्य केलें जें व्याकरण, न्याय, काव्य, यांचें ज्ञान तें विसरूं नये'.

### नियम ६.

५९२ अकर्मक धातूचे प्रयोग दोन प्रकारचे होतात, एक कर्तरि आणि एक भावी; त्यांत कर्तरिप्रयोग असतां कर्त्ता प्रथमान्त पाहिजे, व भावीप्रयोग असतां कर्त्ता तृतीयान्त पाहिजे; जसें 'तो उठतो', 'ती हंसते', 'तें उडतें', 'त्या गेल्या','तीं जावीं'; हा कर्तरिप्रयोग; 'तिणे जावें', 'जात असावें', हा भावीप्रयोग.

अकर्मक धातूं मध्यें जे भावकर्तृक धातु आहेत, त्यांच्या प्रयोगास भावकर्तरिप्रयोग ह्मणावें; जसें—'मला वाटतें', 'त्यास कळमळतें', 'मला आज सांजावलें'.

### नियम ७.

५९३ सकर्मक धातूंचा वर्तमान व भविष्य काळीं कर्तरिप्रयोग असतो, तेव्हां पहिल्यानें कर्त्ता, मग कर्म, आणि शेवटीं क्रियापद, असा क्रम असावा; उ०—'रामा गाई राखितो', 'गंगा चोळी शिवते', इ०.

[अ] हें कर्म बहुधा प्रथमान्त असतें, व कोठें द्वितीयान्तहि असतें, पूर्वोक्त उदाहरणांत 'रामा गाई राखितो', एथें 'रामा गाईस राखितो', असेंहि होतें. परंतु यांत बहुधा कर्म प्रथमान्त असावें हा उत्तम पक्ष.

[आ] यांत सर्वनाम जर कर्म आहे, किंवा प्राणिवाचक विशेष नाम कर्म आहे, तर तें द्वितीयान्त असलें पाहिजे; उदाह०—'तो त्यास धरितो', 'गोविंदा विठूला मारितो',

परंतु प्राणिवाचक जर सामान्य नाम असलें तर तें बहुधा प्रथमान्त असलें पाहिजे ; उदाह०—'अरे तूं एक शिपाई तर घेऊन ये,' 'मीं एक गडी बलावितों'.

[इ] जर वाक्यांत संप्रदानीं चतुर्थी असली तर जें कर्मरूप नाम असतें तें जरीं विशेषनाम असलें तरीं तें बहुधा प्रथमान्त असावें ; उदाह०—'मीं तुला रामा दाखवितों,' 'जनक रामास जानकी देतो,' इ०.

[ई] या वरल्या नियमास कोठें अर्थाच्या विपर्यासेंकरून व्यभिचारहि येतो, ह्मणजे, कर्मवाचक पद प्रथम येऊन मग कर्तृवाचक पद येतें ; जसें—'गाय रामा राखितो', 'चोळी गंगा शिवये'; यांत अर्थभेद इतकाच कीं प्रथम गाय ह्मटल्यानें इतर—ह्मशी, शेळ्या, इ० जीं संभाव्य कर्मवाचक पदें त्यांची व्यावृत्ति होये. 'गाई रामा राखितो,' ह्मणजे अर्थात् बोलणाराच्या मनांत—ह्मशी दुसरा कोणी राखितो, असा आशय असतो ; सारांश, जें मुख्य पद असेल, ह्मणजे ज्या वर त्याचा श्लेष असेल तें पद प्रथम येतें, असें समजावें.

## नियम ८.

५९४ पढधातूचा गण वर्जून सकर्मक धातूंचा प्रयोग भूतकाळीं व विध्यर्थीं कर्मणि आणि भावी असतो ; जेव्हां कर्मणिप्रयोग असतो, तेव्हां कर्त्ता तृतीयान्त आणि कर्म प्रथमान्त असलें पाहिजे ; (वाक्यांत शब्दांचा क्रम वर ७ व्या नियमांत सांगितल्या प्रमाणें असतो.) उदाह०—'त्याणें पुस्तक वाचिलें,' 'कृष्णीनें आपला परकर रंगविला'; 'त्याणें तें

काम करावें,' 'म्यां गाय सोडावी,' 'त्वां ईश्वरभक्ति करावी,' इ०.

[अ] अकरणरूपींहि विध्यर्थीं तृतीयान्त कर्त्ता असतो, आणि भावीप्रयोग होतो ; जसें—'त्याणें तेथें जाऊं नये', 'मनुष्यानें इतर क्षुद्र जीवांस त्रास देऊं नये'.

[आ] जेव्हां भावीप्रयोग असतो, तेव्हां तें कर्म द्वितीयान्तच असलें पाहिजे ; उदाह०—'त्याणें गाईस धरिलें,' 'रामानें आपल्या बापास पाहिलें,' इ०.

कोणी ह्मणतात कीं हा नियम चालत नाहीं, ह्मणोन हें एक आणखी वादाचें स्थळ आहे. ते ह्मणतात, जरीं कर्म द्वितीयान्त असलें तथापि कर्मणिच प्रयोग होतो ; जसें—'तिणें त्यास धरिला', 'त्याणें तिला पाहिली,' 'त्यांहीं त्या वाघास मारिला,' इ०. व हा नियम हिंदुस्तानी आणि गुजराथी भाषेस अनुसरून आहे, जसें हिंदुस्तानींत—'उन्ने उसको पकडा', 'मैंने उस घोडीको बोहत प्यारसे पाली'; तसेंच गुजराथींत—'में ते माणसने माऱ्यो', 'तेणे आजे छोकरीने जमवा तेडी,' इ०. या उदाहरणांत कर्मे द्वितीयान्त असून त्यांचा अधिकार क्रियापदांच्या रूपां वर असतो. त्यास, हिंदुस्तानींत तर मुळीं नपुंसकलिंग नाहीं. आणि भावीप्रयोगहि नाहीं ; तेव्हां हिंदुस्तानी भाषेच्या नियमानें एथें कांहीं विशेष समाधान होत नाहीं ; आंता गुजराथी भाषेंत—मात्र द्वितीयान्त कर्म असतां कर्मणिप्रयोग होतो ; परंतु तींत मराठी भाषे प्रमाणे विकल्प नाहीं, ह्मणजे, मराठी भाषेंत जसा विकल्पें कर्मणिप्रयोग अथवा भाविप्रयोग होतो, तसा तींत होत नाहीं ; तेव्हां आतां या विकल्पांत काय तो तारतम्यभाव पाहायाचा. व स्तविक सूक्ष्म बुद्धीनें पाहतां कर्त्ता आणि कर्म हीं प्रथमांत असतां त्याचा अधिकार क्रियापदां वर असावा, आणि तीं सविभक्तिक असतां क्रियापदाचें भावी रूप व्हावें, हा उत्तम पक्ष दिसतो—'त्याणें त्यास धरिला,' या पेक्षां-'त्याणें त्यास धरिलें,' हा प्रयोग विशेष माह्य होय. 'म्यां तुला चोरी वर

भली धरिली,' या पेक्षां-'म्यां तुला चोरी वर भलें धरिलें,' हें व्याकरणदृष्ट्या अधिक शुद्ध होय; कारण, मराठी भाषेंत कर्त्ता अथवा कर्म जें क्रियापदास वागवितें, त्याचें सूक्ष्म दृष्टीनें रहस्य पाहतां, व इतर भाषेशींहि तोलून पाहतां, असें लक्षांत येतें कीं, तेथें त्याचा आणि क्रियापदाचा विशेष्यविशेषणभावसंबंध असतो; व तें जें कर्त्ता आणि कर्म यांहींकरून वागणारें क्रियापद, तें मूळचें धातुसाधित विशेषण असून क्रियापदाच्या रूपांत आलेलें असें असतें; 'त्याणें वाघ मारिला', अथवा, 'ती चमत्कार करित्ये', यांत पूर्व वाक्यांत 'त्याणें वाघ मारला' ह्मणजे-तो जो त्याणें वाघ जो तो मारिला गेला, अथवा मारिलेला असा आहे असा मूळचा अर्थ; तेव्हां एथें **मारिला** हें मूळचें वाघाचें धातुसाधित विशेषण होय. तसेंच -'ती चमत्कार करित्ये', यांत मूळ **करता** या धातुसाधित विशेषणाचें **करती** हें स्त्रीलिंगीं एकवचनाचें रूप होय. आतां, मराठी भाषेंत असा नियम आहे कीं जेथें हा विशेष्यविशेषणभावसंबंध असतो, तेथें विशेष्य जर प्रथमान्त असलें, तर त्याच्या विशेषणाचें रूप त्याच्या लिंगवचनाच्या अनुरोधानें प्रथमान्त तटस्थ असतें; परंतु जर त्या विशेष्यास कांहीं विकार झाला, तर विशेषणाचें जें असें तटस्थ राहिलेलें रूप त्यास सामान्यरूपादि लागलाच विकार होतो. परंतु, 'त्याणें वाघाला मारिला', अथवा, 'त्याणें आपल्या बायकोला घरीं ठेविली'. यांत **वाघ** आणि **बायको** हे विशेष्यरूप शब्द जर प्रथमान्त असते, तर ते **मारिला** आणि **ठेविली** या मूळच्या विशेषणरूप धातुसाधितांस वागवितें; परंतु हीं विशेष्यें सविभक्तिक आहेत, तेव्हां एथें केवळ शुद्ध भूतकाळाच्या क्रियापदाचें साधारण जें नपुंसक रूप तें असून भावीप्रयोग व्हावा असा निर्णय केला ह्मणजे या वैकल्पिक प्रयोगा मध्यें विशेष ग्राह्यत्व या भावीप्रयोगा कडेसच येतें. ह्मणोन, माझ्या विचारास सकर्मक धातूंच्या भूतकाळीं कर्म जर सविभक्तिक आहे, तर तेथें भावी-प्रयोग करावा, हें चांगलें दिसतें; त्याणें वाघाला मारिला', त्याणें आपल्या बायकोला घरीं ठेविली', या पेक्षां 'त्याणें वाघाला मारिलें', आणि, त्याणें आपल्या बायकोला घरीं ठेविलें', असा भावीप्रयोग विशेष ग्राह्य होय.

[इ] परंतु केव्हां केव्हां कर्म द्वितीयान्त असून क्रिया-विशेषण जर त्याच्या लिंगवचना वरून साधत असलें, तर कर्मणिप्रयोग करण्याचा परिपाठ आहे; जसें—'त्याणें तिला बरी केली', त्याणें आपल्या घोड्याला चांगला पुष्ट केला', 'त्या मुलीनें आपल्या बाहुलीस पाटा वर उभी केली', इ०:

परंतु अशा ठिकाणीं कर्म प्रथमान्त केलें असतां वर जो नियम सांगितला त्यास बाध येत नाहीं; जसें—'त्याणें ती बरी केली', 'त्यां आपला घोडा चांगला पुष्ट केला', इ०. अथवा तें क्रियाविशेषण नपुंसकीं करून भावीप्रयोग करावा; जसें—'त्याणें तिला बरें केलें', 'त्याणें आपल्या घोड्याला चांगलें पुष्ट केलें', असा नियम ठेविला ह्मणजे वरल्या अप-वादाची कांहीं आवश्यकता राहत नाहीं.

[ई] जर वस्तुवाचक अथवा प्राणिवाचक सामान्यनाम कर्म असलें, तर बहुधा कर्मणिप्रयोग योजितात; जसें—'त्याणें एक सुंदर पशु पाहिला'; परंतु सर्वनाम किंवा मनु-ष्यवाचक विशेषनाम जर कर्म असलें, तर बहुधा निरंतर भावीप्रयोग योजितात; उदाह०—'तिणें त्याला शिकविलें', 'गोपाळानें खंडूला बोलाविलें'.

'रमानें विष्णु आराधिला', 'पार्वतीनें शिव प्रार्थिला', अशीं या नियमास विरुद्ध उदाहरणें कोठें कोठें आढळ-तात; परंतु हीं काव्यांतच शोभतात, व्यवहारी लिहिण्यांत अथवा भाषणांत—'विष्णूस आराधिलें', 'शिवास प्रार्थिलें', अशीं द्वितीयान्त रूपें असावीं.

[उ] शिकणें, जेवणें, इत्यादि कित्येक सकर्मक धातु-असून त्यांचा अकर्मक धातूं प्रमाणें भूतकाळीं कर्तरिप्रयोग

होतो; उ०—'मीं जेवलों', 'ती शिकली', इ०. कर्माची सत्ता असली तरीं कर्तरिप्रयोगच होतो ; उदाह०—'मीं भात जेवलों,' मीं 'पक्वान्नें जेवलों,' 'ती धडा शिकली,' इ०.

'मीं तोंड धुतलों,' 'तो अंग धुतला,' 'ती स्नान केली', अशी कोंकणस्थांत बोलण्याची रूढि आहे; परंतु अशा ठिकाणीं—'मीं तोंड धुतलें', 'त्याणें आंग धुतलें', 'तिणें स्नान केलें, 'असा कर्मणिप्रयोग करावा हें शुद्ध; कांकीं धु धातूचा भूतकाळीं कर्मणिप्रयोग होतो ; जसें—'मीं धोत्र धुतलें', 'रुमाल धुतला'; मग आंग, तोंड, इ० शब्द असतांच हा अपवाद कशास पाहिजे.

## नियम ९.

५९५ जर एका क्रियापदास अनेक कर्ते असले, तर शेवटचा जो कर्त्ता त्याच्या लिंगवचना वरून तें क्रियापद फिरतें ; उदाहरण—'हा आणि तो गेला', 'तुला तो आणि त्या बाया हंसल्या,' 'हा हत्ती आणि तुमचे घोडे तेथें गेले असते तर बरें होतें,' इ०.

## नियम १०.

५९६ जर एका क्रियेस अनेक कर्में असून कर्मणिप्रयोग होत असला, तर शेवटच्या कर्माचा अधिकार क्रियापदा वर असतो ; जसें—'तुह्मीं आपले कागद, लेखण्या, चाकू, आणि रेखाटणी कोठे सांडिली,' 'त्यांहीं आपले घोडे, रथ, उंटें, गाड्या, शिपायांच्या स्वाधीन केल्या', इ०.

## नियम ११.

५९७ कोणतेंहि क्रियापद ह्मटलें ह्मणजे त्यास कर्त्ता पाहिजे, मग तो कर्त्ता त्या वाक्यांत प्रत्यक्ष असो किंवा

अध्याहृत असो; उ०-'रामा काल गोपाळा कडे गेला होता; परंतु त्याचा सन्मान केला नाहीं', या वाक्यांत केला या क्रियेस कर्त्ता नाहीं ह्मणोन हें वाक्य अशुद्ध होय; यांत— 'परंतु त्याणें त्याचा सन्मान केला नाहीं', असें असावें.

### नियम १२.

५९८ मराठींत कोठें कोठें क्रियापदाचा अध्याहार करितात; उ०—'कोश ह्मणजे शब्दसंग्रहाचें पुस्तक', यांत **आहे** किंवा **होय** हें क्रियापद अध्याहृत आहे. जेथें एकाद्या गोष्टीचें सामान्यत: विधान कर्तव्य आहे, ह्मणजे, एकाद्या क्रियेच्या कर्तृत्वाचें आरोपण निश्चयपूर्वक अमुक्याच्याच ठायीं करितां येत नाहीं, तो कर्तृत्वरूप अर्थ, सामान्येंकरून ज्यांच्या ज्यांच्या ठायीं तत्तत्क्रियासंपादकशक्तीची संभावना होत्ये, त्यांच्या त्यांच्या ठायीं आरोपित केला असतां संभवतो, तेथें कर्त्याचा अध्याहार करावा लागतो. उदाह०- 'ओल्या जमिनी वर **निजलें** तर लागलेंच अंग धरतें,' 'पुष्कळ **पढलें**, आणि मोठमोठे ग्रंथ **पाहिले**, परंतु जर सारासारविवेचक बुद्धि नसली, तर तें सर्व निष्फल,' 'लोकांचे गुण नघेतां दोष **पहावे** हा दुष्टांचा स्वभाव होय,' 'या गावांत सर्व पदार्थ तोलून **विकतात**,' 'पूर्वी शंभर वर्षां वर **लिहित होते** खरे, परंतु आतां जसें डौलदार अक्षर **काढितात** तसें तेव्हां कोणास काढितां येत नसे.' या उदाहरणांत जितकीं क्रियापदें मोठ्या अक्षरांत दिसतात, तितक्यांचे कर्ते अध्याहृत जाणावे.

### नियम १३.

५९९ जर एका क्रियेचे अनेक पुरुषवाचक सर्वनामें

कर्त्ते असले, तर शेवटचें जें सर्वनाम, त्याच्या लिंगवचनपुरुषा प्रमाणें पुढल्या क्रियेचें रूप फिरतें; जसें—'मीं, तूं, आणि तो गेला', 'तो, तुह्मीं, आणि त्या तेथें होत्या', 'तूं, ती, आणि मीं जातों', इ०.

## नियम १४.

६०० जर एका वाक्यांत प्रथम, द्वितीय, आणि तृतीय पुरुष, अथवा प्रथम आणि द्वितीय पुरुष, कर्त्ते असले तर आज्ञाकाळीं क्रियापदाचें रूप प्रथम पुरुषीं असलें पाहिजे; जसें—'मीं तूं आणि तो तेथें जाऊं', 'तूं आणि मीं तें काम करूं'. जर द्वितीय आणि तृतीय असे दोन पुरुष कर्त्ते असले, तर क्रियेचें रूप द्वितीयपुरुषीं असलें पाहिजे;—'तूं आणि ती जा', 'तुह्मीं आणि त्या जा', इ०.

परंतु अशा प्रसंगीं क्रियापदास अनुकूल जो पुरुष असेल, तो याच्या जवळ आणावा हें बरें.

## नियम १५.

६०१ जर **राजश्री, महाराज, साहेब, सरकार** इ० बहुमानवाचक शब्द द्वितीय पुरुषीं असले, तर त्यांचें क्रियापद तृतीय पुरुषीं अनेकवचनीं असलें पाहिजे, अशी बहुधा रूढि आहे; जसें— 'सरकार जसा हुकूम करतील तसें करायास मीं तयार आहें', 'राजश्री तेथें गेले होते मग काय झालें'? क्वचित्—'राजश्री तेथें गेला होता', असाहि प्रयोग आढळतो; 'कालच मीं महाराजांस विनंति केली, कीं महाराज जसें सांगतील त्या बाहेर मीं वागणार नाहीं', इ०

देवबली असती तर आह्मीहि दिली असती', 'देवादिकांच्यानीं तें झालें नाहीं, तें तुह्मां मनुष्यांच्यानीं कसें करवेल,' इ०.

हें स्थळ मोठें वादाचें आहे. 'माझ्यानें अथवा मला तें काम करवत नाहीं', इत्यादि वाक्यांत **माझ्यानें** आणि **मला**. हा कर्त्ता, **काम** हें कर्म, आणि **करवत नाहीं**, हें सकर्मक-क्रियापद मानून सर्वत्र निर्वाह करितात ; व असा निर्वाह करण्यास कांहींसा संस्कृत भाषेचा आधाराहि आहे. तथापि भाषेच्या रहस्या वर दृष्टि देऊन पाहिलें असतां, अथवा अर्थाचा सूक्ष्म विचार केला असतां, माझ्या विचारास हें मत प्रशस्त दिसत नाहीं. माझ्या बुद्धीस असें वाटतें कीं, क्रियेस शक्यभेदाच्या रूपांत आणिलें असतां तिच्या ठायीं अकर्मकत्वाची उपलब्धि होत्ये ;–'माझ्यानें अ० मला तें काम करवत नाहीं,' एथें सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां **काम** हा कर्त्ता, आणि **करवत नाहीं** हें क्रियापद होय ; **माझ्यानें** ही कर्तरितृतीया नव्हे. यास या भाषेचा निर्बंधच मोठें प्रमाण आहे ; पाहा, इतर सर्व ठिकाणीं कर्तरितृतीया असतां **म्यां, त्वां, त्यानें**. अशीं तृतीयेचीं नियमित रूपें होतात ; आणि हा शक्यरूप भेद होतांच **माझ्यानें, तुझ्यानें, त्याच्यानें**, इ० सविकरणतृतीयेचीं रूपें, ज्यांचा इतर प्रसंगीं कधींहि प्रयोग होत नाहीं, तीं या अवसरीं अपरिचित आगंतुका सारिखीं येऊन बसतात. जर **करवतें** इ० शक्यभेदाच्या रूपांचा **मीं** हाच वस्तुतः कर्त्ता असता, तर जसें–'म्यां केलें', 'त्वां देवविलें', इ० सकर्मक क्रिया असतां **म्यां, त्वां**, इ० रूपें प्रयोजिलीं जातात, तशीं शक्यभेदीं सकर्मक क्रियापद असतां कां जात नाहींत? '**म्यां** तें काम **करवलें**,' असें कां होत नाहीं? तेव्हां **म्यां**च्या स्थानीं ज्या पेक्षां **माझ्यानें** असें विलक्षण रूप होतें, अथवा **मला** असें चतुर्थीचें रूप होतें, त्या पेक्षां मराठी भाषेच्या मतें **माझ्यानें** हा कर्त्ता नव्हे, असें स्पष्ट दिसतें आणखी, जितकीं शक्यभेदाच्या रूपांत आणिलेलीं क्रियापदें तितक्यांच्या वर्त्तमान काळाचीं आणि भविष्य काळाचीं रूपें अकर्मक क्रियापदांच्या नियमास अनुसरून असतात ; हें एक शक्यभेदीं

क्रियापद अकर्मक असतें यास मोठें प्रमाण होय. जसें–'त्याच्यानें तें काम करविते अथवा **करवील**', अशीं इतर सकर्मक धातूंच्या नियमां प्रमाणें रूपें होत नाहींत, परंतु अकर्मक धातूच्या नियमां प्रमाणें–'त्याच्यानें तें काम **करवतें**, अथवा **करवेल**' अशीं रूपें होतात. 'माझ्यानें तें काम करवतें', ह्मणजे, 'मीं जो त्या मद्द्वारा, अथवा, साधनरूप जो मीं त्या मज करवीं तें काम करवतें ह्मणजे केलें जातें' असा या वाक्याचा अर्थ होतो; ह्मणोन माझ्या विचारास असें येतें कीं, "**माझ्यानें** अ० **मला** तें काम करवतें' इ० वाक्यांत **माझ्यानें** यास करणी तृतीया करून, अथवा **मला** ही चतुर्थी करून, **काम** हें या वाक्यांत **करवतें** या क्रियापदाचा कर्त्ता मानावें; तसेंच 'माझ्यानें अ० मला धांववतें', इ० मूळच्या अकर्मकधातूं वरून शक्य भेदाच्या रूपाचा प्रयोग असतां त्यास भावकर्तरिध तु मानावें, हें बरें दिसतें.

परंतु ज्या पेक्षां हें केवळ नवीन मत होय, आणि आज पावेतों सर्वत्र 'माझ्यानें अ० मला तें काम करवतें' इ० स्थळीं **माझ्यानें** अ० **मला** यास कर्त्ता मानून **काम** हें **करवतें** या क्रियापदाचें कर्म मानण्याचा परिपाठ पडला आहे, व 'मया तत्कार्यं क्रियते' इ० संस्कृत वाक्यास अनुसरून हें वाक्य आहे असें सर्व मानितात, त्या पेक्षां एथें मला विशेष आडवें येतां कामा नये.

## नियम २३

१०९ **ला**प्रत्ययान्त भूतकालवाचक क्रियापदां पुढें **तोंच** हा सावधारण शब्द असतां, **ला**प्रत्ययाचा लोप होतो, आणि **तों** या अव्ययास **तां** आदेश होतो; जसें—'धन्यानें हाक **मारतांच** चाकर उठला', 'एकानें आंब्यास हात **लावतांच** त्या वर सर्वांची उडी पडली'; 'त्याणें पिशवींत हात **घालतांच** त्यास मोहर सांपडली', 'राजानें आज्ञा **करतांच** सर्व धांवले', इ०.

हें स्थळ मोठें विचारणीय होय. हीं जीं वर उदाहरणें सांगितलीं त्यां विषयीं जर चांगला खोल विचार न केला तर त्यांतील **मारतां, लावतां, घालतां, करतां,** हीं प्रथमदर्शनीं **तां**प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधितें अशीं दिसतात; परंतु अमळ विचार केला असतां लागलेंच ध्यानास येतें कीं हीं या प्रकारचीं धातुसाधितें नव्हत; कारण, जर हीं वर्तमानकालवाचक धातुसाधितें ह्मणावीं, तर यास तृतीयान्त कर्ता आहे; व यां पासून वर्तमानकाळाचाहि स्पष्ट बोध होत नाहीं; यां पासून भूतकाल ध्वनित होतो; आतां जर भूतकालवाचक क्रियापदें मानावीं, तर तांप्रत्ययान्त धातुसाधितें कदापि भूतकालवाचक असत नाहींत; तेव्हां ही दुर्निवार अडचण आहे; इच्या दूरीकरणास वर जो नियम सांगितला त्या शिवाय दुसरी सयुक्तिक कल्पना मला दिसत नाहीं. 'धन्यानें हाक **मारतांच**', 'एकानें आंब्यास हात **लावतांच**', 'त्याणें पिशवींत हात **घालतांच**', 'राजानें आज्ञा **करतांच**', ह्मणजे हाक **मारिली तोंच**; हात **लावला तोंच,** हात **घातला तोंच**, आज्ञा **केली तोंच,** यांत **तोंच** या सावधारण शब्दाच्या योगानें-**मारली, लावला,** यांतील **ला** प्रत्ययाचा लोप होऊन **मार, लाव,** हीं रूपें अवशिष्ट राहिलीं, आणि **तोंच** यांतील तोंच्या स्थानीं **तां** आदेश होऊन-**मारतांच, लावतांच,** अशीं रूपें झालीं आहेत. **घालतांच, करतांच** यांत हें हाच नियम उमगावो; पादा,-**तोंच** याच्या योगानें **घातला**, केली, यांतल्या **ला** प्रत्ययाचा लोप झाला असतां तन्निमित्त जें **घाल, कर,** या धातूंस **घात, के,** एतदादेशरूप कार्य त्याचाहि नाश होऊन-**घाल, कर,** हीं जीं मूळचीं रूपें तींच राहिलीं; कारण निमित्ताभावेनैमित्तिकस्याप्यभावः- ह्मणजे निमिताचा नाश झाला असतां नैमित्तिक कार्याचाहि नाश होतो, असा न्याय आहे; तेव्हां-**घाल, कर,** अशीं रूपें अवशिष्ट राहून **घालतांच, करतांच,** अशीं रूपें झालीं असें जाणावें.

## नियम २४.

६१० समासघटित शब्दांत, मध्येंच उभयान्वयी अव्ययें आणून एका पदांचा अन्वय, या अव्ययानें निराळे पडले जे शब्द, त्यांशीं लावूं नये; जसें—'सन्मार्ग आणि सद्धर्मप्रवर्तक जे आचार्य', हा वाक्यांश—'सन्मार्गसद्धर्मप्रवर्तक जे आचार्य', अथवा,—'सन्मार्गप्रवर्तक आणि सद्धर्मप्रवर्तक जे आचार्य', असा पाहिजे; अथवा— 'सन्मार्ग आणि सद्धर्म यांचे प्रवर्तक जे आचार्य', असा पाहिजे; कारण, **आणि** हें उभयान्वी अव्यय मध्यें आल्या मुळें **सद्धर्मप्रवर्तक** या समासघटित शब्दांतील **प्रवर्तक** या पदाचा अन्वय **सन्मार्ग** याशीं होत नाहीं.

**ज्ञापक, वाचक, बोधक, सूचक, दर्शक, विशिष्ट, पूर्वक**, इत्यादि प्रकारचे शब्द, वाक्यांत अनेक शब्दांस जोडायाचे असतां सर्वांस पृथक् पृथक् न जोडितां, अथवा, उभयान्वयी अव्यय मध्यें आणून शेवटल्या शब्दास नजोडितां, त्या सर्व शब्दांच्या पुढें **हा** किं० **असा** या सर्वनामाचा प्रयोग करून त्या शब्दांतून जी ज्यास अनुकूल विभक्ति असेल तींत तें सर्वनाम आणून, त्याशीं हे शब्द जोडावे, हा उत्तम पक्ष. समयविशेषीं ते दोन शब्द असले तर यांतून एकेका शब्दांशीं हे शब्द पृथक् पृथक् जोडिले असतां, अथवा, ते एका योग्यतेचे प्रौढ संस्कृत शब्द दोहीं पेक्षां अधिक असले तऱ्ही त्यांस समासांत आणून मग त्यांशीं हे शब्द जोडिले असतां, चिंता नाहीं; परंतु तिहीं पेक्षां अधिक शब्द असतां वर नियम सांगितला तोच चालवावा. उदाह०—'संबंध अथवा अधिकरणवाचक', अशी योजना करूं नये;—'संबंधवाचक अथवा अधिकरण-

वाचक', अशी योजना करावी; अथवा, 'संबंध अथवा अधिकरण यांचे वाचक', अशी योजना करावी. मध्यें समुच्चयार्थवाचक अव्यय नसल्यास—'संबंधाधिकरणवाचक', अशीहि योजना करावी. परंतु प्रथम जी योजना दाखविली ती केवळ अशुद्ध जाणावी; तसेंच— 'काम, क्रोध, मोह, आणि मत्सरप्रेरित जीं जीं कर्मे', ही योजना अशुद्ध जाणावी. 'कामक्रोधमोहमत्सरप्रेरित जीं जीं कर्मे', अशी योजना असावी; अथवा,—'काम, क्रोध, मोह, आणि मत्सर, यांनीं प्रेरित जीं जीं कर्मे', अशी शुद्ध मराठी योजना असावी. 'सौजन्य, सौंदर्य, सरलता, किंवा नम्रताविशिष्ट पुरुष कोणत्याहि कुळांत जन्मलेला असला, तथापि तो प्रीतीस पात्र होतो', ही वाक्यरचना अशुद्ध जाणावी— 'सौजन्य, सौंदर्य, सरलता, किंवा नम्रता, येणेंकरून विशिष्ट पुरुष इ०', अथवा,—सौजन्य, सौंदर्य, सरलता, किंवा नम्रता यांतून कोणत्याही गुणानें विशिष्ट पुरुष इ०, अशी वाक्यरचना असावी. 'आदर, स्नेह, आणि नम्रतापूर्वक जें भाषण', अशी योजना असूं नये;—'आदर, स्नेह, आणि नम्रता, एतत्पूर्वक जें भाषण', अथवा,—आदरस्नेहनम्रतापूर्वक जें भाषण, अशी योजना असावी.

## नियम २५

६११ रूढींत असल्या शिवाय बहुधा प्राकृत आणि संस्कृत शब्दांचा परस्परांशीं समास करूं नये; 'घरप्रवेश', 'गांवप्रदाक्षिणा', 'हत्तीचर्म', 'टोळउंदीरअग्निउपद्रव', 'श्यामरक्तरंग', 'आम्लकटुखारटऔषध', 'ढालतरवारबंदूकबाणादि शस्त्रें', इ० असा संस्कृत आणि प्राकृत शब्दांचा

विजातीय संकर कदापि करूं नये; हे शब्द— 'ग्रहप्रवेश', 'ग्रामप्रदक्षिणा', 'हस्तिचर्म' अ० गजचर्म, 'टोळ, उंदीर, अग्नि, यांचा उपद्रव', अ०, 'शलभमूषकाग्न्युपद्रव', 'काळा आणि तांबडा रंग', अ०, 'शामरक्तवर्ण', 'आंबट, कडू, आणि खारट असें औषध', अ०, 'आम्लकटुक्षारौषध', 'ढाल तरवार, बंदूक, बाण, आदिकरून शस्त्रें,'— असे असले पाहिजेत.

**राज्यकारभार, बायकोमनुष्य, बापजन्मीं, गांवदेवी, पायमार्ग, मालधनी, राजदरबार, राजवाडा, अंगमर्दाई,** इत्याद्यनेक शब्द रूढींत आल्या मुळें त्यांज वर आतां दुःसह विजातीयसंकरत्वाची छाया मारत नाहीं; हें, आणि यांच्या कोटींतले सहस्रशः आणखी शब्द, आतां कर्णास सुसह झाले आहेत; ह्मणोन वरल्या नियमांत जो निषेध केला आहे, तो अशा रूढींत आलेल्या शब्दां विषयीं लागू होत नाहीं.

## नियम २६.

६१२ वाक्यांत शब्दांची मागें पुढें योजना करायाची ती ज्या ज्या शब्दांशीं ज्या ज्या शब्दांचे यथार्थ अन्वय असतात, त्या त्या प्रमाणें करावी; ह्मणजे, प्रथम कर्ता, त्या पुढें कर्म, आणि शेवटीं क्रियापद, असें असावें; विशेषण, अथवा विशेषणरूप शब्द, त्याच्याच विशेष्याच्या मागें असावा; धातुसाधितें प्रथम येऊन पुढें शेवटीं त्याच वाक्यांतील अथवा वाक्यांगांतील मुख्य जें क्रियापद तें यावें; संबंधी सर्वनाम प्रथम येऊन तदनंतर त्याचें प्रतिसंबंधी जें दर्शक सर्वनाम असेल तें यावें; असे अनेक नियम आहेत. उदाह०— 'गणू पोथी लिहितो'; 'अशा विद्वान मनुष्यानें जर या शाळेचें काम अस्थापूर्वक चालविलें, तर

विद्यार्थी लौकर तयार होतील'; 'तो आतांच येऊन गेला', जो याचक जें जें जितकें मागे, 'त्यास तो उदार गृहस्थ तें तें तितकें देई, असा त्याचा या गावांत मोठा लौकिक आहे'

हा नियम फार उपयोगी आहे, याज वर शिकणाराचें फार लक्ष असावें. या नियमास आणखी गौण नियम व बाधकेंहि पुष्कळ आहेत, त्यांच्या विचारांत पडलें असतां ग्रंथविस्तार फार होईल, ह्मणोन या प्रसंगीं इतकेंच सांगतो कीं आपल्या अभिप्रायानुरूप वाक्यरचना करण्याचें ज्यास अगत्य वाटत असेल, त्याणें या नियमा वर मुख्यत्वें करून लक्ष द्यावें.

या प्रमाणें वाक्यरचने संबंधीं जे कित्येक मुख्य नियम प्रसंगीं सुचले ते मीं एथें लिहिले.

## खंड ७

### लेखनपद्धति.

६१३ मराठी भाषेंत गद्यात्मक ग्रंथ लिहिण्याची विशेष प्रवृत्ति नव्हती; महाराष्ट्र देशांत जे जे ग्रंथकार आणि कवि झाले त्यानीं ओंव्या, श्लोक, आर्या, अभंग, पदें, सवाया, कटिबंध, साक्या, लावण्या, इत्याद्यनेक प्रकारचे छंद बांधून पद्यात्मक ग्रंथ पुष्कळ लिहून ठेविले आहेत, परंतु पूर्वोक्तप्रकारें ग्रंथ लिहिण्याची अलिकडेस नूतन प्रवृत्ति पडली आहे; आणि मागल्या पंचवीस वर्षांत, जितके व्हावे तितके तर नाहींत, परंतु बरेच ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत, व पुढें उत्तरोत्तर अधिकाधिक होत जातील असा संभवहि होतो, ह्मणोन या ग्रंथाच्या शेवटीं लेखनपद्धती विषयीं कांहीं उपयुक्त नियम सांगणें आवश्यक

आहे; कारण, मराठी लिहिण्यांत अद्यापि अव्यवस्था फार आढळते; ती मोडून टाकून सर्वांची लेखनपद्धति सारखी करण्या विषयीं प्रयत्न करणें फार इष्ट आहे.

१ पंक्तींत शब्द तोडून निरनिराळे लिहावे.

२ समासघटित शब्द एक जाणून एका पंक्तींत अ-व्यवहित असावे; ह्मणजे, ज्या शब्दांचा समास होतो ते पंक्तींत तोडून लिहूं नयेत; जसें—विटीदांडू, काळमांजर, तांबडमाती, भक्तवत्सल, सर्वगुणैकरत्नाकर, अखंडलक्ष्म्य-लंकृतैश्वर्यविराजित, इ०.

३ विभक्त्यंत शब्दां प्रमाणें सामान्यरूपहि तोडून निराळें लिहावें; जसें—त्या मनुष्यानें, झाडाच्या डाहळी वर, मज जवळ, त्या पुढें.

बहुधा सर्वत्र सामान्यरूप पुढल्या शब्दयोगी अव्ययाशीं जोडून लिहिण्याचा परिपाठ पडला आहे; परंतु या व्याकर-णाच्या नियमा प्रमाणें, संबोधना प्रमाणें सामान्यरूप हें एक विभक्तीचें नववें रूप मानिलें आहे, ह्मणोन ज्यास हा नियम मान्य असेल त्याणें वरील नियमास अनुसरावें.

जर सविभक्तिक विशेष्याच्या योगानें जें विशेषणाचें सामा-न्यरूप होतें तें त्या विशेष्याशीं जोडून लिहिण्याचा परिपाठ नाहीं, तर मग शब्दयोगी अव्ययाच्या योगानें झालें जें सामा-न्यरूप तेंच त्या अव्ययाशीं जोडून लिहिण्यास विशेष हेतु कोणता? असु, एथें विकल्प आहे, परंतु हा विकल्प दूर करून सर्वांची लिहिण्याची एक पद्धति पडली असतां बरें आहे.

४ **च, हि, ना,** हीं जीं एकाक्षरी शुद्ध शब्दयोगी अव्ययें तीं तोडून लिहूं नयेत; ज्या शब्दांशीं यांचा योग असतो त्यांशीं जोडून लिहावीं; जसें—'चतुष्पदांत हत्तीसच सोंड आढळते', 'तूंहि ये', 'तो तेथें जायेना', इ०.

५ तृतीयार्थदर्शक जें **करून** हें शब्दयोगी अव्यय, त तृतीयान्त शब्दांशीं जोडून लिहिण्याचा परिपाठ पडला आहे; जसें—तेणेंकरून, याणेंकरून, त्यांहींकरून, यांहींकरून इ०.

६ वाक्यां मध्यें जे सावधारण व सांकेतिक शब्द असतील, ह्मणजे ज्या शब्दां कडेस वाचणाराचें लक्ष विशेष असावें असा लिहिणाराचा अभिप्राय असेल, ते शब्द चालत्या अक्षरांहून कांहीं भिन्न तऱ्हेनें लिहावे; जसें—'बहुधा **सासू** आदिकरून शब्दांचीं **सासवेला, सासवेस,** अशीं रूपें लिहिण्याचा प्रघात पडला आहे'.

७ **असा, अहो, अरे, अगे,** हे शब्द इतर शब्दांशीं जुळून लिहिले असतां, यांतील अचा लोप होतो; जसें—'तो जातोसा दिसतो', 'ती आजारीशी दिसत्ये', 'गडेहो तुह्मी असें करूं नका', 'भवरे तरा आपहो', 'बाईगे माझा धंदा', इ०.

## भाग १.

## विरामचिन्हें.

६१४ अलिकडेस जे मराठी भाषेंत ग्रंथ होतात, त्यांत इंग्लिश भाषेंतील ग्रंथांच्या नियमां प्रमाणें विरामचिन्हें देण्याचा प्रघात पडला आहे; आणि, वाक्यार्थ स्पष्ट होण्या करितां या चिन्हांचा उपयोग फार आवश्यक आहे, यांत अगदीं भ्रांति नाहीं; ह्मणोन त्यां विषयींचे जे नियम आहेत ते एथें संक्षेपरूपानें तरीं सांगितले पाहिजेत. परंतु ते सांगायाच्या पूर्वीं विरामचिन्हें दाखविलीं पाहिजेत.

| विरामचिन्हें. | संज्ञा. |
| --- | --- |
| , | स्वल्पविराम. |
| ; | अर्धविराम. |
| : | अपूर्णविराम. |
| . | पूर्णविराम. |
| ? | प्रश्नचिन्ह. |
| ! | उद्गारचिन्ह. |
| — | संयोगचिन्ह. |
| “ ” | अवतरणचिन्ह. |
| ( ) | कौंस. |

६१५ जें वाक्य सरळ आहे, ह्मणजे ज्यांत दुसरीं वाक्यें अथवा वाक्यांगें नाहींत, त्यांत विरामचिन्हें लिहिण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. जसें—वाघ रानांत असतो. गाई पेक्षां ह्मैस अधिक दूध देत्ये. राजा न्यायेंकरून प्रजेचें पालन करितो. या आपल्या महाराष्ट्र देशांत व्याकरणरीतीनें शुद्ध लिहिण्याची चाल आतां आतां पडत चालली आहे.

## स्वल्पविराम.

६१६ सरळ वाक्यांत जर दुसरीं वाक्यें अथवा दुसरीं वाक्यांगें आलीं, तर त्या वाक्यांच्या अथवा वाक्यांगांच्या पूर्वी व शेवटीं स्वल्पविराम घातले पाहिजेत; जसें—‘एक मुलगा, आपल्या आंधळ्या बापास हातीं धरून, भीक मागत होता’. ‘मनुष्यानें जर आपल्या सामर्थ्याचा विचार नकेला, आणि एकाद्या कार्यास हात घातला, तर तो बहुधा फसल्या वांचून राहणार नाहीं’.

यांत प्रथम उदाहरणांत–'एक मुलगा भीक मागत होता', हें सरळ वाक्य, यांत–'आपल्या बापास हातीं धरून', हें दुसरें अपूर्ण वाक्य अथवा वाक्यांग मध्यें आलें आहे, तेव्हां याच्या आरंभीं व शेवटीं स्वल्प विराम देऊन यास निराळें पाडिलें आहे. कोणी हें सर्व सरळ वाक्य मानितात तेव्हां हे स्वल्पविराम न दिले तरीं विशेष बाध येतो असें नाहीं. याच प्रमाणे दुसरें उदाहरण जाणावें

[अ] जर वाक्या मध्यें दोन तीन अथवा अधिक कर्तें, अथवा कर्में, अथवा धातुसाधितें, अथवा क्रियापदें, अथवा कोणत्याहि एका जातीचे शब्द एका पुढें एक आले, तर त्यां मध्यें स्वल्पविराम घालून ते शब्द निरनिराळे दाखवावे; जसें–'रामा, हरी, गोपाळा, यमुना, आणि इचा बाप गोपाळशेट, इतकीं मनुष्यें जेवायास आलीं होतीं'. 'म्यां काल एका वाडींत कुत्रा, मांजर, आणि कोंबडा, यांस झुंजतां पाहिलें'.'त्या मुलीस लिहितां, वाचतां, गातां, नाचतां, आणि शिवतां येतें'. 'तो गेला, फसला, मेला, तरीं मीं त्याची गोष्ट मना वर घेणार नाहीं'. 'तो मोठा शहाणा, विचारी, आणि विद्वान् आहे'.

[आ] या प्रकारच्या दोहों शब्दां मध्यें जर उभयान्वयी अव्यय आलें तर स्वल्पविरामाचें प्रयोजन नाहीं. जसें–'बाळा आणि हरी जेवायास बसले आहेत.' 'साळू आणि मनी फुलें आणावयास गेल्या.' 'तो बारीक आणि सुवाच्य अक्षर लिहितो', 'तो एथून तेथें जातो आणि येतो.'

[इ] जर या उभयान्वयी अव्ययाच्या योगाने निरनिराळीं सरळ वाक्यें, अथवा वाक्यांगें पडत गेलीं, तर तीं दाखविण्या करितां स्वल्पविराम दिले पाहिजेत; जसें–'मीं तेथें गेलों, आणि तूं तेथें नसलास, तर मग मात्र कठीण'.

'इतका तिणें विलाप केला, परंतु त्यास दया आली नाहीं', पृथ्वी निराधार आहे ह्मणतां, तर मग ती पडत कां नाहीं?', 'माझें सर्वस्व गेलें, किंबहुना प्राणहि गेला, तथापि मीं असत्य बोलणार नाहीं'.

[इ] वाक्यारंभीं अथवा वाक्यांत कोठेंहि संबोधन आलें, तर त्याच्या पुढें अथवा त्याच्या मागें स्वल्पविराम देऊन त्यास निराळें दाखवावें ; जसें— 'देवा, मला क्षमा कर'. 'बाळा, तूं काल शाळेंत कां गेला नाहींस?' 'रावसाहेब, आपण मज वर दया करावी'.'मीं त्यास ह्मणालों, गड्या, तूं असें करूं नको'.

[उ] वाक्यांत एकाद्या शब्दा पुढें जर त्याचाच पर्यायशब्द आला, तर त्याच्या मागें व पुढें स्वल्पविराम देऊन तो पर्यायशब्द निराळा दाखवावा हें बरें ; जसें—'मुसलमानांचा पैगंबर, महंमद, याची जन्मभूमि मक्का', 'मराठ्यांनीं या काळीं आपली मोठी भयंकर तोफ, महाकाळी किल्ल्या वर चढविली'.

हा नियम सर्वत्र चालतो असें नाहीं; 'माझा भाऊ विश्वनाथ, यास जर तूं पाहशील, तर तूं अधिक विस्मय करशील'— असेंहि लिहिण्याचा प्रचार आढळतो.

[ऊ] **जर** हें अव्यय, किंवा संबंधी सर्वनाम, जर एकाद्या मोठ्या वाक्याच्या आरंभीं असलें, तर अनुक्रमें त्याचें प्रतिसंबंधी जें **तर** हें अव्यय, किंवा पुरुषवाचक सर्वनाम, अथवा दर्शक सर्वनाम, यांच्या मागें स्वल्पविरामचिन्ह दिलें पाहिजे ; जसें— 'ज्या घोड्या वर काल मीं स्वार झालों होतों, तोच आज घेऊन ये'. 'जशी त्याणें आपल्या भावाची अवस्था केली, तशीच तो तुमची करील'. 'या प्रक-

रणांत जर तुह्मीं मला बोलूं देत नाहीं, तर मग तुह्मीं आपलें संभाळा'.

[ऋ] लांब वाक्य असून जर त्यांत वर्तमानकालवाचक, भूतकालवाचक, पूर्वकालवाचक, अथवा विधिवाचक धातुसाधितें आलीं, तर त्यां पुढें स्वल्पविराम द्यावा हें बरें; जसें—'शिवाजी आपल्या बराबर दहा हजार स्वार घेऊन नर्मदा उतरत असतां, त्याची आणि औरंगजेबाच्या स्वारांची गांठ पडली'. 'त्याणें पुण्यास जाऊन, आपणा करितां दरबारांत इतकी मेहनत केली असतां, आतां त्यास या कामांतून दूर करावें, हें मला ठीक दिसत नाहीं'. 'हें वर्तमान ऐकतांच, त्याहीं आपल्या हाता खालच्या सर्व मानकरी लोकांस बलावून, तुह्मीं आतां लागलीच आपली तयारी करून मज बराबर निघावें, असें त्यांस सांगितलें'.

[ॠ] कीं हें अव्यय वाक्यांत असतां याच्या मागें अथवा पुढें स्वल्पविराम देणें, तो बहुधा अर्थास अनुकूल आणि कानास गोड लागे, अशा समजुतीनें द्यावा; जसें—'तो ह्मणाला, कीं आतां जर या कामांत तुह्मां कडून सुस्ती झाली, तर मज कडेस दोष नाहीं'. 'त्या कामाचा त्याणें उलगडा केला, तो असा कीं, ज्याणें ही मसलत प्रथम दिली, त्याणें तें नुकसान भरावें'.

[ऌ] दुसऱ्याचा स्वल्प लेख अथवा म्हणणें जर वाक्यांत आणायाचें असलें, तर त्या लेखाच्या अथवा म्हणण्याच्या आरंभीं व शेवटीं स्वल्पविराम द्यावा; जसें—'साहेब म्हणतात, तुम्हीं येऊं नका, मींच येईन'.

### अर्धविराम.

६१७ जेथें एकादें मोठें सरळ वाक्य संपतें, आणि पुढें दुसऱ्या वाक्यास आरंभ होतो, अथवा एकादें मोठें लांब वाक्य आहे, आणि त्यांत एका अर्थास मुख्य करून त्याचे सोईवार विभाग करून तें वाक्य जोडायाचें असलें, तर हीं विभक्त केलेलीं जीं निरनिराळीं त्याच्या पोटांतलीं वाक्यें, त्या पुढें अर्धविराम द्यावा; जसें— 'ईश्वराची भक्ति मनानें केली पाहिजे; मनाचें अर्पण नकरितां नुसत्या द्रव्याचें अर्पण केल्यानें देव प्रसन्न होईल असें दिसत नाहीं; आणि या प्रकारें महंतांचीं वाक्येंहि आहेत; परंतु त्यांचा लोक अगदीं विचार करित नाहींत.'

### अपूर्णविराम.

६१८ एकाद्या लांब आणि पूर्ण वाक्यांत सरळ वाक्यरूपानें अथवा वाक्यांगरूपानें विभाग पडले असतात, तेथें जेव्हां एकाद्या उक्तार्थाचें समर्थन करण्यास कांहींसें दृष्टांतरूप वाक्यांतर प्रविष्ट करावें लागतें, तेव्हां अशा वाक्यांतराच्या पूर्वीं अपूर्णविराम द्यावा लागतो; उदाह०—ईश्वरभक्तिपरायण साधु सर्व देशांत होऊन गेले आहेत; ते सारे असेंच ह्मणतातः दुराचरणानें देवास क्रोध येतो, आणि सदाचरणानें देव प्रसन्न होतो; ह्मणोन हीच गोष्ट प्रमाण.

हें अपूर्णविरामाचें चिन्ह बहुधा कोठें आढळत नाहीं, याच्या ठिकाणीं या ग्रंथांत बहुधा—असें संयोगचिन्ह मांडलें आहे. कोणीं याच्या स्थानीं स्वल्पविराम देतात, व कोणीं अर्धविरामहि देतात; परंतु यांत सूक्ष्म भेद वर सांगितल्या प्रमाणें आहे तो शिकणारांनीं लक्षांत ठेविला असतां बरें आहे.

### पूर्णविराम.

६१९ उद्देश्यार्थाचें यथेष्ट विधान होऊन त्या अर्थाचा

संबंध नराहतां वाक्य संपतें तेथें पूर्णचिन्ह करावें; जसें— रामा आला. सावित्रीनें पाणी आणिलें. एका कुळंब्यानें एक हरण धरिला, आणि तो त्यास माहित होता, इतक्यांत एका गृहस्थानें तो त्या जवळून विकत घेतला. पुढें हें त्याचें सदाचरण त्यास लौकरच फळास आलें. ही कथा फारच लांब आहे ह्मणोन मीं एथें सांगत नाहीं.

## प्रश्नचिन्ह.

६२० ज्या वाक्यांत प्रश्न करायाचा तें वाक्य जेथें संपतें तेथें प्रश्नचिन्ह मांडावें; जसें—'तूं कोण आहेस?'. 'तूं कोठें जातोस?'. 'तुह्मी मला इतकें सांगतां, तर मग तुह्मीच कां करित नाहीं?

## उद्गारचिन्ह.

६२१ ज्या शब्दांत, अथवा ज्या वाक्यांत हर्षशोकाविस्मयादि मनोविकारांचें उल्लेखन असतें, त्या शब्दा पुढें, अथवा त्या वाक्याच्या शेवटीं, उद्गारचिन्ह मांडावें; जसें— अहा!. कायहो मौज ही!. अरे देवा, या दुष्टांनीं आमची कशी विटंबना मांडली आहे! रावसाहेबां कडेस काल लग्नाचा केवढा समारंभ जमला होता!.

[अ] मनोविकाराचें बाहुल्य दाखवायाचें असतां समयविशेषीं दोनतीनहि उद्गारचिन्हें लिहितात; जसें— 'दुष्टां पासून अपकार होणें हा स्वभावच होय, परंतु अशा साधूं पासून इतकी अन्यायाची गोष्ट झाली, यांत किती आश्चर्य आहे तें पाहा!!!'.

## संयोगचिन्ह.

६२२ एकाच शब्दांतील कांहीं अक्षरें लिहून ओळ

संपल्या मुळें बाकीचीं अक्षरें पुढल्या ओळीशीं जोडायाचीं असतां, अथवा एकाद्या मोठ्या वाक्यांत मध्येंच एकादें वाक्य अथवा वाक्यांग प्रविष्ट करायाचें असतां, अथवा उक्तार्थ वाक्यांतरेंकरून दाखवायाचा असतां, त्या दोहीं अक्षरां मध्यें, आणि त्या प्रविष्ट वाक्याच्या मागें, अथवा कोठें मागें आणि पुढें, संयोगचिन्ह मांडितात. जसें— संसारोपयोगी जे अन्नवस्त्रादि पदार्थ. तुकोबाहि असेंच ह्मणतात,—तीर्थी जाउनियां काय तुवां केलें, चर्म प्रक्षाळिलें वरच्यावरी. तुकोबाहि ह्मणतात—जित्या पित्रा नमिळे अन्न, मेल्या वर पिंडदान—मग तुमचेंच अज्ञान प्रमाणभूत मानावें हें आह्मास योग्य वाटत नाहीं.

यांत पहिल्या उदाहरणांत, तुकोबा जें काय ह्मणतो तें या संयोगचिन्हानें लागलेंच त्या पुढें दाखविलें जातें. दुसऱ्या उदाहरणांत या दोन संयोगचिन्हांनीं तुकोबाच्या ह्मणण्याचा ग्रंथकाराच्या वाक्यांत मध्येंच संग्रह दाखविला जातो, असा यांत भेद जाणावा.

## अवतरणचिन्ह.

६२३ वाक्यांत अथवा ग्रंथांत वाक्यांतराचा, अथवा ग्रथांतरांतील एकादा वेंचा घेऊन त्याचा, संग्रह कर्तव्य असतां, तें वाक्यांतर अथवा तो वेंचा " " या अवतरणचिन्हाच्या मध्यें आणावा; जसें— 'एथें जो **ऊहापोह** शब्द योजिला आहे, त्याचा हा लाक्षणिक अर्थ जाणावा; याचा मूळ अर्थ मराठी कोशांत असा लिहिला कीं, "यथाकथंचित् लिहिलेलें किंवा ऐकलेलें जे श्लोक, वाक्य, किंवा कोणेकाचें भाषण, इ० त्याचा यथास्थित सुसंगतपणा

करायासाठीं इकडचें पद तिकडे, तिकडचें पद इकडे, किंवा कांहीं अंश गाळावा, कांहीं नवें आपलें पदरचें आंत घालावें, अशी विचारपूर्वक जी योजना तो", या वर वाचणारानें मुख्य दृष्टि ठेविली असतां इतका वादविवाद होणार नाहीं'.

ग्रंथांतरांतून एकादें मोठें अवतरण केलें असलें तर बहुधा तें जाणावया करितां त्याच्या आरंभा पासून शेवट पर्यंत दर पंक्तीच्या आरंभीं " " असें चिन्ह करितात. उदाहरणा करितां लहानसें अवतरण असलें, तर ' ' या प्रमाणें एक एक उलटा स्वल्प विराम द्यावा ह्मणजे पुरे.

### कौंस.

६२४ एकाद्या पूर्ण वाक्यांत शब्दांचा क्रम यथास्थित चालत असतां लिहिणारास मध्येंच कांहीं नवें सांगायाचें सुचलें, आणि तें लिहणें तेथें गौण असलें, तर तें कौंसांत घालितात; जसें—'कित्येक अकारान्त स्त्रिलिंग नामाचें अनेकवचन आकारान्त होतें, (पाहा, पृ० ४४ वें, लेख १४० वा.) परंतु तीं नामें जर धातू पासून व्युत्पन्न झालेलीं आणि द्व्यक्षरी असलीं, तर त्यांच्या अनेकवचनीं बहुधा ई विकार होतो (पाहा. पृ० ४५, ले० १४१).

या प्रमाणें संक्षेपेंकरून लेखनपद्धती विषयींचे मुख्य मुख्य नियम सांगितले.

## खंड ८.

### वाचनविचार.

६२५ मागल्या प्रकरणांत लेखना विषयीं जसे नियम सांगितले तसे वाचना विषयीं सांगतां येत नाहींत; कांकीं वाचनाक्रिया स्वराधीन पडली; तथापि तिज विषयीं कांहीं

सुचना करणें इष्ट होय. वाचन ही एक कला होय; तिचें मुख्य फल हें कीं ग्रंथकाराचा अथवा लिहिणाराचा जो अभिप्राय तो ऐकणाराच्या मनांत व्याख्यानादि साधनांतरास नअनुसरतां यथास्थित, व शीघ्र, भरून देणें. ही-फलसिद्धि वाचनकालीं विराम, स्वराघात, उदात्तानुदात्तादि स्वरभेद, यांज वर नीट लक्ष दिल्या वांचून यथास्थित होत नाहीं; इतकेंच नाहीं, परंतु जर यां विषयीं दुर्लक्ष केलें तर समयविशेषीं अर्थाचे अनर्थहि होतात. या विषयीं एक दंतकथा आहे, तिचा दृष्टांत बहुधा लोकांत वाचण्या पासून अर्थाचा अनर्थ झाला ह्मणजे देत असतात; तिणें करून शुद्ध व चांगल्या रीतीनें वाचण्याचा उपयोग जसा शिष्यांच्या मनांत ठसेल, तसा त्यांच्या गुरूच्या मोठ्या पांडित्यानें ठसणार नाहीं. ह्मणोन मीं ती कथा एथें सांगतों;—पूर्वीं कोणा एका न्यायाधीशानें एका चोरास धरून त्याज वर अपराध लागू केला, आणि त्यास योग्य शिक्षा देऊन, पुढें त्याणें अशी वर्त्तणूक करूं नये ह्मणोन त्याज जवळून मुचलका लिहून घेतला कीं, 'मीं आज पासून चोरी करणार नाहीं केली असतां मला मारावें'. तोच चोर त्या उपरांत पुनः एकदां चोरीच्या अन्यायांत सांपडला; त्या काळीं त्या न्यायाधीशानें त्याचा मुचलका आणवून त्यास तो न्यायसभेंत वाचायास सांगितला, तेव्हां त्याणें त्या सभे पुढें या प्रमाणें वाचला—'मीं आज पासून चोरी करणार, नाहीं केली तर मला मारावें'. यांत त्याणें **करणार** या शब्दा पुढें विराम घेऊन सर्व सभासदांस हंसविलें, आणि कायद्या बरहुकूम आपणास शिक्षा लाग होत नाहीं ह्मणोन न्याया-

धीशा बराबर तकरार करूं लागला. सारांश, वाचण्यांत विरामादि जीं वाचनाचीं अंगें त्यांज वर लक्ष देणें फार आवश्यक आहे.

६२६ ग्रंथांत अथवा लेखांत जेथें **स्वल्पविराम** असेल तेथें किंचित्* विराम घ्यावा, आणि पुढें वाचूं लागावें; जसें—'रामा, गोपाळा, आणि सावित्री, हीं जर माझ्या घरीं आलीं, तर मीं त्यांचा मोठा सत्कार करीन,' यांत—रामा, गोपाळा, आणि सावित्री, या शब्दां पुढें स्वल्प विराम घेऊन पुढें **आलीं** या शब्दां पुढें तितकाच विराम घेऊन हें वाक्य वाचावें. 'मनुष्यानें जर आपल्या सामर्थ्याचा विचार नकेला, आणि एकाद्या कार्यास हात घातला, तर तो बहुधा फसल्या वांचून राहणार नाहीं.' या वाक्यांत **नकेला**, आणि **घातला**, या शब्दां पुढें स्वल्पविराम घेऊन हें वाक्य वाचावें.

६२७ जेथें **अर्धविराम** असेल, तेथें स्वल्पविरामाच्या दुप्पट विराम घेऊन वाचावें; जसें—'तूं जें मज जवळ बोललास, तें त्याच्या भावानें त्यास जाऊन सांगितलें; त्याणें तें रावजींच्या काना वर घातलें; बरें, रावजी इतके थोर गृहस्थ ह्मणवितात, त्यांणीं ह्मटलें असतां ही गोष्ट पोटांत ठेवायाची होती; तसें नकरितां त्यांणीं ती गोष्ट या नारदमुनीस सुचविली; मग हा अनर्थ कसा झाला ह्मणून पुसतोस हें आश्चर्य'. या वाक्यांत-**सांगितलें**, **घातलें**, **होती**, आणि **सुचविली**, या शब्दां पुढें स्वल्पविरामाच्या दुप्पट काळ घेऊन वाचावें.

---

* वाचणारा जितक्या त्वरेनें वाचित असेल, तितक्याच त्वरेनें **एक** हा शब्द उच्चारायास जितका काळ लागेल, तितका काळ.

६२८ जेथें **पूर्णविराम** असेल, तेथें तें वाक्य संपलें असें जाणून यथेच्छ विराम द्यावा; जर पुढलें वाक्य आरंभायाचें असलें तर अर्धविरामाच्या दुप्पट काळ एथें विराम घेऊन पुढें वाचावें. 'एका कुळंब्यानें एक हरण धरिला; आणि तो त्यास मारित होता, इतक्यांत एका गृहस्थानें त्यास त्याज जवळून विकत घेतलें. पुढें हें त्याचें सदाचरण त्यास लौकरच फळास आलें. ही कथा फार लांब आहे ह्मणोन मीं एथें आतां सांगत नाहीं.' यांत तीन पूर्ण वाक्यें आहेत, तीं—**घेतलें**, **आलें**, आणि **नाहीं**, या शब्दांच्या शेवटीं संपत गेलीं, ह्मणोन यां पुढें यथेच्छ विराम द्यावा; अथवा, **धरिला** या पुढें जितका विराम घेतला त्याच्या दुप्पट यां पुढें विराम घेऊन वाचित जावें.

६२९ ज्या वाक्यांत **प्रश्नचिन्ह** असेल, तें वाक्य दुसऱ्यास प्रश्न करतांनां ज्या स्वरभेदानें बोलतों, त्याच स्वरभेदानें वाचावें; जसें— 'तो कोण तेथें बसला आहे?'. 'तूं कोठें जातोस?,' 'ही काय रावजींची कन्या?.'

६३० जेथें **उद्गारचिन्ह** असतें, तेथें हर्षशोकविस्मयादि जे मनोविकार त्यांचें उद्घाटन कर्तव्य असतां ज्या स्वरभदानें बोलतों त्याच स्वरभेदानें तें वाक्य वाचावें; जसें— 'हरहर!,' 'कायहो अनर्थ हा!,' 'रावसाहेबां कडेस काल लग्नाचा केवढा समारंभ होता!,' 'अरे देवा, या दुष्टांनीं आमची कशी विटंबना मांडिली आहे!.'

६३१ वाक्यांत अनेकार्थदर्शक अनेक शब्द असतात, त्यांतून एकाद्या अर्था विषयीं कांहीं विशेष विधान कर्तव्य असलें, अथवा विशेषेंकरून त्या विषयींच कांहीं

सांगायाचें अथवा पुसायाचें असलें, तर जसा बोलण्यांत तसा वाचण्यांतहि तदर्थदर्शक शब्दा वर स्वराघात द्यावा, ह्मणजे तो शब्द त्या वाक्यांत विशेष नेट देऊन वाचावा. हें आतां उदाहरणांनीं स्पष्ट करून दाखवितों.

| **प्रश्न.** | **उत्तर.** |
| --- | --- |
| **तूं** आज किल्यांत चालत जाशील? | नाहीं, माझा भाऊ जाईल. |
| तूं **आज** किल्यांत चालत जाशील? | नाहीं, उद्यां जाईन. |
| तूं आज **किल्यांत** चालत जाशील? | नाहीं, मीं वाळुकेश्वरीं जाईन. |
| तूं आज किल्यांत **चालत** जाशील? | नाहीं, घोड्या वर बसून जाईन |
| तूं आज किल्यांत चालत **जाशील?** | नाहीं, किंवा होय. |

पहा, यांत प्रश्न तर एकच, परंतु पुसणाराच्या अभिप्रायानुरूप त्या त्या शब्दा वर स्वराघात दिल्यानें उत्तरेंहि भिन्न भिन्न येत गेलीं. या वरून ग्रंथकाराच्या अभिप्रायानुरूप वाचणें किती आवश्यक आहे हें स्पष्ट होतें.

## खंड ९.

### व्याकरणपदच्छेद करणें, अ० व्याकरण सांगणें.

६३२ कोणत्याहि एकाद्या वाक्याचा व्याकरणदृष्ट्या पदच्छेद करणें, ह्मणजे आरंभा पासून शेवटा पर्यंत त्यांतील सर्व शब्दांचा अथवा त्यांतील एका एका शब्दाचा प्रकार व्याकरणरीतीनें दाखविणें, ह्मणजे त्याचें लिंगवचनविभक्त यादि

भेद सांगणें, आणि त्या वाक्यांत शब्दांचा अन्योन्यसंबंध कसकसा आहे हें सांगणें, यास **व्याकरणपदच्छेद करणें**, अथवा **व्याकरण सांगणें** ह्मणावें. हा व्याकरणपदच्छेद, वाक्यार्थाच्या यथार्थज्ञानाची किल्ली होय; ह्मणोन याची पद्धति या ग्रंथाच्या शेवटीं अवश्य सांगितली पाहिजे.

**"रामानें वाघ मारिला".**

**रामानें**— हें **राम** या अकारान्त पुल्लिंगी विशेष नामाचें तृतीयेचें एकवचन; ही कर्तरितृतीया; हा **मारिला** या क्रियापदाचा कर्ता.

**वाघ**— हें अकारान्त पुल्लिंगी सामान्य नामाचें प्रथमेचें एकवचन; ही कर्मणिप्रथमा; हें **मारिला** या सकर्मक क्रियापदाचें कर्म.

**मारिला**— हें क्रियापद, **मार** या सकर्मक धातूचें करणरूपीं, मूलरूपभेदीं, स्वार्थी, भूतकाळीं, पुल्लिंगीं, तृतीय पुरुषाचें एकवचन.

यांत **राम** हा कर्ता, **वाघ** हें कर्म, आणि **मारिला** हें क्रियापद; हा कर्मणिप्रयोग.

**"कृष्णानें साहाय्य करून पांडवाचें रक्षण केलें, अशी कथा आम्हीं काल श्रवण केली."**

**कृष्णानें**— हें **कृष्ण** या अकारान्त पुल्लिंगी विशेष नामाचें तृतीयेचें एकवचन; ही कर्तरितृतीया; हा **केलें** या क्रियापदाचा कर्ता.

**साहाय्य**— हें अकारान्त नपुंसकलिंगी सामान्य नामाचें प्रथमेचें एकवचन; ही कर्मणिप्रथमा ; हें **करून** या सकर्मकधातुसाधित अव्ययाचें कर्म.

**करून**—— हें पूर्वकालवाचक सकर्मकधातुसाधित अव्यय.

**पांडवांचें**—— हें **पांडव** या अकारान्त पुलिंगी विशेष नामाचें षष्ठीचें अनेकवचन; ही संबंधी षष्ठी; इचा **रक्षण** या नामा कडे संबंध.

**रक्षण**- - हें अकारान्त नपुंसकलिंगी धातुसाधित नामाचें प्रथमेचें एकवचन; ही कर्मणिप्रथमा; हें **केलें** या सकर्मक क्रियापदाचें कर्म.

**केलें** हें क्रियापद, **कर** या सकर्मक धातूचें करणरूपीं, मूलरूपभेदीं, स्वार्थी, भूतकाळीं, नपुंसकलिंगीं, तृतीय पुरुषाचें एकवचन.

यांत **कृष्ण** हा कर्ता, **रक्षण** हें कर्म, आणि **केलें** हें क्रियापद; हा कर्मणिप्रयोग.

**अशी**—— हें विशेषण, याचें विशेष्य **कथा.**

**कथा**—— हें आकारान्त स्त्रीलिंगी सामान्य नामाचें तृतीयेचें एकवचन; ही कर्मणिप्रथमा; हें **श्रवण केली** या सकर्मक संयुक्त क्रियापदाचें कर्म.

**आम्हीं**—— हें **मीं** या पुरुषवाचक सर्वनामाचें सामान्य लिंगीं प्रथम पुरुषाचें तृतीयेचें अनेकवचन; ही कर्तरितृतीया; हा **श्रवण केली** या क्रियापदाचा कर्ता.

**काल** - हें क्रियाविशेषण अव्यय, याचा **श्रवण केली** या क्रियापदा कडे संबंध.

**श्रवण केली** — हें क्रियापद; **श्रवण करणें** या सकर्मक संयुक्त क्रियेचें कारकरूपीं, मूलरूपभेदीं, स्वार्थी, भूतकाळीं, स्त्रीलिंगीं, तृतीय पुरुषाचें एकवचन.

यांत **आम्हीं** हा कर्ता, **कथा** हें कर्म, आणि **श्रवण केली**, हें सकर्मक संयुक्त क्रियापद; हा कर्मणिप्रयोग.

**श्रवण करणें, संपादन करणें, भक्षण करणें, दान देणें, दान घेणें, विकत घेणें, पाठ करणें**, इत्यादि प्रकारच्या पदांचा जेव्हां सकर्मक क्रियापदा प्रमाणें प्रयोग करितात, तेव्हां व्याकरण सांगते समयीं यांस संयुक्त क्रियापदें मानून निर्वाह केल्या शिवाय दुसरा उपाय नाहीं.- 'कथा श्रवण केली', 'अर्थ संपादन केला', 'मृत्तिका भक्षण करितें', 'गाई दान देतो'. 'सुवर्ण दान घेतलें', 'वेद पाठ करितात', अशा प्रकारच्या वाक्याचा व्याकरणपदच्छेद करायाचा असतां, **श्रवण करणें, संपादन करणें**, इ०. (पृ० २४९, लें० ५१३ वा, यांत सांगितल्या प्रमाणें ) यांस सकर्मक संयुक्त क्रियापदें मानावें, हा पक्ष मला उत्तम दिसतो. अथवा, **कथा, अर्थ, मृत्तिका, गाई**, इ० या संयुक्त क्रियापदांचीं जीं कर्में त्यांची षष्ठी विभक्ति मानून तिचा लोप मानावा; आणि **श्रवण, संपादन, भक्षण, दान**, इ० शब्द **केली, देतो**, इ० सकर्मक धातूंचीं कर्में मानावीं. या उभय पक्षांत जो ज्यास सयुक्तिक दिसेल तो त्याणें घ्यावा.

आतां **उत्पन्न करणें, निर्माण करणें, प्रकट होणें, दग्ध करणें**, इ० प्रकारचीं पदें हीं पूर्वोक्त संयुक्त क्रियापदा प्रमाणें दिसतात; परंतु विचारानें पाहिलें असतां **उत्पन्न, निर्माण, दग्ध** इ० शब्द संस्कृतांत **क्त**प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणें होत, आणि जीं विशेषणें असतात त्यांस काहीं विशेष नव्हेतां तीं मराठींत क्रियाविशेषणां प्रमाणेंहि प्रयोजिलीं जातात; ह्मणोन, 'ईश्वरानें जग उत्पन्न केलें', 'जगास प्रकाश देण्या करितां भगवंतानें सूर्य आणि चंद्र निर्माण केले', इ० वाक्यांत **उत्पन्न, निर्माण**, हीं **जग, सूर्य**, इ० शब्दांचीं विशेषणें मानावीं. अथवा, यांस त्या

त्या क्रियापदांच्या संबंधानें क्रियाविशेषणें मानावीं; अर्था कडेस लक्ष दिलें असतां मला हा शेवटला पक्ष अधिक ग्राह्य दिसतो.

**"हरी, काय करितोस?"**

**हरी**— हें **हरि** या इकारान्त पुल्लिंग विशेष नामाचें संबोधनाचें एकवचन.

**काय**— हें **काय** या प्रश्नार्थक सर्वनामाचें नपुंसकलिंगीं प्रथमेचें एकवचन; ही कर्मणिप्रथमा; हें **करितोस** या सकर्मक क्रियापदाचें कर्म.

**करितोस**— हें क्रियापद, **कर** या सकर्मक धातूचें करणरूपीं, मूलरूपभेदीं, स्वार्थीं, वर्तमान काळीं, पुल्लिंगीं, द्वितीय पुरुषाचें एकवचन.

यांत तूं हा अध्याहृत कर्ता, **काय** हें कर्म, आणि **करितोस** हें क्रियापद; हा सकर्मक कर्तरिप्रयोग.

**"अंकगणित म्हणजे अंकांनीं मोजण्याची विद्या."**

**अंकगणित**— हें अकरान्त नपुंसकलिंगी सामासिक सामान्य नामाचें प्रथमेचें एकवचन; ही कर्तरिप्रथमा; हा **आहे** अ० **होय** या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता; **अंकगणित** हा तृतीयातत्पुरुष समास.

**म्हणजे**— हें उभयान्वयी अव्यय.

**अंकांनीं**— हें **अंक** या अकारान्त पुल्लिंगी सामान्यनामाचें तृतीयेचें अनेकवचन; ही करणी तृतीया.

**मोजण्याची**— हें **मोजणें** या एँकारान्त नपुंसकलिंगी धातुसाधित नामाचें षष्ठीचें एकवचन; इचा **विद्या** या नामा कडे संबंध.

**विद्या**— हें आकारान्त स्त्रीलिंगी सामान्य नामाचें

प्रथमेचें एकवचन; ही पर्यायार्थी प्रथमा.

यांत **अंकगणित** हा कर्त्ता, आणि **आहे** अ० **होय** हें अध्याहृत क्रियापद; हा अकर्मक कर्तरिप्रयोग.

**"तुझ्यानें आपलीं मुलें पोसवत नसलीं तर त्यांस माझ्या स्वाधीन कां करीनास!"**

**तुझ्यानें**— हें तूं या पुरुषवाचक सर्वनामाचें सामान्य लिंगीं द्वितीय पुरुषाचें सविकरणतृतीयेचें एकवचन.

**आपलीं**— हें **आपण** या सामान्य सर्वनामाचें सामान्य लिंगीं पष्ठीचें एकवचन; इचा **मुलें** या कडे संबंध.

**मुलें**— हें **मूल** या अकारान्त नपुंसकलिंगीं सामान्य नामाचें प्रथमेचें अनेकवचन; ही कर्तरिप्रथमा; हा **पोसवत नसलीं** या क्रियापदाचा कर्त्ता.

**पोसवत नसलीं**—हें क्रियापद, **पोस** या सकर्मक धातूचें अकरणरूपीं, शक्यभेदीं, संशयार्थी, वर्तमान काळीं, नपुंसकलिंगीं, तृतीय पुरुषाचें अनेकवचन.

यांत **मुलें** हा कर्त्ता, **पोसवत नसलीं** हें क्रियापद; हा अकर्मक कर्तरिप्रयोग.

**तर**— हें उभयान्वयी अव्यय.

**त्यांस**— हें **तें** या पुरुषवाचक सर्वनामाचें नपुंसक लिंगीं तृतीयपुरुषाचें द्वितीयेचें अनेकवचन; ही कर्मणिद्वितीया; हें **करीनास** या क्रियापदाचें कर्म.

**माझ्या**— हें **मीं** या पुरुषवाचक सर्वनामाचें सामान्य-लिंगीं प्रथम पुरुषाचें एकवचनीं षष्ठीचें सामान्यरूप, **स्वाधीन** याच्या योगानें.

**स्वाधीन**-- हें क्रियाविशेषण अव्यय ; याचा **करणें** या क्रिये कडे संबंध.

**कां**— हें क्रियाविशेषण अव्यय ; याचा **करणें** या क्रिये कडे संबंध.

**करीनास**— हें क्रियापद ; **कर** या सकर्मक धातूचें अकरणरूपीं, मूलरूपभेदीं, स्वार्थी, वर्तमान काळीं, सामान्यलिंगीं, द्वितीय पुरुषाचें एकवचन.

यांत तूं हा अध्याहृत कर्त्ता, **त्यांस** हें कर्म, आणि **करीनास** हें क्रियापद ; हा सकर्मक कर्तरिप्रयोग.

**"दक्षिण देशीं महिलानगरीच्या समीप एक मोठा वडाचा वृक्ष होता ; त्याज वर मेघवर्णनामा कावळ्यांचा राजा सपरिवार राहत असतां, तेथें ऊरुमर्दन उलूकाधिप समुदाया सह प्रत्यहीं रात्रीस पर्वताच्या गुहेंतून येऊन, वटवृक्षा भोंवता फिरून, जे काक सांपडत त्यांस मारून, जाऊं लागला."**

**दक्षिण**— हें वि०, देशाचें.

**देशीं**—- हें **देश** या अ० पु० सा० ना० स० एक०;

**महिलानगरीच्या**— हें **महिलानगरी** या ई० स्त्री० सामासि० वि० ना० ष० एक० सा० रू०. **समीप** या श० अव्य० योगानें ; हा कर्मधा० समा०.

**समीप**— हें श० अव्य०.

**एक**— हें संख्यावि०, वृक्षाचें.

**मोठा**— हें वि०, वृक्षाचें.

**वडाचा**— हें **वड** या अ० पु० सा० ना० ष० एक०; इचा वृक्षा कडे संबंध.

**वृक्ष**— हें अ० पु० सा० ना प्र० एक०; हीं कर्त० प्र०; हा **होता** या क्रि० कर्ता.

**होता**— हें क्रि०, **अस** या अक० धा०, क० रू०, मू० भे०, स्वा०, भू० का०, पु०, तृ० पुरु० एक०.

यांत **वृक्ष** हा कर्ता, **होता** हें क्रि०; हा अक० कर्त० प्रयोग.

**त्याज**— हें **तो** या पुरु० स० पु० तृ० पुरु० एक० सा० रू०. **वर** या श० अव्य० योगानें.

**वर**— हें श० अव्य०.

**मेघवर्णनामा**—हें सामासि० वि०, **राजाचें**; हा व० समा०.

**कावळ्यांचा**—हें **कावळा** या आ० पु० सा० ना० ष० अने०; इचा संबंध **राजा** कडे.

**राजा**— हें आ० पु० सा० ना० प्र० एक०; हीं कर्त० प्र०; हा **राहत असतां** या धातुसा० अव्य० कर्ता.

**सपरिवार**— हें क्रियावि० अव्य०; याचा **राहत असतां** या धातुसा० अव्य० संबंध.

**राहत असतां**— हें वर्तमानकालवाचक धातुसा० अव्य०

**तेथें**— हें क्रियावि० अव्य०; याचा **येऊन** या धातुसा० अव्य० कडे संबंध.

**ऊरुमर्दन**— हें अ० पु० वि० प्र० एक०; हीं कर्त० प्र०; हा **लागला** या क्रि० कर्ता.

**उलूकाधिप**— हें सामासि० वि०, **ऊरुमर्दनाचें**; हा ष० त० समा०.

**समुदाया**— हें **समुदाय** या अ० पु० सा० ना० सा० रू०, **सह** या श० अव्य० योगानें.

**सह**— हें श० अव्य०.

**प्रत्यहीं**— हें क्रियावि० अव्य०; याचा **येऊन**, या पूर्वकालवाचक धा० अव्य० कडे, संबंध.

**रात्रीस**— हें **रात्र** या अ० स्त्री० सा० ना० द्वि० एक०; हीं अधिकरणीं द्वि०. (अथवा यास क्रियाविशेषण मानिलें तथापि प्रशस्त.)

**पर्वताच्या**— हें **पर्वत** या अ० पु० सा० ना० ष० एक० सा० रू०; **गुहेंतून** या सविभक्तिक विशेष्याच्या योगानें.

**गुहेंतून**— हें **गुहा** या आ० स्त्री० सा० ना० पं० एक०.

**येऊन**— हें पूर्वकालवाचक धातुसा० अव्य०.

**वटवृक्षा**— हें **वटवृक्ष** या अ० पु० सामासि० सा० ना० एक० सा० रू०; **भोंवता** या श० अव्य० योगानें.

**भोंवता**— हें श० अव्य.

**फिरून**— हें पूर्वकालवाचक धातुसा० अव्य०.

**जे**— हें **जो** या सं० स० पु० प्र० अने०; याचा **काक** या शब्दा कडे संबंध.

**काक**— हें **काक** या अ० पु० सा० ना० प्र० अने०; हीं कर्त० प्र०; **सांपडत** या क्रि० क०.

**सांपडत**— हें क्रि०, **सांपड** या अक्र० धा०, क० रू०, मू० भे०, स्वा०, रीं० भू० का०, पु०, तृ० पुरु० अने०.

यांत **काक** हा कर्ता; **सांपडत** हें क्रि०; हा अक्र० कर्त० प्र०.

**त्यांस**— हें **तो** या पुरु० स० पु० द्वि० अने०; हीं कर्म० द्वि०; हें **मारून** या सक्र० धातुसा० अव्य० कर्म.

**मारून**— हें पूर्व कालवाचक धातुसा० अव्य०.

**जाऊं**— हें निमित्तवाचक धातुसा० अव्य०.

**लागला**— हें क्रि०, **लाग** या अक्र० धा०, क० रू०, मू० भे०, स्वा०, भू० का०, पु०, तृ० पुरु० एक०.

यांत **ऊरुमर्दन** हा कर्ता, आणि **लागला** हें क्रि०; हा अक्र० कर्त० प्र०.

**"हें काम तो त्याजकडून कां करवित नसेल? जर हें खरें असलें, तर त्याच्यानें तें करवत नाहीं असें ह्मणायास आह्मांस काय चिंता आहे."**

**हें**— हें द० स०, न० प्र०एक; याचा **काम** या कडे संबंध.

**काम**— हें अ० न० सा० ना० प्र० एक०; हीं कर्म० प्र०; हें **करविन नसेल** या क्रि० कर्म.

**तो**— हें पुरु० स०, पु० तृ० पुरु० प्र० एक०; हो कर्त० प्र०; हा **करवित नसेल** या क्रि० कर्ता.

**त्याज**— हें **तो** या पुरु० स० पु० तृ० पुरु० एक० सा० रू०; **कडून** या श० अव्य० योगानें.

**कडून**— हें श० अव्य०.

**कां**— हें क्रियावि० अव्य०; याचा **करवित न-सेल** या क्रि० कडे संबंध.

**करवित नसेल**—हें क्रि०, **कर** या सक० धा०, अ० रू०, प्र० भे०, संश०, अपू० व० का०, पु०, तृ० पुरु०, एक०.

यांत **तो** हा कर्ता०, **काम** हें कर्म, आणि **करवित नसेल**, हें क्रि०; हा सक० कर्त० प्र०.

**जर**— हें उ० अव्य०.

**हें**— हें द० स०, न० प्र० एक०; हों कर्त० प्र०; हा **असलें** या क्रि० कर्ता.

**खरें**— हें वि०, **हें** याचें.

**असलें**— हें क्रि०, **अस** या अक० धा०, क० रू०, मू० भे०, संश०, भू० का०, न०, तृ० पुरु० एक०.

यांत **हें** हा कर्ता, **असलें** हें क्रि०; हा अक० कर्त० प्र०

**तर**— हें उ० अव्य०.

**त्याच्यानें**— हें **तो** या पुरु० स० पु० तृ० पु० सवि० तृ० एक०.

**तें**— हें द० स० न०, प्र० एक; हीं कर्त० प्र०; हा **करवत नाहीं** या क्रि० कर्ता.

**करवत नाहीं**— हे क्रि०, **कर** या सक० धा०, अ० रू०, श० भे०, स्या०, व० का०, न०, तृ० पुरु० एक०.

यांत तें हा कर्ता, **करवत नाहीं** हे क्रि०; हा अक० कर्त० प्र०.

**असें**— हे द० स०, न० प्र० एक०; याचा संबंध मागल्या वाक्या कडे; हा कर्म० प्र०; हे **म्हणायास** या धातुसा० अव्य० कर्म.

**म्हणायास**— हे धातुसा० अव्य०.

**आम्हांस**— हे **मीं** या पुरु० स० सा० लिं० प्र० पुरु० च० अने०.

**काय**— हे प्र० स०, याचा संबंध **चिंते** कडे.

**चिंता**— हे आ० स्त्री० सा० ना० प्र० एक०; ही कर्त० प्र०; हा **आहे** या क्रि० कर्त्ता०.

**आहे**— हे क्रि०, **अस** या अ० धा०, क० रू०, मू० भे०, स्या०, व० का०, स्त्री०, तृ० पुरु० एक०.

यात **चिंता** हा कर्त्ता, **आहे** हे क्रि०, हा अक० कर्त० प्र०.

**"त्याणें पिश्वींत हात घालतांच त्यास एक मोहर सांपडली."**

**त्याणें**— हे **तो** या पुरु० स० पु० तृ० पुरु० तृ० एक०; हा कर्त० तृ०; हा **घातला** या क्रि० कर्त्ता.

**पिश्वींत**— हे **पिश्वी** या ई० स्त्री० सा० ना० स० एक०.

**हात**— हें अ० पु० सा० ना० प्र० एक०; ही कर्म० प्र०; हें **घातला** या क्रि० कर्म०.

**घातला**— हें क्रि०, **घाल** या सक० धा०, क० रू०, मू० भे०, स्वा०, भूत० का०, पु०, तृ० पुरु० एक०.

यांत **त्याणें** हा कर्त्ता, **हात** हें कर्म, आणि **घातला** हें क्रि०; हा कर्म० प्र०. (पाहा पृ० ३१९, नि० २३वा)

**तोंच**— हें क्रियावि० अव्य०, याचा **सांपडली** या क्रि० कडे संबंध.

**त्यास**— हें तो या पुरु० स० पु० च० एक०.

**एक**— हें संख्यावि०, **मोहरेचें**.

**मोहर**— हें अ० स्त्री० सा० ना० प्र० एक०; ही कर्त० प्र०; हा **सांपडली** या क्रि० कर्त्ता.

**सांपडली**— हें क्रि०, **सांपड** या अ० धा०, क० रू०, मू० भे०, स्वा०, भू० का०, स्त्री०, तृ० पुरु० एक०.

यांत **मोहर** हा कर्त्ता, आणि **सांपडली** हें क्रि०; हा अक० कर्त० प्र०.

**आर्या.**

**जातां परार्थ ही बहु तापातें पावली सुरामा तो**
**न करील कां पित्याची दुर्गतिची मावली सुरा भाती॥**

**जातां**— हें धातुसा० अव्य०.

**परार्थ**— हें क्रियावि० अव्य०.

**ही**— हें श० अव्य०.

**बहु**— हें वि०, **तापाचें**.

**तापातें**— हें **ताप** या अ० पु० सा० ना० च० एक०.

**पावली**— हें क्रि०, **पाव** या अक०, धा०, क० रू०, मू० भे०, स्वा०, भू०, स्त्री०, तृ० पुरु० एक०.

**सुरामा**— हें आ० स्त्री० सामासि० सा० ना० प्र० एक०; हें कर्त० प्र०; हा **पावली** या क्रि० कर्ता. **सुरामा** हा कर्मधा० स०.

**ती**— हें द० स०, स्त्री० प्र० एक०; याचा संबंध **सुरामा** या कडे.

यांत **सुरामा** हा कर्ता; **पावली** हें क्रि०; हा अक० कर्त० प्र०.

**न**— हें क्रियावि० अव्य०; याचा **करील** या क्रि० कडे संबंध.

**करील**— हें क्रि०, **कर** या स० धा०, क० रू०, मू० भे०, स्वा०, भ० का०, स्त्री०, तृ० पुरु० एक०.

**कां**— हें क्रियावि० अव्य०; याचा **करील** या क्रि० कडे संबंध.

**पित्याची**— हें **पिता** या आ० पु० कर्तृवाचक धातुसा० ना० ष० एक०; याचा संबंध **माती** कडे.

**दुर्गतिची**— हें **दुर्गति** या इ० स्त्री० समासि० सा० ना० ष० एक०, इचा संबंध **मावली** कडे. **दुर्गति** हा कर्मधा० स०.

**मावली**— हें ई० स्त्री० सा० ना० प्र० एक०.

**सुरा**— हें आ० स्त्री० सा० ना० प्र० एक०; हें कर्त० प्र०; हा **करील** या क्रि० कर्ता.

**माती—** हें ई० स्त्री० सा० ना० प्र० एक० ही कर्म० प्र०; हें **करील** या क्रि० कर्म

यांत **सुरा** हा कर्ता, **माती** हें कर्म, आणि **करील** हें क्रि०; हा सक० कर्त०. प्र०.

व्याकरणाचा उपयोग किती आहे, व कठीण कवितांचे अर्थ लावायास व्याकरणाचें साहाय्य किती लागतें, हें विद्यार्थ्यांच्या लक्षांत आणण्या करितां आणखी एक आर्या खालीं लिहिली आहे; तर विद्यार्थ्यांनीं आपल्या बुद्धि चातुर्येंकरून इचा यथार्थ व्याकरणपदछेद केला ह्मणजे ग्रंथकर्त्याचे श्रम बरेच सफल झाले, असें तो समजल्या वांचून राहणार नाहीं.

आर्या.

अनलसमीहितसाधीरायाबारामहीबराकामा
अनलसमीहितसाधीरायाबारामहीबराकामा ॥

**समाप्त.**